# गांव-गाडा.

त्रिं. ना. आत्रे.

# गांव-गाडा.

## Notes On

## Rural Sociology & Village Problems

WITH

## Special Reference to Agriculture.

महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक संस्था
११३३. सदाशिव पेठ, गद्रेवाडा,
कृष्णा पुरळोकर चौक, पुणे-४११०३०

# गांव-गाडा.



रचणार,

त्रिंबक नारायण आत्रे, बी. ए., एल्. एल्. बी.



आवृत्ति पहिली, प्रती २०००.

इ. स. १९१५.

किंमत सव्वा रुपाया.

हें पुस्तक कर्त्याकडे पोस्ट कर्जत, जिल्हा अहमदनगर येथें, अगर पुणें येथें आर्यभूषण छापखान्यांत मिळेल.

# अर्पणपत्रिका.

नामदार सर रिचर्ड ॲफलेट लॅंब साहेब बहादूर,
के. सी. एस्. आय., सी. एस्. आय., सी. आय ई.,
आय सी. एस., सीनियर मेम्बर, एक्झि-
क्युटिव कौन्सिल,
मुंबई इलाखा
ह्यांच्या सन १८९९ तें १९०२ पर्यंतच्या दुष्काळां
तल्या अत्यंत सहानुभूतिपर व लोकप्रिय
कारकीर्दीची आठवण म्हणून
ही आवृत्ति
आदरपूर्वक अर्पण केली असे.

ग्रंथकर्ता.

# वंदन.

नमस्कार ! वाचकश्रेष्ठ !! महाराष्ट्रांतील गांव--गाडा लहानपणापासून पाहण्यांत येत असल्यामुळें त्याचे विचार फार दिवसांपासून मनांत घोळत; आणि हें नको तें पाहिजे असें वाटे. परंतु अमुक गोष्ट वाईट आहेशी वाटते ती खरोखरीच वाईट आहे किंवा आपल्याला ती चांगलीशी उमजली नाहीं म्हणून वाईट दिसते ही शंका राहून राहून येई व दटावून सांगे कीं 'थांब, पुनः ती पहा व तिचा विचार कर.' कविकुलगुरु **कालिदासानें** म्हटल्या-प्रमाणें " विकारं खलु परमार्थतोऽज्ञात्वानारंभः प्रतीकारस्य. " ज्या ठिकाणीं व ज्या लोकांत सुधारणा करावयाच्या त्यांविषयीं शक्य तितकी ऐतिहासिक, सामाजिक, धार्मिक, सांपत्तिक, राजकीय वगैरे हरतऱ्हेची माहिती हस्तगत केल्यावांचून पूर्वग्रह, परंपरा व चालू वहिवाट ह्यांच्या बसल्या घडीवर उपायचिंतन कसें होईल ? अशा मार्गानें पहिले पहिले पुष्कळ विचार पालटत गेले; आणि विशेषतः गेल्या पंधरा वीस वर्षांच्या श्रवणानें अवलोकनानें, मननानें आणि अनुभवानें त्यांपैकीं जे मुक-रर झाले, त्यांचें व्युत्पत्ति, इतिहास, समाजशास्त्र आणि म्हणीं वगैरेंवरून सुचणाऱ्या नानाप्रकारच्या प्रचलित समजुती इत्यादींच्या धोरणानें रेखाट-लेलें सोपपत्तिक शब्दप्रतिबिंब आपणाला सादर करीत आहें.

प्रकृत पुस्तकाच्या अवघ्या विषयांचें आकलन साधारण मनुष्यानें करूं म्हणणें म्हणजे थोडें फार वाऱ्याची मोट बांधण्याची आकांक्षा धरण्या-सारखेंच आहे. गांव-गाड्यांत काय एक येत नाहीं ? त्या सर्वांचा यथा-क्रम, यथाभाग व यथान्याय समावेश करणें मला तरी दुर्घट वाटलें. त्यांतून गांव--गाडा प्राचीन कालीं जरी आंखून भरला असला तरी पुढें तो तसाच धुराड, उलाळ, एकार वगैरे न येतां आपल्या मूळच्या ढाळावर रेखला चालला आहे असें बिलकुल नाहीं. उलट जागा, प्रमाण, तोल इत्यादि न पाहतां जशी रीघ मिळाली तशी त्यांत भरती होतच गेली,

आणि हा आज येथं तर उद्यां दुसरीकडे अशी ढकलाढकल, कोंबाकोंबी व चेंगराचेंगर सदैव चालू राहिली. ह्याप्रमाणें मूळ भरितांतच जर कालवाकालव व गोंधळ तर त्यावरील माझ्या टिपणांच्या मांडणुकींत तंतोतंत टापटीप अगर टीपबंद व्यवस्थितपणा दिसून न आल्यास त्याकडे आपण कानाडोळा करतील अशी आशा आहे.

भरितापैकीं ज्या खुंटांनीं व बोजांनीं माझें मन वेधिलें, त्यांचा मीं स्थूल दृष्टीन पण चाळणीच्या रीतीनें समाचार घेतला आहे. कितीही कणदार व सफाईदार माल चाळणींत घातला तरी ती बापडी त्यांतला केर, कळणा, कोंडा, भूस एवढेंच घेऊन उठते. पण त्यावरून त्यामध्यें सत्त्वांश किंवा ग्राह्यांश मुळींच नसतो अशी जर कल्पना केली, तर ती निखालस चुकीची ठरेल. तेव्हां खेडींपाडीं व न स्थिरावलेल्या जमाती ह्यांमध्यें येथून तेथवर त्याज्यांश भरला आहे, असा समज हें पुस्तक वाचून कोणींही करून घेऊं नये. जसा व्यक्तीच्या कुटाळीचा प्रश्नच येथें उपस्थित होत नाहीं तसा कोणत्याही जातीची नालस्ती करण्याचादेखील होत नाहीं. कारण जे कांहीं दोष म्हणून दाखविण्यांत आले आहेत ते व्यक्तींचे नसून कालोदधींत वाहत येतांना त्यांतील खडकांवर आदळतां आदळतां छिन्न विच्छिन्न व बेरूप झालेल्या संस्थांचे आहेत, आणि त्यांची जबाबदारीही ज्या त्या संस्थेवर आहे. संस्था व त्यांना आधारभूत जीं तत्वें त्यांची अथवा विशेषतः त्यांच्या विदीर्ण विकृत स्वरूपांची व उपाधींची ही सर्व लीला आहे. व्यक्ति व जाती-पोटजातीसारख्या संस्था ह्या बहुंशीं त्यांच्याच प्रेरणेनें नाचणाऱ्या बाहुल्या होत. संस्था व त्या स्थापन करणारे ह्यांच्यासंबंधानें मला बालाग्र अनादर नाहीं; आणि **तमाम जनता सहसा चुकत नसते**, ह्या **एडमंड बर्कच्या** सिद्धांतावर माझी दृढ श्रद्धा आहे. प्राप्त परिस्थितीला योग्य अशा जनहितपोषक संस्था निर्माण करण्यांत मनुष्य आपलें बुद्धिसर्वस्व प्रायः वेंचितो. तेव्हां भक्कम पुराव्याच्या अभावीं त्या व त्यांचे निर्माते ह्यांना दूर कालीं व देशीं नांवें ठेवण्याचा अधिकार कोणालाही सहसा पोंचत नाहीं; परंतु त्यांची छाननी वेळोवेळीं

करूं नये, अथवा त्यांचे विकार व उपाधि ह्यांचा छडा काढूं नये असें मात्र नाहीं. ह्याच प्रकारचा प्रस्तुत अल्पसा प्रयत्न आहे. तो कितपत साधला आहे हें अजमावण्यासारखी माझ्या तरी मनाची स्थिति नाहीं. खेड्यांतील स्थाईक व भटकणाऱ्या लोकसमुदायाशीं बोलतां चाल-तांना त्यांचा तो आनंद, परोपकार, आदरातिथ्य, मायाळूपणा, मन-मोकळेपणा, तळमळीचा अभाव, आणि आहे त्यांत संतोष मानण्याची मनाची खंबीर तयारी ह्यांची गारीगार करण्यासारखी आठवण झाली कीं, मन भारल्यासारखें होऊन तदाकार बनतें; आणि ह्यांना काय कमी आहे ह्याचें भान रहात नाहीं. त्यांपैकीं बहुतेकांमध्यें ठसकदार भाषण व निर-क्षर शहाणपण इतकें दिसून आलें कीं, त्यांच्या सहवासांत माझें मन अनेक वेळां दंग होऊन जाई. त्या सुखाची आठवण झाली म्हणजे ह्या बांधवांचें कौतुक किती करावें व उपकार किती मानावेत असें होतें; आणि बुचकळा पडतो कीं, ह्या लोकांमध्यें ज्या सुधारणा व्हाव्या असें आपणांला वाटतें त्या कल्याणपरिणामी होतील ना? का त्या जांवई-शोध किंवा उंटावरील शहाण्याची युक्ति होतील ? कांहीं असो, इतकें मात्र खास कीं, त्यांनीं जसा मनोभावानें मजजवळ पोटउकाला केला, तसा मींही त्यांच्या सुखांत भर पडावी, आणि त्यांचें–निदान कुणब्याचें तरी–एका पैशाचें काम अधेल्यांत व्हावें, म्हणून मायेनें हा कडू निंब पुढें केला आहे. तिच्या भरांत जर कोण्या संस्थेसंबंधानें, वर्गासंबंधानें, किंवा व्यक्तीसंबंधानें उणें उत्तर निघून गेलें असलें तर तें सर्वांनीं मोठ्या मनानें पोटांत घालावें अशी हात जोडून प्रार्थना आहे.

'कन्या सासऱ्यासी जाये । मागें परतोनी पाहे' ॥ अशाप्रकारें पूर्वी खेड्या–शहरांचें नातें होतें. विद्याव्यासंगी, क्षत्रिय व वैश्य वर्गांमधील पुष्कळ जण उद्योगासाठीं खेड्यांतून शहरांत जात, परंतु त्यांचें मन आपल्या वत-नावरील घरीं व आप्त–स्वकीयांच्या आणि नाना प्रकारच्या जातींच्या लोकांच्या ठिकाणीं गुंतून राही. त्यांशीं ते अत्यंत सलगीनें वागत. त्या मुळें त्यांना खेड्यापाड्यांची राहाटी, रीतिरिवाज, जनस्वभाव, गुणदोष,

वगैरे सर्व उत्कृष्ट अवगत असे, तें इतकें कीं पाऊल, पोषाख, शब्द इत्यादींवरून लांबून येणारा–जाणाराची जात देखील गेल्या पिढीपर्यंत पुष्कळ लोक नक्की सांगत. विद्यापीठें व उद्योगधंदे शहरांत फैलावल्यापासून बरेच लोक तेथेंच स्थाईक होतात, निदान खेड्यांत क्वचित् जातात; आणि गेले तरी अनेक कारणांमुळें बायका–पोरांना फारसे बरोबर नेत नाहींत. म्हणून अलीकडील पिढीचा बहुतेक काळ शहरांत जातो आणि गांवढ्याच्या खांचाखोंचांशीं त्यांचा फार बेताबाताचा परिचय होतो. मी जरी पुष्कळदां स्वतःच्या व आप्तांच्या गांवीं जाई, तरी मुलकी खात्यांत शिरकाव झाल्यावर, आणि त्यांतले त्यांत जाती–जातींच्या चालीरीतींची माहिती कशी गोळा करावी ह्याचें वळण मे. एंथोवेन साहेब बहादूर सुपरिंटेंडेंट एथ्नॉग्राफिकल सर्व्हे इलाखा मुंबई ह्यांनीं घालून दिल्यावर व तें दोन तीन वेळां गिरवून घेतल्यावर खेड्यापाड्यांनीं मुक्काम पडून लोकांशीं सुखदुःखाच्या गोष्टी करतांना अनेक बाबींची परंपरा कानावर येऊं लागली, व दृष्टि अन्तर्मुख होऊं लागलीसें वाटून खेड्यांचें अंतरंग तिजवर थोडेंसें उमटल्याचा भास झाला. खेड्यांचा अनुभव फारसा नसेल अशा गृहस्थांना खेडीं व फिरस्ते ह्यांची बरीच कानीं न पडलेली माहिती होतां होईल तों त्यांच्याच भाषण–संप्रदायांत प्रस्तुत पुस्तकामध्यें मिळेल; आणि तें लिहिण्याचा हा एक हेतु आहे, पण तो प्रधान नव्हे. सुधारणेच्या सर्व योजना शहरांत सुरकुंड्या मारतात व खेड्यांच्या गांवकुसाबाहेर थबकतात, पण वेशीच्या आंत म्हणून फडकत नाहींत, असें म्हटलें तर वस्तुस्थितीचा विपर्यास खात्रीनें होणार नाहीं. पहाडांत व किर्र जंगलांत अकोलें तालुक्यांतील फोपसंडीसारखीं कित्येक खेडीं अशीं आहेत कीं त्यांत दोन प्रहरापर्यंत भगवान् सहस्त्ररश्मीचा प्रवेश होत नाहीं, तर मग युगेंच्या युगें जन–मानस–प्रकाशित करणाऱ्या ज्ञानरश्मीला अवसर कोठून मिळणार ? खेड्यापाड्यांनीं, पालाझापांनीं, दऱ्याखोऱ्यांनीं, तीर्थक्षेत्रांनीं, मंदीरदर्ग्यांनीं सर्व प्रकारच्या व दर्जांच्या सुधारकांना व संशोधकांना किती काम आहे, आणि तें पडून राहिलें तर देशसुधारणा

कशी खुंटून बसणार आहे इकडे बोट दाखविण्याचा ह्या पुस्तकाचा मुख्य उद्देश आहे. तें सांगोपांग, परिपूर्ण व बिनचूक उतरनें आहे, अशी घमेंड मला मुळींच नाहीं. त्यांतले विषय वाढत्या अंगाचे आहेत, आणि चौकस व चिकित्सक विद्वान् त्यांत जसजसें मन घालतील तसतसे ते वाढी लागून स्पष्टही होतील. माझी माहिती व अनुमानें चुकीचीं ठरलीं तरी खेड्यापाड्यांकडे आणि रान-डोंगरांकडे सुज्ञांचें लक्ष्य गेलें हें पाहून माझ्या श्रमांचें चीज झालें व मी मोठा भाग्यशाली आहें असें मी समजेन.

अमुक एक ग्रंथावरून प्रस्तुत पुस्तकाची रचना केली असें मुळींच नाहीं. त्याचा मुख्य पाया जातीजातींच्या आबालवृद्ध स्त्रीपुरुषांशीं प्रसंगानुसार झालेले संवाद व त्यांनीं दिलेली माहिती हीं आहेत. तरी माझ्या विनंतीस मान देऊन ज्या स्थाईक व फिरस्त्या जातींच्या बंधुभगिनींनीं आपला वेळ मोडून आडपडदा न ठेवतां मला माहिती सांगितली त्यांकडे ह्या पुस्तकासंबंधानें आद्य महत्त्व येतें, आणि हें साहित्य पुरविल्याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहें. ज्या जमेदारांनीं आपल्या दप्तरचे जुने कागदपत्र मला दाखविले व त्यांतील माहितीचा उपयोग करण्याची परवानगी थोर मनानें दिली, त्यांचाही मजवर फार मोठा अनुग्रह झाला आहे. पुस्तकांतील अनुमानांबद्दल व सिद्धांतांबद्दलही उभय वर्गांतील मंडळींनीं मजवर थोडे फार उपकार केले आहेत. परंतु त्या बाबतींत मला अधिक साह्य देशी—परदेशी ग्रंथकारांचें झालें. त्यांत प्रमुखत्वें मे. स्पेन्सर, मेन, मोलस्वर्थ, बेडन पॉवेल, ग्रँडडफ, लिवार्नर, नेर्न, एंथोव्हेन, ऑर, मॅक्नील, सेडन ( माजी दिवाण बडोदें ), कीटींग, सिमकॉक्स, केनडी, फडनीस, दांडेकर, मुजुमदार, पारसनीस, काथवटे ( श्री. वि.) इत्यादि सरस्वतीभक्त; गॅझेटिअर्स, खानेसुमारीसारखे रिपोर्ट, एथ्नॉग्रफिकल सर्व्हेचे मोनोग्राफ्स आणि इतर सरकारी, खासगी, प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें, व लेख ह्यांची गणना होते. ह्या सर्व विद्वन्मूला मी कृतज्ञतापूर्वक धन्यवाद समर्पण करतों. रा. रा. वामन गोविंद काळे एम्. ए. इतिहास व अर्थशास्त्र ह्यांचे प्रोफेसर, फर्ग्युसन कॉलेज पुणें, ह्यांनीं पुस्तकाची हस्तलिखित प्रत

तपासून अनेक उपयुक्त सूचना केल्या त्यांबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. उपरिनिर्दिष्ट सारस्वतांचा व माझा सर्वस्वीं एकाशय आहे असें नाहीं. त्यांचा व माझा अनेक बाबतींत मतभेद आहें. सबब पुस्तकांतील मजकुराची जबाबदारी पूर्णपणें माझी आहे. युरोपांतील संग्रामाच्या ऐन धांदलींत आर्यभूषण छापखाना पुस्तक छापण्याला सज्ज झाला ह्मणून त्याचीही प्रशंसा केली पाहिजे. तें छापतांना ज्या चुक्या राहिल्या त्यांतल्या ठळक चुकांचें शुद्धिपत्र जोडलें आहे.

वाचकश्रेष्ठ! इतकें निवेदन करून **गांव—गाडा** आपल्या पदरांत टाकतों. आणि सादरपणें अशी याचना करतों कीं, त्यांत जीं व्यंगें दिसतील तीं कृपा करून मला खुलासेवार कळवावींत, म्हणजे द्वितीयावृत्ति काढण्याचा सुप्रसंग आला तर त्यांचा अगत्यपूर्वक विचार करीन. नियतकालिक-कर्त्यांना खाशी विनंति केली पाहिजे. ती ही कीं, ज्या अंकांत अभिप्राय प्रसिद्ध होईल तो अंक निदान त्यांतला अभिप्रायापुरता उतारा त्यांनीं मेहरबानीनें मजकडे पाठवावा. कारण एक तर मी राहतों त्या खेड्याचे वस्तींत तीं सर्वच येतात असें नाहीं; आणि दुसरें असें कीं, पुस्तक पाठविल्यापासून इतके दिवसांत इतक्याव्या अंकांत अभिप्राय येईलच अशी खात्री नसल्यामुळें तोंपर्यंत हावरेपणानें अथपासून इतिपर्यंत सर्व मजकूर चाळण्याची गरज पडणार नाहीं. प्रतिष्ठित इंग्रजी दैनिकें वरीलपैकीं दुसरा मार्ग स्वीकारतात. पण आमच्याकडे नांवालौकिकाचीं अनेक नियतकालिकें दोहोंपैकीं एकाचाही अवलंब करीत नसल्यामुळें ही खास विनंति नाइलाजानें करीत आहें. खेड्यांतल्या संभाविताकडे वाणगी ह्मणून खरवसासाठीं कोवळें दूध पाठविलें, तर तें भांडें रिकामें परत न करतां त्यांत कांहीं तरी तांदूळ, गहूं, बाजरी, ज्वारी घालून तें परत केलें पाहिजे अशी जुनाट रीत आहे; आणि ती नागरिकांनाही साजेल! नमस्कार!!

कर्जत, जि. नगर.
आषाढ शु. १ शके १८३७. } **त्रिंबक नारायण आत्रे.**

# अनुक्रमणिका.

## शुद्धिपत्रक.

| पान. | ओळ. | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १९ | २ | दहा हजार | एक लाख |
| २९ | ७ | वगैरे | वगैरे नांवें पडलीं. |
| ३७ | १६ | राजाकडून | राजांकडून |
| ५९ | ३ | रांगेनें | रगेनें |
| ६० | १३ | साख्य | सौख्य |
| १६६ | १ | वेषानें | पेषानें |
| १७२ | ६ | ताब्यांत घेतलें | राखून ठेवलें |

# गांव-गाडा.

## भरित.

पुराणांतरीं गांवाची व्याख्या अशी दिली आहे—

> तथाशूद्रजनप्राया सुसमृद्धकृषीवला ।
> क्षेत्रोपभोगभूमध्ये वसतिर्ग्रामसंज्ञिता ॥

जिच्यासभोंवतीं कीर्दसार—वहितीला योग्य—जमीन आहे, आणि जिच्यामध्यें मातबर शेतकरी व पुष्कळसे मजूर आहेत, अशा वस्तीला गांव म्हणतात. गांवच्या हद्दीला किंवा सीमेला " शींव " ही संज्ञा आहे. गांवाचे स्वभावतः आणि एकमेकांपासून अलग असे दोन भाग उघड उघड पडतात. एक ' **पांढरी** ' किंवा गांवठाण आणि दुसरा '**काळी**' किंवा रान. काळी आणि पांढरी ह्या संज्ञा जमिनीच्या रंग व गुण-धर्मांवरून प्रचारांत आल्या असाव्या. काळी जमीन काळी किंवा काळ-सर असून भुसभुशीत असते, ती पाणी धरते व खचते. पांढरी जमीन पांढरसर, आवळ व निब्बर असून पाणी ढाळते. ह्यामुळें काळी जमीन जितकी वहितीला उपयोगी, तितकी इमल्याला नसते; आणि पांढरीवर जसा इमल्याला धर सांपडतो, तसा कंदमूलांना किंवा उद्भिज्जांच्या मुळ्यांना तिच्या पोटीं वाव सांपडत नाहीं. प्रत्येक गांवांत शक्यतेप्रमाणें पांढऱ्या जमिनीची योजना गांवठाणाकडे आणि काळीची योजना शेतवाडी-कडे झालेली दिसते ती निसर्गानुरोधानेंच आहे, हें कोणाच्याही लक्षांत येईल. तेव्हां गांवाच्या ज्या जागेवर मनुष्यें घरेंदारें करून नांद-तात तिला पांढरी, आई—पांढर किंवा गांवठाण म्हणतात, आणि ज्या

जागेंत तीं पिकें करतात, तिला काळी, आई-काळी, रान किंवा शिवार म्हणतात. कालेंकरून पांढरी व काळी ह्यांचा अर्थ अनुक्रमें पांढरींत व काळींत द्यावे लागणारे कर असा होऊन बसला; जसें, मी पांच रुपये काळी देतों. पांढरी म्हणजे गांव किंवा लोकवस्ती आणि काळी म्हणजे शेतकरी वर्ग असाही भाषणसंप्रदाय रूढ आहे; जसें ही गोष्ट काळी पांढरीला माहीत आहे. शिवेच्या आंतील पांढरी-व्यतिरिक्त सर्व भूभाग-शेतें, खराबा, चराई, नद्या, नाले, मसण-वाटा, माळमुरडण इत्यादि-शिवार ह्या शब्दांत समुच्चयानें येतात. काळी-पांढरी मिळून झालेल्या गांवाला जुन्या कागदपत्रांत "देह" संज्ञिलें आहे. कांहीं ठिकाणीं गांवठाण सोडून मनुष्यवस्तीचीं छपरें, झोंपड्या, झांप, घरें इत्यादि दृष्टीस पडतात. गांवठाणापासून दूरदूरची जमीन जसजसे लोक लागण करूं लागले तसतशा शेताच्या येरझारा त्रासदायक होत गेल्या व शेतींतला नफाही पुरता मिळेनासा झाला. म्हणून शेतांत किंवा त्यांच्या आसपास राह-ण्याची गरज जास्त भासूं लागली. ह्या व ह्यासारख्या दुसऱ्या कारणां-मुळें शेतकरी शिवारांत कायमची वस्ती घालूं लागले. अशा प्रकारचीं शेतांत एक दोन घरें असलीं तर त्यांना झांप, आवसा, कोठा, गोठा किंवा पडाळ ( पर + आलय ) म्हणतात; आणि तीं दहा पांच किंवा अधिक असून त्यांचें छोटेखानी गांवठाणच बनलें तर त्याला वाडा, वाडी, मजरें, पाडा असलें नांव प्राप्त होतें. पाडा, वाडा, वाडी अगर मजरें मूळ गांवच्या अंगभूत असतें, आणि कागदो-पत्रीं अमुक गांवची अमुक **वाडी** अगर **मजरें** याप्रमाणें उल्लेखितात. वाडीची वस्ती जसजशी वाढते व संपन्न होते, तसतसा तिला गांवाचा आकार येतो; आणि मूळ गांवाला मागें टाकणाऱ्या व हा मूळ गांव कीं वाडी असा पांथस्थांना बुचकळा पाडणाऱ्या वाड्याही क्वचित् आढळ-तात. अव्वलपासून आपल्याकडे खेडेगांवांचे दोन भेद मानतात. एक **मौजे** आणि दुसरा **कसबा**. कसब ( कला अगर हुन्नर ) ह्या शब्दापासून

कसबा हा शब्द निघाला आहे. व्यापार, हुन्नर व कसबी मजुरी करणारे लोक मौज्यापेक्षां कसब्यांत अधिक असतात; आणि कसब्याखालीं वाड्याही जास्त असतात. कसब्याचें गांव मौज्यापेक्षां जास्त विस्तृत, चव्हाट्याचें, रोजगारी व संपन्न असतें. गुजराथेंत नागरिकांना 'कसबाते' म्हणतात. मोठ्या व्यापाराच्या गांवाला **पेठ** म्हणतात. पेठ म्हणजे बाजार किंवा दुकानांनीं व्यापलेला गांवाचा भाग. मनुष्यगणतीच्या वेळीं सरकारनें ठोकताळ्यानें असें ठरविलें कीं, पांच हजारांवरील लोकसंख्येच्या गांवाला शहर म्हणून व त्याखालील लोकसंख्येच्या गांवाला खेडें म्हणून दाखल करावें. परंतु एखाद्या गांवाला खेडें किंवा शहर हें नांव लोक देतात, तेव्हां ते लोकसंख्येबरोबर किंबहुना जास्ती उद्योगधंद्याच्या प्रकारावर लक्ष देतात. गांवची हुन्नरी व व्यापारी वस्ती फुगली आणि काळीपेक्षां पांढरी बळावली कीं त्या गांवाची शहरांत गणना होऊं लागते. **खेडणें** म्हणजे **जमीन कसणें** आणि खेडू म्हणजे जमीन कसणारा. तेव्हां खेडूंची जी वस्ती तें खेडें. ज्यामध्यें प्रधान धंदा शेती व ज्यामध्यें भरण्याची वस्ती शेतकऱ्यांची असते, त्या गांवांला लोक खेडें किंवा गांवढें म्हणतात आणि तद्व्यतिरिक्त गांवांना शहर मानतात. लोकरूढींत खेडें आणि गांव हे बहुतेक समानार्थक शब्द होऊन बसले आहेत. गांव–गाडा, गांवकी, गांवमुकादमानी, गांवपंचाईत, वगैरे शब्दांत गांव हा शब्द शहरापेक्षां खेडें ह्या अर्थानें योजिला आहे हें सांगणें नको.

कोणत्याही गांवाला गेलें तरी मध्यें पांढरी व सभोंवतीं काळी दृष्टीस पडेल. गांवच्या बंदोबस्तासाठीं घांटावरील पुष्कळ गांवांसभोंवतीं गांवकूस किंवा कोट केले असून त्यांतून गांवांत शिरण्याला एक अगर अधिक वेशी असतात. पुष्कळ ठिकाणीं गांवकूस व वेशींची निगा न राहिल्यामुळें पडझड व मोडतोड झाली आहे. त्यामुळें गांवाची हवा, उजेड हीं खेळतीं झालीं आहेत, हें सार्वजनिक आरोग्याच्या दृष्टीनें एकपरी बरें झालें म्हणावयाचें ! स्पृश्य जातींचीं घरें वेशीच्या आंत असतात; आणि

मेलेल्या जनावरांची चिरफाड करणाऱ्या (शस्त्रानें न मारलेल्या म्हणजे निसर्गधर्मानें मेलेल्या जनावराला " **पडें** " म्हणतात; त्यांच्या मांसाला तें न खाणाऱ्या जाती " **भाती** " म्हणतात, व तें खाणाऱ्या जाती "**भाजी**" म्हणतात.) व तीं खाणाऱ्या जातींचीं, तसेंच वंजारे, वड्डर, कैकाडी, फांसपारधी वगैरेसारख्या फिरस्त्या व नवीन वस्तीला आलेल्या जंगली जातींचीं घरें, पालें किंवा झोंपड्या प्रायः गांवाबाहेर असतात. त्यांतले त्यांत फांसपारध्यांच्या झोंपड्या गांवापासून जरा दूर असतात. ह्यामुळें पांढरी पांगलेली दिसते इतकेंच नव्हे तर नवख्याला जवळ जवळ दोन तीन गांवें असल्याचा भास होतो. जातीजातींचीं घरें सलग असतात व त्यांना जातिपरत्वें माळआळी, सुतारआळी, कोळवाडा, रामोसवाडा, भिलाटी अशीं नांवें पडतात. दर एक गांवाला एखादें देवालय आणि बहुतेक गांवांला चावडी असते. तेथें लोक जमतात. भिल्ल, कोळी, रामोशी वगैरे तुफानी जातींतले लोक जंगल पहाडाचें दडण व पुंडावा सोडून गांवाच्या आश्रयाला आले, तेव्हां त्यांच्या जातिधर्मास योग्य अशा ठिकाणीं त्यांना वस्ती मिळाली. ह्या जाती स्पृश्य आहेत तरी त्यांना मध्यवस्तींत कोठेंही जागा मिळाली नाहीं. वहिमी जाती मध्यवस्तींत ठेवणें धोक्याचें असतें. त्यापेक्षां त्या वेशीजवळ किंवा गांवकुसाजवळ राहिल्या तर गांवाचें राखण तरी करतील. म्हणून भीलवण, कोळवणांतील गांवें शिवाय करून इतर मुलखांतल्या गांवांत ह्या जातींची वस्ती वेशीजवळ किंवा गांवकुसाजवळ दिसून येते. अस्पृश्य जातींपैकीं ज्या गोमांस खात नाहींत, अशा ढोर, चांभार[१], भंगी, इत्यादींचीं घरें गांवांत शेवटीं किंवा गांवकुसाबाहेर अगदीं गांवाला खेटून असतात. महार, मांग, मेलेलीं ढोरें ( गाई, म्हशी ) फाडतात व खातात म्हणून महारवाडा व मांगवाडा हे गांवापासून किंचित् दूर असतात. पश्चिमेची शुद्ध हवा मिळावी ह्यास्तव पुष्कळ ठिकाणीं ते गांवाच्या पूर्वेस आढळतात.

१ चांभारगोंदें ऊर्फ श्रीगोंदें येथें मात्र चांभारवाडा गांवाच्या मध्यवस्तींत आहे.

श्रीरामचंद्रानें कनकमृग मारला व तो पडला म्हणून तो महारांनीं हक्कांनीं नेला; ही कथा सांगून महार आपला मुख्य हक्क असा सांगतात कीं, आम्ही " पड्याचे धनी. " कोणी म्हणतात, महार हा शब्द मेहतर याचा अपभ्रंश आहे, कोणी म्हणतात, तो महा + अरि ( मोठा शत्रु ) ह्या दोन संस्कृत शब्दांचें रूपांतर आहे. रा. रा. शिवरामपंत भारदे म्हणतात कीं, महाराचें मूळ "मह + अर" म्हणजे जंगलांत किंवा पर्वताच्या गुहेंत राहणारा अर्थात् जंगल किंवा गुहेचा नाईक हें आहे, म्हणून त्याचें मुख्य काम वाटाड्याचें ठरलें. सर रामकृष्णपंत भांडारकर ह्यांच्या मतानें मृतहर ( मेलेलें जनावर ओढणारा ) ह्या शब्दापासून महार हा शब्द निघाला. ' गोधन ' हा संस्कृत समास पुराणप्रसिद्ध आहे. हिंदु लोक गाईला आई समजतात. गाई, म्हशी, बैल, रेडे, ह्या शेतोपयोगी जनावरांना शेतकरी लोक " **लक्ष्मी** " म्हणतात. उदाहरणार्थ, पाटलांजवळ दोन खंडी लक्ष्मी आहे, रानांत लक्ष्मीला पाणी भेटत नाहीं इत्यादि. वर सांगितलेल्या जनावरांचें मांस बहुतेक हिंदु खात नाहींत. महार मांग तें खातात; इतकेंच नव्हे, तर लोकप्रवादाप्रमाणें गुरांढोरांना विष घालून मारतात व पडें खातात. तेव्हां मा ( लक्ष्मी, आई ) + हर अशी महार शब्दाची व्युत्पत्ति संभाव्य दिसते. महार हा जातिवाचक शब्द असून व्यवसायवाचकही आहे, आणि असल्या अनेक जातींप्रमाणें महार ही संकीर्ण जात असावी. महार व मांग या दोन्ही जाती गांवाबाहेर राहतात, तरी ' **बाहेरला** ' व ' **वेसकर** ' हे प्रतिशब्द महारालाच लावतात. दोन्ही जातींत 'नाईक ' हें बहुमानाचें उपपद लावतात, व महारांमध्यें त्याचें 'नाक' हें रूप झालें आहे, उ०—खंडनाक, जाननाक. गांवकीच्या कामावर महारांप्रमाणें मांगांच्या साक्षीसह्या क्वचित् आढळतात. आषाढांत कोणत्याही हिंदु जातीचीं लग्नें होत नाहींत; परंतु महारांची लग्नसराई मात्र आषाढांत असते. ह्या महिन्यांत महारकीचें काम फारसें नसतें, म्हणून समस्त गांवकऱ्यांच्या सोईनें हा महिना महारांना लग्नकार्यासाठीं काढून दिला

असावा. दौंडीचा मजकूर तोंडानें ओरडून महार सांगतो व डफडें मांग वाजवितो. प्रेताचें सरण महार वहातो आणि तिरडी बांधण्याची दोरी मांग पुरवितो. पडच्याचे अमुक एक ( आणि ते महत्वाचे असतात ) अवयव महारांनीं घ्यावेत, अमुक मांगांनीं घ्यावेत, असे हक्क असल्या-बद्दलच्या झालेल्या मजलसीचे जुने कागदपत्र दृष्टीस पडतात. महारां-च्या घरीं लग्न निघालें तर मांगांनीं खिजमत करावी. मांगानें लग्न केलें तर शेला-लुगडें, आणि गोंधळ जागरण घातलें तर चार पैसे, महाराला द्यावेत. मांग मोळ कापावयाला गेला तर त्यानें महारास चार पैसे, खोबरें, पान-सुपारी इतकें दिलें पाहिजे. महारान बैलावर व मांगानें हल्यावर वरात काढावी. अशा प्रकारच्या दस्तुरांवरून मूळ महार, आणि मांग ही महारां-तून वेगळी पडलेली पोटजात असावी किंवा ती त्याचेमागून त्याच्या पडोशाला येऊन राहिली असावी, असें अनुमान निघतें. असो. जातिपरत्वें निरनिराळे पाणोथे आहेत इतक्या मुबलक पाण्याचीं गांवें विरळ. परंतु कितीही अडचण असली तरी ढोबळ मानानें स्पृश्य जाती एका पाणोथ्याला जातात, व त्यावर अस्पृश्य जातींना पाणी भरूं देत नाहींत. दुसरा पाणोथा नसल्यास स्पृश्य जाती अस्पृश्य जातींना पाणी काढून वाढतात. सवड असल्यास निरनिराळ्या जाती उच्चनीच भावानुरोधानें वेगवेगळ्या पाणोथ्यांवर पाणी भरतात, जसें, महारांच्या पाणोथ्यावर चांभार पाणी भरीत नाहींत; अथवा मांगांच्या पाणोथ्यावर महार पाणी भरीत नाहींत.

काळी व पांढरी हे जसे गांवाचे दोन स्वाभाविक विभाग पडतात, तसे उद्योगपरत्वें लोकवस्तीचे दोन भाग शेतकरी करतात- “ **कुणबी** ” म्हणजे शेतकरी आणि “ **अडाणी** ” म्हणजे बिगर-शेतकरी. सह्या-द्रीच्या पायथ्याशीं डांगाणांत महादेवाचे कोळी राहतात. तेथील एका गांवचा एक पोक्त कोळी बोलतां बोलतां आढ्यतेनें म्हणाला कीं “ आह्मी ‘राजकोळी,’ कुणबी नव्हत. ‘कुणबी’ म्हणजे ‘कोणीबी’ ( कोणीही ).

त्यांच्यांत कोणतीही जात संपादते. " कुणबी, गुजराती ' कणबी ' किंवा माळवी 'किरसान' हे शब्द संस्कृत कृषी, कृषीवल ह्या शब्दांपासून निघाले असावेत. कोणी म्हणतात, 'कुनमी ' (पृथ्वीला नमन करणारा) ह्या शब्दापासून कुणबी हा शब्द निघाला. द्राविडी भाषेंत जमीन कस-णाराला पूर्वीं " कुल " म्हणत. कुळव, कुणबी हे शब्द कुल शब्दापासून निघाले असावेत, हें जास्त संभाव्य दिसतें. शेतीचा पर्यायवाचक शब्द कुणबीक, कुणबावा व शेतकरी ह्याचा पर्यायवाचक शब्द " कुणबी " हे होत. कुणबी हा शब्द वाणी, माळी, भराडी, कोष्टी, कोळी, महार वगैरे शब्दांप्रमाणेंच जातिवाचक असून व्यवसायवाचकही आहे. धर्माकडे किंवा जातीकडे लक्ष न देतां जसे शेतकरी आपआपसांत एकमेकांना 'मिरासभाऊ' ' पास–भाऊ ' (पास= कुळवाचा लोखंडी भाग) म्हणतात, तद्वतच शेतीचा धंदा करणारांना ' कुणबी ' म्हणतात. चैत्र गळे कुणबी पळे, कुनबीसरीखा दाता नहि, वगैरे म्हणींत कुणबी याचा अर्थ शेत-करी धरला आहे. खेडें म्हटलें कीं, पांढरीच्या अगोदर चटकन् काळीच डोळ्यांपुढें उभी राहते. शेतें, पिकें, गवत, झाडें, गुरेंढोरें, शेळ्या मेंढ्या, मेंढके, शेतकरी, गुराखे, पाट, भुडक्या, विहिरी, नांगर, कुळव, मोट, माळा, गोफण वगैरे बळिराजाचें वैभव खेड्याचें नांव काढतांच इतकें मन व्यापून टाकतें कीं, खेड्यांत शेतीखेरीज दुसरा रोजगार चालत असेल किंवा शेतकऱ्यांखेरीज दुसरें कोणी रहात असेल, असें एकाएकीं मनांत देखील येत नाहीं. कुणबी पुढें झाल्यावांचून एकही खेड्यांत वसा-हत झाली नाहीं. त्यानें धान्य पैदा करून इतरांच्या खाण्याची तरतूद केली, तेव्हां ते गोळा झाले. दुनियेच्या पोटापाण्याचा भार कुणब्यानें उचलला ही सार्वत्रिक समजूत असल्यामुळें खेड्यांतले सर्व धंदेवाले कुण-ब्याला " बळिराजा " असें संबोधितात. वामनाला पृथ्वी दान करणारा बली राजा होता, ही पुराणकथा लोकप्रसिद्ध आहे. शेतीच्या धंद्याइतका शारीर बल वाढविणारा दुसरा धंदा नाहीं; व रामोशी, महार, मांग इत्यादि सर्व जाती एकवाणीनें कबूल करतात कीं, एकदरींत कुणब्यां-

इतकी ताकद दुसऱ्या कोणत्याही जातींत नसते, म्हणूनही कदाचित् ब्राह्मणाला जसें पंडित, तसें कुणब्याला बळी ( बलवान् ) म्हणण्याचा रिवाज पडला असेल. कुणबीक हा जसा आद्य धंदा आहे, तसा तो प्रधान धंदाही आहे. 'उत्तम शेती, मध्यम व्यापार आणि कनिष्ठ चाकरी' अशी म्हण पडण्याचें कारण इतकेंच कीं, आपल्या देशांतला मुख्य धंदा शेतीचा आहे, आणि सर्व धंदे शेतीवर जीव धरून आहेत. अझूनही शेंकडा ७२ लोकांचें पोट शेतीवर चालतें, आणि शेंकडा ८० जणांची धांव जमीन संपादन करण्याकडे आहे. लोकांचा असा ठाम विश्वास आहे कीं, पोटाला भरपूर आणि निरंतर एक काळी आई देईल; पैसा जातो, परंतु जमीन ठिकाणीं राहते व तिच्यांतलें धन सालोसाल उकरून खातां येतें. तेव्हां असला अक्षय धंदा ज्याला साधला, त्या धंद्याच्या लोकांनीं आपल्या आधारावर धंदा करणाराला अडाणी (अडणारा) म्हणूं नये तर काय म्हणावें? ज्या धंद्यांचा काळीशीं निकट संबध नाहीं ते करणारांना 'पांढरपेशे' म्हणतात, आणि ते ब्राह्मण झाले तरी कुणब्याच्या हिशेबीं अडाण्यांतच मोडतात. तरी पण खेड्यांत जातिपरत्वें अडाणी शब्दाची भिन्न भिन्न योजना दृष्टीस पडते. वाण्यांला विचारलें, तर ते सांगतील कीं, वाण्या-ब्राह्मणांचीं बारा घरें, आणि बाकी अडाण्यांचीं. गुरव, सुतार, सोनार, हेही वाणी, ब्राह्मण व स्वतःची जात वगळून बाकीच्यांना अडाण्यांत ढकलतील. असें आहे, तरी ज्याअर्थी कुणबिकीनें खेडें बहुतेक वेढलें आहे, त्याअर्थी कुणबी करतात तेच लोकवस्तीचे विभाग "कुणबी" आणि "अडाणी" हे अधिक ग्राह्य, आणि खेड्याची उत्पत्ति व सर्वसामान्य स्थिति प्रतिबिंबित करणारे आहेत, ह्यांत संशय नाहीं.

खेड्यांत अव्वल आणि प्रधान वस्ती कुणब्यांची. तेथें अडाण्यांच्या साऱ्या द्वारकेची एक काय ती मेढ, आणि ती कुणबी होय. "धान्यानामष्टमो भागः षष्ठो द्वादश एव वा आददीत" इत्यादि मनुस्मृति आहे, तरी राजानें रयतेच्या उत्पन्नाचा सहावा हिस्सा भागधेय ( कर ) म्हणून घ्यावा, असा सरसकट धारा पडला असावा. म्हणूनच संस्कृतांत

'षष्ठांशवृत्ति' हा राजाचा प्रतिशब्द होऊन बसला. हिंदु राजांचे अंमलांत काळी पुष्कळ आणि कुणबी थोडे होते. तेव्हां गतकुळी अगर बेवारशी जमिनीची लागण जो करी, तोच तिजवर वारसा सांगे आणि सरकारला तिजबद्दल लढाई वगैरे धामधुमीच्या साली पिकाची चौथाई, आणि एरवींच्या सामसुमीच्या वेळीं साहोत्रा देई. ह्याप्रमाणें करभार घेऊन राजे प्रजापालन करीत, ज्याला त्याला स्वकष्टार्जित संपत्तीचा भोगवटा घेण्याची सोय करून देत, आणि अपहार करणाऱ्या दुर्जनांचें पारिपत्य करीत. पुढें राजकारण वाढत जातां जातां मुसलमानी रिआसतींत जमिनीची पूर्ण मालकी राजानें आपल्याकडे ओढली असावी. कारण 'खलक खुदाका मुलख पादशहाका' ( विश्व परमेश्वराचें आणि मुलूख राजाचा ), 'बेटी बापाची जमीन बादशाहाची,' ह्याप्रमाणें लोक बोलूं लागले. मुसलमानी राज्यकर्त्यांनीं जमिनीची पहाणी व मोजणी करून सरकारसारा ठरविण्याचा प्रयत्न केला. तैमूरची वसूलपद्धति म्हणून कांहीं ठोकळ नियम होते. शीरशहानें त्यांत सुधारणा करून जमिनीची आकारणी ठरविली. अकबर बादशहाच्या कारकीर्दींत राजा तोडरमल ह्यानें "इलाही गज" नांवाचें जमीन मोजण्याचें प्रमाण निश्चित करून 'कानुगो' ( जमाबंदीचे मुख्य कामगार ) नेमले, आणि सर्व प्रांतांतील जमीनीचें वर्गीकरण व वसूलआकारणी केली. ह्या वसूलपद्धतीस 'असल-इ-जमा-इ-तुमार' असें नांव आहे, हिलाच दक्षिणेंत 'तनखा' म्हणतात. पूर्वी तांब्याचा टका घेत होते. त्याऐवजीं रुप्याचें तनखा नांवाचें नाणें घ्यावें असें ठरविलें म्हणून ह्या पद्धतीचें नांव तनखा असें पडलें. हिच्या अन्वयें कुलकाळी सरकारची ठरवून तिच्या उत्तम, मध्यम, कनिष्ठ अशा तीन प्रती लाविल्या, आणि रयतेनें स्वामित्वाबद्दल चौथाई उत्पन्न नक्त द्यावें असा धारा घातला. राजा तोडरमल ह्याची कायम धारेबंदी लोकप्रिय झाली असा इतिहास आहे. इ. सन १६०७ तें १६२६ च्या दरम्यान निजामशाहीमधील सुप्रसिद्ध मुत्सद्दी, चांदबिबीचा विश्वासु नोकर,

आणि खडकी ऊर्फ औरंगाबाद शहर वसविणारा मलिकंबर ह्यानें दक्षिणची शेतवार पाहणी व मोजणी करून प्रतवारी बसविली, आणि जमिनीच्या उत्पन्नाप्रमाणें २/५ हिस्सा घांसदाण्याच्या रूपानें वसूल घेण्याचा खुद्द गांवांशीं ठराव केला, व वसुलाची जबाबदारी पाटलांवर टाकली. इ. सन १६१४ च्या पुढें त्यानें कांहीं ठिकाणीं दरसालच्या वास्तविक उत्पन्नाच्या मानानें १/३ नगदी वसूल घेण्याचा प्रघात सुरूं केला. त्यानें प्राचीन ग्रामसंस्थांचें पुनरुज्जीवन केलें, कुणब्यांना मिरासपत्रें देऊन म्हणजे जमिनीचे मालक बनवून त्यांना जमिनीच्या खरेदी-विक्रीचे हक्क दिले, आणि पाटीलकुलकर्णी व इतर ग्रामाधिकारी आणि बलुतदार ह्यांचीं वतनें मिरास म्हणजे वंशपरंपरेचीं करून दिलीं. त्यानें गांवाला पड जमिनींतून वनचराई, गायरानें काढून दिलीं, आणि उरली जमीन तीं " गांवसंबंधी " किंवा " गांव वर्दळ " म्हणून गांवाच्या दिमतीला लावून दिली. सरकारसाऱ्याचा ठराव गांववार होत असल्यामुळें त्याची कुळवार फाळणी पाटील करी. ही वसूलपद्धतीची सुधारणा " मलिकंबरीतह " ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. कुणब्याचा किंबहुना कुणब्याअडाण्यांचा काळीशीं एकजीव केल्यावांचून सरकारसाऱ्याची शाश्वती नाहीं, हें तत्त्व मलिकंबरनें पूर्णपणें हृदयांत वागविलें; आणि अझूनहीं लोक त्याचे गुण आठवितात. ह्याप्रमाणें तनख्यानें कुणब्याकडे किंवा गांवाकडे असलेल्या जमिनीस " **मिरासी** " व तिचा भोगवटा घेणारास **मिरासदार, थळकरी, वतनदार,** म्हणत. मेलेल्या मनुष्याची जी मिळकत त्याच्या वारसाला प्राप्त होते तिला अरबी भाषेंत " मिरास " म्हणतात. वारसहक्कानें पिढ्यानुपिढ्या अबाधितपणें राहाणाऱ्या जमिनीला "मिरासी" म्हणत. मिरासीच्या कोंकणी भांवडांना "सुटी" व "धारा" म्हणतात. मिरासीखेरीज जी कीर्दसार जमीन सरकारच्या वहिवाटीला राही, तिला खालसा म्हणत. खालसा किंवा सरकारी जमीन सरकार मन मानेल त्याला कांहीं मुदतीपर्यंत कौलानें देई. कौलानें जमीन वाहणाराला **उपरी** म्हणत. मिरासदारांच्या खेडूंनाही उपरी ह्मणत.

कांहीं गांवांत तनख्यापेक्षां जास्त वसूल येई, तर कांहीं गांवांत सबंध तनखा वसूल होत नसे. ह्यामुळें गांवच्या हिशेबांत कोठें फाजील निघे, तर कोठें बाक्या ओढाव्या लागत. ही अव्यवस्था मोडण्यासाठीं मराठेशाहींत दर गांवाहून जास्तसालबेरीज म्हणजे जास्तींत जास्ती जो वसूल आला त्याचा दाखला काढून तोच गांवच्या तनख्याऐवजीं कायम केला, आणि त्याला 'कमालआकार' हें नांव दिलें. कमालआकारांत कमजास्त करून सालोसाल जो ऐन वसूल करीत, त्याला 'वसुली आकार' म्हणत. कारणपरत्वें मिरासी जमिनी उपऱ्या झाल्या, आणि कौलदारांनीं कुल जमिनीचा—मग तिच्यांत पेर होवो कां ती अंशतः किंवा सर्वस्वी पडित राहो—सरकारसारा देण्याच्या कबुलायती करून देऊन हळुहळू उपऱ्या जमिनी मिरासींत चढवून घेतल्या, असे दाखले मिळतात. इ. स. १८१८ सालीं असें दिसून आलें कीं, पुण्यासाताऱ्याच्या आजूबाजूला जिकडे तिकडे मिरासीच मिरासी जमीन; तेंच आडवळणी सुभ्यांत उपरी जमिनीचें क्षेत्र उमाप होतें. असो. ह्याप्रमाणें कुणब्यांचे मिरासदार आणि उपरी असे दोन विभाग झाले.

मिरासदार आणि उपरी हें कुणब्यांचें वर्गीकरण केव्हां झालें असेल तें असो; परंतु मराठेशाहीच्यापूर्वींच तें महाराष्ट्रांत सर्रास प्रचारांत होतें. **तुकोबा** म्हणतात, 'हे माझे मिरासी। ठाव तुझ्या पायापाशीं ॥ याचा धरीन अभिमान। करीन आपुलें जतन ॥.' मिरासी व मिरासदार ह्यांमध्यें केवढा आत्मभाव प्रदीप्त झाला होता, हें वरील अवतरणावरून दिसून येण्यासारखें आहे. मिरासदारांचा दर्जा फार उंच मानीत. ते ठरलेला धारा देऊन वंशपरंपरेनें जमीन धारण करीत. मिरासीवरील सारा सरकारला वाढवितां येत नसे. परंतु तिच्यांत पेर होवो वा न होवो तिजवरील सरकारदेणें चुकत नसे. सारा येत असे तोंपर्यंत सरकाराला मिरासदाराकडून जमीन काढतां येत नसे, आणि यदाकदाचित् त्याकडे सारा थकला तरी देखील मिरासदार तीस वर्षांवर परागंदा झाल्याशिवाय मिरास जमीन अजीबात खालसा करण्याचा सर-

कारास हक्क नव्हता. मिरास जमीनीबद्दल जर खुद्द सरकारला इतका हात आंखडून धरावा लागे, तर कर्ज उगवण्यासाठीं सावकाराला ती विक्रीस काढतां येत नसे, हें सांगणें नलगे. मिरासदारांप्रमाणें उपऱ्यांचा जमिनीवर निरंतरचा असा कांहींएक हक्क नसे. ते सरकारांतून सालोसाल कौलानें अगर मुदतीच्या पट्ट्यानें परवडेल ती पड जमीन वाहण्यास घेत असत, आणि पेरल्या जमिनीपुरती पट्टी देत. जमिनीवर त्यांचा हक्क इतकाच कीं, त्यांना कौलाच्या मुदतींत तिची लागण करतां येई. कौलाची मुदत संपतांच सरकारला उपरी जमीन वाटेल त्याला लावतां येत असे, आणि तिजवरील पट्टी पण वाढवितां येत असे. इंग्रजी राज्यांत मिरासी व उपरी हा भेद उडाला. आतां कुणबी वगैरे अद्याप एकमेकांना मिरासदार किंवा उपरी म्हणतात, त्याचा अर्थ इतकाच कीं, गांवांत फार दिवस राहिलेला तो मिरासदार, नवीन वस्तीला आला तो उपरी, बाकी दोघांचेही जमिनीवरील हक्क सारखेच. इंग्रज सरकारनें रयतवारी पद्धत सुरू केली; आणि सरकार व रयत ह्यांचे जमीन धारण करण्यासंबंधानें हक्क व कर्तव्यें हीं मुंबईच्या जमीनमहसुलाच्या कायद्यानें ( इ. सन १८७९ चा ५ वा आक्ट) ठरवून टाकलीं. ह्या पद्धतीनें प्रत्येक कुणबी थेट सरकाराकडून जमीन धारण करतो, व सरकारचा खातेदार होतो; आणि कमकसर उत्पन्नाचा सहावा हिस्सा सारा, नगदीच्या रूपानें भरतो. खातेदार आणि सरकार ह्यांच्या दरम्यान कोणीही मध्यस्थ नाहीं. खातेदारानें दर तीस वर्षांनीं अगर कमी मुदतीनें आकारण्यांत येईल तो सारा द्यावा, आणि खुशाल वंशपरंपरेनें जमीन जातीनें कसून किंवा बटाई, ठोक्यानें (मक्त्यानें) लावून तिचा उपभोग घ्यावा. सरकारसाऱ्यासाठीं जमीन खालसा होते, व सावकारी कर्जासाठीं ती विकली जाते. रयतेला जमीन गहाण, खरेदी देण्याची पूर्ण मुभा आहे. परंतु ह्या हक्कानें पुष्कळ कुणबी कर्जबाजारी झाले, व काळी कुणब्यांकडून निघून अडाण्याकडे जाऊं लागली,[१] हें पाहून सन

---

[१] सध्यां सुमारें पांच हिस्से लावणी ( जमीन ) कुणब्यांकडे व एक हिस्सा अडाण्यांकडे आहे.

१९०१ सालीं सरकारनें जमीनमहसुलाच्या कायद्यांत दुरुस्ती करून असें ठरविलें आहे कीं, विशिष्ट रयतेला नवीन जमिनी देतांना अशी शर्त घालावी कीं, त्या त्यांना सरकारच्या परवानगीवांचून गहाण, खरेदी किंवा बटाईनें देतां येऊं नयेत. तेव्हां मिरासदार आणि उपरी ह्यांऐवजीं आतां कुणब्यांचे जुन्या शर्तीचे म्हणजे गहाण, खरेदी देणें वगैरे हक्क असणारे खातेदार, आणि नव्या शर्तीचे म्हणजे सदरहु हक्क नसणारे खातेदार असे दोन वर्ग झाले आहेत.

कुणब्यानें गांव वसविलें, आणि काळी उचलली खरी; तथापि त्याचा धंदा पार पाडण्याला व प्रपंचाचीं अनेक कामें चालण्याला त्याला अडाण्यांच्या जातिपरत्वें धंद्यांची गरज होती, म्हणून कुणब्यानें आपल्याबरोबरच गांवांत अडाणी आणिले. त्यांत पहिल्यानें **कारू,** व नंतर **नारू** आले. कारू हा शब्द “ कार ” ( करणारा ) ह्या शब्दापासून निघाला आहे. ज्याची विद्या, कसब किंवा मेहनत, कुणबिकीला अथवा कुणब्याच्या सरकारी खासगी व्यवहाराला अवश्य असा धंदा करणारा तो कारू; आणि ज्याच्या धंद्यावाचून कुणब्याचें नडत नाहीं किंवा क्वचित् नडतें, असा धंदा करणारा तो नारू. कारूला **बलुतदार** किंवा बलुत्या आणि नारूला **आलुतदार** किंवा आलुत्या म्हणतात. गुजराथेंत त्यांना ‘ वसवईया’ व तेलंगणांत ‘ वेट्टीवाडू ’ म्हणतात. कारू व नारू निरनिराळ्या जातींचे असतात, तरी ते एकमेकांना “ कारभाऊ ” “ नारभाऊ ” म्हणतात, आणि सर्वजण कुणब्याशीं मायलेंकरांचें नातें लावतात. कुणबिकीच्या व समस्त गांवकीच्या सामान्य तसेंच गांवकऱ्यांच्या विशेष गरजा भागविण्यासाठीं कारू नारू जीं आपल्या जातिविहित कसबानुसार कामें करतात, त्यांजबद्दल मेहनताना म्हणून त्यांना दरोबस्त कुणब्यांकडून जो पिकाचा वांटा वंशपरंपरेनें मिळतो, त्याला अनुक्रमें **बलुतें** आणि **आलुतें** म्हणतात. बलुत्याआलुत्यालाच आय, घुगरी, पेंढीकाडी, सळई, भिकणें, शेर, हक्क, इत्यादि प्रतिशब्द आहेत. ज्यांना बलुतें मिळतें ते

बलुतदार, व आलुतें मिळतें ते आलुतदार होत. बलुतें अर्थातच आलुत्यापेक्षां अधिक असतें. कुणब्यांना ज्या बलुतदारांचा जितका उपयोग त्या मानानें त्यांची प्रतबंदी लागून त्यांचे तीन वर्ग झाले आहेत. अशा वर्गाला ' **ओळ** ' किंवा ' **कांस** ' म्हणतात. पहिल्या वर्गाला '**थोरली**' दुसऱ्याला ' **मधली** ' व तिसऱ्याला ' **धाकटी** ' ओळ किंवा कांस म्हणतात. कांस म्हणण्याचा प्रघात पडण्याचें कारण असें कीं, कुणबी ही गाय, व बलुतदार हीं वांसरें मानलीं आहेत; आणि हीं वांसरें आपापल्या पाळीप्रमाणें कांसेला लागतात. कुणबिकीला सर्वांत जास्ती ज्यांचा उपयोग ते बलुत्ये पहिल्यानें कांसेला लागतात, आणि यथेच्छ जोगवतात, म्हणजे सर्वांत अधिक बलुतें त्यांना मिळतें. पहिली ओळ आंखडल्यावर दुसरी ओळ सुटणार, म्हणून तिला पहिलीपेक्षां कमी दूध पिण्याला ( बलुतें ) मिळतें. तिसऱ्या ओळीची पाळी शेवटीं येते, सबब तिचा वांटा सर्वांत कमी असतो. गाय, तिची कांस, वांसरें हें रूपक आणि कुणब्याचें बहुमानाचें नांव " बळी " ह्यावरून तर्क चालविला तर बलुत्या म्हणजे बळी-अपत्य अशी व्युत्पत्ति सिद्ध होते. बळानें म्हणजे हक्कानें ऐन जिनसीं उत्पन्न मागणारा तो बलुत्या, आणि आलेला आगंतुक म्हणून लोभाखातर किंवा धर्म म्हणून पसा मागणारा तो आलुत्या असेंही या शब्दांचें मूळ असूं शकेल. मोहबत ह्या शब्दाच्या अर्थानें देशावर ' अलुलकी ' हा शब्द वापरतात; जसें, "त्याचा कांहीं हक्क नाहीं पण चार ताटें घेऊन जा म्हणून फकिराला अलुलकीनें बोलावलें; " असें कुणबी बोलतात. बलुतदारांना आपआपल्या ओळीचें बलुतें हक्कानें मागतां येतें, व मिळतेंही. बलुतदारांप्रमाणें आलुतदारांच्या ओळी नाहींत. साधारणतः पाटील, कुलकर्णी सोडून चौगुला, महार, सुतार, लोहार, चांभार, कुंभार, न्हावी, सोनार, जोशी, परीट, गुरव, कोळी, ह्यांना बारा कारू किंवा बलुतदार म्हणतात. तेली, तांबोळी, साळी, सनगर, शिंपी, माळी, गोंधळी, डौऱ्या, भाट, ठाकर, गोसावी, जंगम, मुलाना, वाजंत्री, घडसी, कलावंत, तराळ किंवा कोरबु, भोई,

वगैरेंना अठरा नारू किंवा आलुतदार म्हणतात. स्थल–कालपरत्वें आलुत्ये बलुत्यांत चढले व बलुत्ये आलुत्यांत उतरले, आणि कोठें कोठें उपरिनिर्दिष्ट कारूनारूंपैकीं कांहींना आलुत्याबलुत्यांच्या पंक्तींत मुळींच थारा नाहीं. बहात्तर रोग आहेत असें म्हणतात, त्याप्रमाणेंच गांवाला बारा बलुत्ये व अठरा आलुत्ये असें म्हणण्याची वहिवाट आहे. बाकी वस्तुस्थितीचा ह्या संख्येशीं मेळ नाहीं, हें कारूनारूंची विस्तृत यादी **गांव–मुकादमानी** ह्या प्रकरणांत दिली आहे, तिजवरून स्पष्ट होतें.

गांवचे आंधळे, पांगळे, महारोगी वगैरे विकल व पंगू लोक हक्कदार भिक्षुकाप्रमाणें काळी–पांढरी उकळून आपला निर्वाह करतात; आणि एक-प्रकारें हक्कदार बनतात. सर्व गांवकऱ्यांना, मग ते कोणत्याही धंद्यावर पोट चालवोत, **वतनदार** ही सामान्य संज्ञा आहे. वरील स्थाईक वतनदारां-खेरीज गांवाला ओवांड्याचे ( परगांवचे ) फिरस्ते वतनदार असतात. सर्व प्रकारचे व दर्जाचे व्यापारी, निरनिराळे तीर्थोपाध्याय, मंदिरवाले, दरगेवाले, फिरस्ते, हुन्नरी व मनोरंजनाचा धंदा करणारे, भिकार, चोरटे, वगैरे लोकांचा ज्या गांवांशीं वंशपरंपरेचा संबंध जडतो, ते तीं गांवें वांटून घेतात; आणि वांटणीच्या गांवांत आपला रोजगार पिढ्यानुपिढ्या चाल-वितात. तेही आपणांला वतनदार म्हणवितात, आणि गांवचे स्थाईक वतनदार त्यांना याच नात्यानें वागवितात. कदीमच्या फिरत्या वतन-दारांप्रमाणें उपलाणी गोसावी, बैरागी, फकीर, जंगम, मानभाव, आंधळे, पांगळे वगैरे भिक्षुक, गोपाळ, कोल्हाटी, गारोडी, ह्यांसारखे तमासगीर कांहीं गांवीं कायमची वस्ती करून वतनदार झाले आहेत. कांहींजण फिरतां फिरतां कमाईचीं गांवें टेहाळून ठेवतात, आणि वर्ष दोनवर्षां त्या गांवीं टाकले उतरतात. ह्याप्रमाणें पायरवा घालून ते हळूहळू वतनदार बनतात, ते इतके कीं लोक त्यांची मुदतीप्रमाणें वाट पाहतात, आणि ते आले नाहींत, तर हळहळतात. एका गांवीं फार दिवस राहिलेल्या एका ख्रिस्ती पालकानें आपण करीत असलेल्या लोकसेवेबद्दल आपला तीन चार महिन्यांचा पंचेचाळीस कीं साठ रुपये पगार सदरहु गांवांत

पट्टी करून काढल्याचें ऐकिवांत आहे. गांवगाड्यांतलें भरित किती ठेललें आहे, वाटेल त्याला त्यांत आपलें चंबू गवाळें टाकून कसा पाय रोंवता येतो हें खेड्यांचें निरीक्षण करणाराला तेव्हांच ताडतां येईल. राजकीय, धार्मिक व सामाजिक स्थित्यंतरें, आपल्या समाजाची पुराणप्रियता, वृत्तिछेदाची भीति, धर्मादायाची कल्पना, धौताल कारभार आणि मागणाराची चिकाटी, स्वाभिमानशून्यता, व सतरा सोंगें करून धान्य, पैसा अगर वस्त्र उकळण्याची शिताफी ज्यांना माहित आहे, त्यांना हें सांगण्याची गरज नाहीं कीं, गांवें उकळून खाणारांची संख्या कित्येक शतकांपासून सारखी वाढतच आहे.

**वतन** हा शब्द ' वर्तन ' (उपजीविकेचें साधन) ह्या संस्कृत शब्दापासून निघाला. राहण्याच्या जागेला आरबी भाषेंत वतन म्हणतात. जातधंदा, वंशपरंपरागत काम, चाकरी, नेमणूक, उत्पन्न, अधिकार, मानपान, हक्क, वडिलोपार्जित मिळकत, स्थावर अगर स्थावराच्या योग्यतेची जंगम मालमत्ता, जन्मभूमि ह्या सर्वांना वतन शब्द लावतात. वतन धारण करणारा तो वतनदार. गांवच्या वसुलावर, पिकांवर, हरजिनसावर, देऊळ दरग्यासारख्या धर्मादायावर, किंवा गांवकऱ्यांच्या संस्कारांवर, धर्मकृत्यांवर, ज्यांचा थोडा फार पिढ्यानुपिढ्या अगर व्यक्तिविशिष्ट निरंतर किंवा कांहीं काळपर्यंत हक्क आहे, ते सर्व वतनदार होत. ज्या गांवीं जो कायमची वस्ती करून रहातो, जमीनजुमला करतो, किंवा कालविशेषीं धंद्यानिमित्त अगर भिक्षेनिमित्त फेऱ्या घालतो, तो सुद्धां आपणाला त्या गांवचा वतनदार म्हणवितो. वतनदारांच्या गांवसंबंधाच्या परस्पर व्यवहाराला आणि वतनदारांच्या जगद्व्यापी जाळ्यांत गुरफटलेल्या गांवच्या समाईक अंतर्बाह्य व्यवहाराला ' **गांवकी** ' किंवा ' **गांवगाडा** ' असें म्हणतात. तेव्हां गांव-गाड्यांत समाविष्ट झालेल्या सर्वांना आपण त्याचें **भरित** म्हणूं.

जातिधर्मबद्ध सामान्य जनाची नजर ' मी व माझें कुटुंब ' ही कोंडी फोडून निघाली ती गांवकुसाला अटकली, आणि देशाभिमानाची

जागा ग्रामाभिमानानें पटकावली व तोही पुढें वतनलोभांत लय पावला. आतांप्रमाणें प्रवाससौकर्य, व्यापारविस्तार, आणि नियमबद्ध कारभार व तो चालण्यास जरूर तें राजबल ह्यांचा भरपूर आश्रय नसल्यामुळें आपापले उद्योगधंदे आणि प्रपंचाचे नित्य व्यवहार अव्याहत चालूं ठेवण्यासाठीं खेड्यांना स्वयंपूर्ण व स्वावलंबी होणें अवश्य झालें. हमेष-चा सर्व प्रकारचा व्यवहार गांव आपल्या अखत्यारीवर करी, आणि राजाधिकारी किंवा धर्माधिकारी त्यांत क्वचित् चित्त घालीत. जीवित किंवा वित्त संरक्षण करण्याच्या कामीं शिवभावांचें किंवा राजाधिकाऱ्यांचें वेळेवर सहाय्य मिळेलच असा भरंवसा नव्हता. त्यामुळें गांवावर जी धोंड येई तिचें ओझें सर्व गांवानें समाईक उचलण्याखेरीज गत्यंतर नव्हतें. ज्या गांवाला बाजार नसतो, किंवा असूनही वेळेवर सौदा मिळण्याचा संभव नसतो तेथले धोरणी संसारिक जसे सवडीनुसार हर-एक वाण संपादन करून लावून ठेवतात आणि वेळेवर काढतात; त्याप्रमाणें गांवगाड्याच्या योगक्षेमासाठीं जरूर ते राजाधिकारी, धर्माधिकारी, ग्रामरक्षक, हुन्नरी, मजूर, मनोरंजन करणारे, त्यानें आपले संग्रहास वंशपरंपरेनें ठेवले. खरें पाहूं गेलें तर प्रत्येक गांव हा एक तुटक जनसमाज किंवा स्वतंत्र राज्यच झालें, आणि राज्यांतील इतर विभागांशीं त्याचा इतका कमी संबंध येत होता कीं, तो असून नसल्या-सारखा होता. सिंधप्रांतीं गांव वसविणाऱ्या घराण्यांना समुच्चयानें राज ( राज्य ) म्हणतात. ही गोष्ट वरील विधानाच्या प्रत्यंतरादाखल लक्षांत घेण्याजोगी आहे. सबंध काळी-पांढरीची सामाजिक व राजकीय जबाब-दारी गांवानें सर्व मिळून घ्यावी, होतां होईल तोंपर्यंत त्याला कोण-त्याही कारणानें परगांवापाशीं किंवा खुद्द सरकारापाशीं सुद्धां तोंड वेंगाडण्याची गरज पडूं नये हें ध्येय सतत डोळ्यापुढें ठेवून आमच्या पूर्वजांनीं गांवगाडा भरला, आणि त्यांना तो अंतर्बाह्य व्यवहारांत जितका स्वयंसमाविष्ट करतां आला तितका करण्यांत त्यांनीं यत्किंचित् कसूर केली नाहीं. म्हणून तो पूर्वींच्या बेबंदशाहींतून वांचून निघाला. ह्या

गांवाचें त्या गांवाशीं वांकडें नसलें तर नशीब समजावयाचें. "गांवचा बळी गांवींच बळी पऱ्या गांवीं गाढवें वळी" ह्या म्हणीवरून गांवगांवचे लोक परगांवच्या लोकांशीं कसे वागत ह्याचा उलगडा होतो. जें तें गांव आपल्यापुरतें पाही. अनेक गांवें किंवा सबंध प्रांत ह्यांचें लोकोपयोगी कामांत सहकार्य पाहण्याचा सुयोग विरळ. उलट परदेशस्थांना असें अनेक वेळां दिसून येई कीं, एखाद्या गांवाच्या सुड्या जळाल्या, तर आसपासचीं गांवें आपलें धान्य त्यांना न विकतां दाबून धरीत; आणि शेजारच्या गांवावर बंड आलें तर त्याचे शिंवभाऊ त्याच्या मदतीला न धांवतां खुशाल आपआपल्या शेतांनीं नांगर कुळव हांकीत. राजकीय विभागांसंबंधानें गांवचा हात महालाला, महालाचा सुभ्याला आणि सुभ्याचा राज्याला लागला तरी तो पुण्याहवाचनापुरताच. एकमेकांनीं एकमेकांला कडकडून कवटाळलें व ओढून घेतलें आणि चिरकालीन विस्तृत सार्वजनिक हितसंबंध निर्माण केले असें क्वचित् झालें. ह्यामुळें एक राज्य जाऊन दुसरें आलें म्हणून गांवच्या दिनचर्येंत दिसण्याजोगा बदल झाला, किंवा गांवकरी गांवकीपलीकडच्या विचारांत निमग्न झाले, असें बहुधा होत नसे. ज्याप्रमाणें अनेक पिढ्या वरून आल्या व गेल्या तरी उंबरा आपल्या ठिकाणच्या ठिकाणींच, त्याप्रमाणें राज्यांच्या अनेक तऱ्हा व उलथापालथी झाल्या, तरी गांवगाड्यानें आपलें ठिकाण सोडलें नाहीं. त्याचे गुणावगुण कांहीं असले तरी हें कबूल केलें पाहिजे कीं, गांवगाडा हा राज्यव्यवस्थेचा आदि घटक, आणि अनेकविध धर्मव्यवस्था व समाजव्यवस्था ह्यांचा प्रधान घटक अनेक शतकें होऊन बसला आहे; आणि आजला सुद्धां त्याची ही पदवी कायम आहे. कारण हिंदीस्तान हा शह-

१ पूर्वकालीन शेजार वैराचें स्मारक म्हणून नगर जिल्ह्यांतल्या कोपरगांव तालुक्यांतील संवत्सर व कोकमठाण या दोन गांवांतल्या लोकांमध्यें अद्याप दरसाल अक्षय्य तृतीयेस गोफणधोंड्याची लढाई होते, व कांहीं डोकीं फुटतात. अशी लढाई न केली तर पीक जातें, असें तेथील लोक मानतात म्हणून ते राजीखुशीनें लढतात. हत्यारें होतीं तेव्हां ते हत्यारांनीं लढत असत.

रांचा देश नसून खेड्यांचा देश आहे. गेल्या मनुष्यगणतीनें हेंच सिद्ध केलें आहे. दहा हजार व वर लोकसंख्येचीं शहरें अवघ्या देशांत सत्तावीस असून त्यांत देशांतील एकंदर लोकसंख्येपैकीं शेंकडा २·१४ लोकवस्ति आहे. पांच हजारांवरील शहरांच्या वांट्याला अजून लोकसंख्येचा दहावा हिस्सा सुद्धां येत नाहीं. शेंकडा नव्वदांवर लोक खेड्यापाड्यांनीं राहतात; आणि निम्म्याहून अधिक जनता एक हजार लोकसंख्येच्या आंतील सहा लाख खेड्यांत कालक्रमणा करते. सरसकट शेंकडा दहा लोक जरी शहरांत राहतात, तरी कोण्याना कोण्या खेड्यांत त्यांना वतन नाहीं असे शहरवासी आपल्या देशांत विरळा. तेव्हां सबंध हिंदीस्तान गांवगाड्यांत भरलें आहे, असें म्हटलें असतां आठ हात लांकूड आणि नऊ हात ढलपी असा आरोप खास येणार नाहीं. तरी तो कसा काय चालला आहे ह्याची पूसतपास करूं.

# वतन-वृत्ति.

कोठेंही केव्हांही जा, बापाचा धंदा मुलानें उचलला नाहीं, असें क्वचित् दृष्टीस पडतें. बहुतेक ठिकाणीं व प्रसंगीं असेंच पाहाण्यांत येतें कीं बाप वैद्य असला तर मुलगाही वैद्यकी करतो; बाप सराफ किंवा जव्हेरी असला, तर मुलगाही बापाची गादी चालवितो. बापाचा कारकुनी किंवा शिपाई पेषा असला तर मुलगाही कलमबहाद्दर किंवा तरवारबहाद्दर होण्याची ईर्षा धरितो. लक्षावधि धंदे अस्तित्वांत असतांना व त्यांत हरघडी शतशः भर पडत असतांना आणि ते शिकण्याचीं साधनें व सोयी विपुल व मुक्तद्वार असतांना जर आज आपणाला असें स्पष्टपणें दिसतें कीं, मुलाचा ओढा बहुधा बापाच्या धंद्याकडे असतो, मुलानें आपला धंदाच पुढें चालवावा असा मनोदय बापाचाही असतो, आणि त्याप्रमाणें उभयपक्षीं तयारी करतात; तर जेव्हां धंदे थोडे आणि त्यांचें ज्ञान मिळविण्याचीं सार्वजनिक साधनें व सोयीही थोड्या व एक घरीं होत्या, अशा प्राचीन काळांत बापाच्या धंद्याची माळ मुलाच्या गळ्यांत सर्रास पडे, ह्यांत नवल तें कोणतें? पुष्कळ धंदे वंशपरंपरेनें चालतात ह्याचें मुख्य कारण हें कीं, मुलाला वडिलार्जित मिळकत आयती मिळते, त्याचप्रमाणें वडिलार्जित धंद्याचें बरेंचसें ज्ञान त्याला बसल्याजागीं अनायासें प्राप्त होतें. जातां येतां वडिलांचें काम नजरेखालून जातें, त्यासंबंधानें ते काय बोलतात हें उंबरा न ओलांडतां कानीं पडतें, आपण तें काम करूं म्हटल्यास सर्व सामुग्री घरच्या घरीं सिद्ध असते, आणि त्याचें वर्म समजून घेण्याचें मनांत आणिल्यास कळकळीचा सांगणारा तत्पर असतो. म्हणतातना, जांवयाबरोबर जेवावें व मुलांबरोबर शिकावें. प्रत्यक्ष बापापेक्षां अधिक हितचिंतक विद्यागुरु कोण भेटणार? धंद्याला काय लागतें, खरी मेहनत व कूस किती ह्याचा खडान्खडा माहीत

असल्यामुळें, आणि धंद्याची सर्व प्रकारची पूर्व तयारी करून बसल्यामुळें-नव्हे तो अगोदरच रेघारूपास आणिल्यामुळें वडिलांनाही असें वाटणें सहाजिक आहे कीं, मुलानें तोंडांत आलेला घांस टाकून नवा पाव नवा डाव न करतां आपल्याच धंद्यांत .पडावें. ह्याप्रमाणें सौकर्याच्या दृष्टीनें वडिलार्जित धंदे चालविण्यास चालू व भावी पिढ्या सारख्याच आतुर असतात, आणि समाजही ह्या स्थितीस अनुकूल असतो असें म्हटलें तरी चालेल. विशेष कारण नसतांना कारखानदार आणि कारखाने वरचेवर बदलले तर, कालावधीनें, अनुभवानें किंवा अनुवंशानें प्राप्त होणाऱ्या कसबास व प्राविण्यास समाज मुकतो. जोंपर्यंत कसब सोपें व साधें असतें आणि त्यांत कलाकुसरीचा व व्यक्तिसंपादित प्राविण्याचा भाग फारसा नसतो, तोंपर्यंत वंशपरंपरेनें धंदे अव्याहत चालले तरी समाजाच्या गरजा विशेष अडचण किंवा तोटा न येतां भागतात.

आमच्यांत अशा प्रकारें पिढ्यानुपिढ्या धंदे चालविणारीं विवक्षित घराणीं केवळ समाजसुव्यवस्थेसाठीं निघालीं, आणि जरी तीं मूळचीं एकाच समाजांतलीं किंवा त्या समाजांत अंतर्लीन झालेलीं असलीं, तरी कालांतरानें आद्य ऐक्याची भावना कमजोर आणि विभक्तपणाची भावना बलवत्तर होत जाऊन त्यांचे वेगवेगळाले संघ झाले. हेच आमचे वर्ण होत. पूर्वींची वर्णव्यवस्था सैल असून तिच्यामध्यें धंद्याची अदलाबदल करण्यास किंवा अमुक धंदा करणाऱ्या आईबापांच्या पोटीं जन्म घेतल्यामुळें त्यांचा धंदा सोडून दुसरा धंदा करण्यास मनाई नव्हती; म्हणजे वर्णव्यवस्था जन्मसिद्ध नव्हती. पुढें जसजसा समाज वाढला व पांगला, तसतशीं ह्या संघांचीं बंधनें एकमेकांपासून दुरावत गेलीं, आणि भिन्न भिन्न आचार रूढ होत गेले. त्यांपैकीं कांहीं आचार केवळ यदृच्छेनें, कांहीं व्यवसायपरत्वें, कांहीं देशकालमानानें व कांहीं मतभेदानें प्रचारांत आले असले, तरी त्या सर्वांना व त्यांना मूलभूत जो व्यवसाय त्याला धर्माचें स्वरूप येऊन वर्णाश्रमधर्म सर्वसामान्य धर्माच्या जोडीला येऊन बसला. सामान्यापेक्षां विशेषाचें जेथल्या तेथें माहात्म्य जास्त असतें, ह्या नियमा-

नुसार ज्या त्या वर्णांतले लोक सामान्य धर्मापेक्षां आपापल्या वर्णविशेष धर्माला जास्त भजूं लागले. धंद्याच्या स्वरूपावरून एक धंदा दुसऱ्या धंद्यापेक्षां अधिक पवित्र व मानार्ह अशी धंद्यांची प्रतवारी लागून अखेर एकाच धंद्यांतील-अमुक काम उच्च व शुद्ध किंवा सिद्ध अशी त्यांतल्या त्यांत कामांची वर्गवारी लागली. ह्यामुळें वर्णाश्रमधर्माची विभक्तता दृढ होऊन पूर्वींच्या एकजीव समाजाचे लोक निरनिराळ्या वर्णांत व उपवर्णांत एकमेकांपासून तुटक नांदूं लागले; आणि ज्यानें त्यानें आपापल्या वर्णांतच शरीरसंबंध व अन्नव्यवहार केला पाहिजे, ज्याचा ज्या वर्णांत जन्म त्याच वर्णाचा व्यवसाय त्यानें वर्णधर्म म्हणून केला पाहिजे, इतर व्यवसाय करणें अधर्म होय, असले कडक नियम अमलांत आले. त्यांनीं प्रथम समाजांतील सर्व वर्णांत होणारा बेटीव्यवहार नंतर रोटीव्यवहार नंतर शिवताशिव कमी केली; आणि चार वर्णांतून अनेक उपवर्ण ऊर्फ जाती उत्पन्न केल्या. वर्णांप्रमाणें जातिजातींचेही विवक्षित धंदे व आचार पडत गेले, आणि ते जातिधर्म म्हणून ज्या त्या जाती पाळूं लागल्या. जातींतल्या कांहीं लोकांनीं कांहीं धंद्यांतून किंवा मूळ धंद्याच्या घाणेरड्या किंवा त्रासदायक भागांतून अंग काढून घेतलें. तसें ज्यांनीं केलें नाहीं किंवा असलीं कामें ज्यांनीं पत्करलीं, त्यांच्या कमी दर्जाच्या पोटजाती बनूं लागल्या. वर्णांतून ज्या कारणांनीं जाती निघाल्या, त्याच कारणांनीं जातींतून पोटजाती निघाल्या, आणि रूढीनें सर्व व्यवसाय, पोटव्यवसाय व त्यांतील निरनिराळीं कामें ह्यांना जातिधर्माचें स्वरूप देऊन टाकलें. ही समाजविभंजक परंपरा जाति पोटजातींवर मुक्काम करती तरी बरें होतें. एखाद्या जातीनें दुसऱ्या एखाद्या जातीचा किंवा पोटजातीचा व्यवसाय किंवा आचार उचलला, किंवा जाणून बुजून अथवा नकळत आचारस्खलन केलें, किंवा मूळ धर्माहून किंचित् भिन्न असा एखादा उपधर्म किंवा संप्रदाय पत्करला, किंवा शेजारीं नांदत असलेल्या परधर्माच्या मतांपैकीं किंवा उपासनेपैकीं एखादा भाग स्वीकारिला, कीं त्या जातींत अगर पोटजातींत तट पडत; व तेवढा आचार,

व्यवसाय, संप्रदाय, धर्ममत अगर उपासना ह्यांपुरता स्वतंत्र पंथ निघे, व अजूनही हेंच चाललें आहे. इतर व्यवहारांत सामान्य जात त्याला दूर धरीत नसे व नाहीं. परंतु अल्पसंख्याक समाज आपले हितास अतिशय जपतात असा नियम आहे, त्याप्रमाणें नवीन पंथच जातीच्या सामान्य हितापेक्षां आपल्या हिताकडे जास्त लक्ष देतात व वेगळे होण्याचे तया-रीस लागतात. ह्याप्रमाणें समाजाचे तुकडे होतां होतां शेवटीं निरनिराळे कुलाचार पडत जाऊन ते कुलधर्म होऊन बसले; आणि एरवीं सर्व प्रकारें एक अशा कुळांत सुद्धां फूट पडली व बारा पुरभय्ये आणि चौदा चुली अशी समाजाची स्थिति झाली. जातींच्या किंवा पंथांच्या विभक्तपणाच्या सहस्रावधि कारणांचा शोध केला तर तो अतिशय बोधप्रद व मनोरंजक होईल, आणि त्याची छाननी करून त्यांतील तथ्यांश समाजापुढें स-प्रमाण मांडला तर जातिभेदाची तीव्रता कमी करण्यास त्याचा पुष्कळ उपयोग झाल्यावांचून राहणार नाहीं.

अगदीं वरवर पाहणाराला सुद्धां ही गोष्ट कबूल करावी लागेल कीं, ब्राह्मणादिकांच्या बहुतेक जाती वस्तिपरत्वें झाल्याः– मारवाडी ब्राह्मण, कोंकणी मराठा, गुजराती न्हावी, परदेशी कुंभार इत्यादि. ज्या ब्राह्मणांनीं नागवेलीचीं पानें खुडण्याचें टाकून दिलें नाहीं त्यांची तिर-गुळ ब्राह्मण म्हणून एक पोटजात झाली. ज्या क्षत्रिय–वैश्यांनीं विधवा-वपन, पुनर्विवाह वगैरे चालू केले ते आपल्या वर्णबंधूंतून फुटून बाहेर पडले. गुरव, भोप्ये, गोंधळी, आराधी, भुत्ये, भराडी, डौरे गोसावी, वाघ्ये वगैरे पुजारी जातींचे भेद देवदेवतांवरून झालेले दिसतात. शंकराची पूजा प्रमुखत्वें गुरव करतात, तशी देवीची भोप्ये, गोंधळी, भुत्ये किंवा आराधी, भैरवाची जोतीबाची भराडी किंवा डौरे गोसावी, खंडोबाची वाघे करतात. पिराला भजणारे व मानभावाचा अनुग्रह घेतलेले लोक ब्राह्मणेतर जातींत पुष्कळ आहेत, आणि त्यामुळें त्यांचे वेगवेगळाले पंथ झाले आहेत. पांचाळांकडे पाहतां सोनार, तांबट, कासार, लोहार, जिनगर, विसाडी, ह्या जाती धातूंवरून पडल्या असाव्यात.

सुतार, बुरूड, साळी, कोष्टी, चवाळे विणणारे सनगर, धनगर, ह्या जाती धंद्याला लागणाऱ्या निरनिराळ्या जिनसांवरून पडलेल्या दिसतात. ढोर, चांभार, महार, होलार व मांग चामड्याच्या मुख्य धंद्याचीं पोटकामें करतात, तरी त्यांच्या जाती निराळ्या आणि त्यांतही उच्च-नीच भाव आहे. ज्या ढोरांनीं जोडे करण्याचें काम पत्करलें ते चांभार झाले; आणि ज्या चांभारांनीं महारमांगांचे सुद्धां जोडे करण्याचें पत्करलें ते होलार झाले. महार संबळ वाजवितील पण कड्यावर थाप मारणार नाहींत. मांग कडें वाजवितात पण ढोल किंवा डौर वाजविणें कमी दर्जाचें समजतात, तो मांग गारोडी वाजवितात. भिल्ल, कोळी ह्यांसारख्या अनार्य जातींनीं आर्यांना विरोध केला, आणि त्या लूट-मार करून राहिल्या. त्यांना आर्यांतले दुराचरणी लोकही मिळाले असावेत. आज ज्या अनेक गुन्हेगार जाती आपणांला दिसतात त्या दुराचारी आर्य–अनार्य व संमिश्र जातींचे वंशज होत. गुन्हे करणें हा आपला जातिधर्म आहे असें सदर जाती मानतात. क्षेत्रशुद्धीबद्दल प्रत्येकाला काळजी असते, तरी या न्यूनताप्रचुर जगांत व्यभिचारी लोक असावयाचेच. आपल्या जातीची नीति बिघडूं नये म्हणून वरिष्ठ जातींनीं आपल्या कामवासना कनिष्ठ जातींतल्या स्त्रियांकरवीं तृप्त केल्या, किंवा आपल्यांतल्या मोळा सुटलेल्या स्त्रियांची स्वतंत्र जात होऊं दिली. ह्यामुळें खानदेशकडील हरदास, बऱ्हाणपुराकडील रामजानी व गंगथडीकडील कोल्हाटी ( कुलटा = निसवलेली स्त्री. ) आणि मुसलमानांतील कसबी वगैरेसारख्या जारकर्म करणाऱ्या जाती निर्माण झाल्या. व्यभिचार हाच आपला जातिधर्म असें ह्या जाती मानतात. मुसलमानांचें पाऊल हिंदीस्तानांत पडण्यापूर्वीं गुरें मारण्याचें काम हिंदु खाटिक करीत. मुसलमान दृष्टीस पडल्याबरोबर त्यांनीं तें सोडलें आणि मुसलमान खाटिकांना 'मुलाना' हा किताब देऊन बकरें लावण्याचें ( कापण्याचें ) काम त्याच्या गळ्यांत अडकविलें. विशेषतः असें दिसून येतें कीं, मूळ जातींतल्या धंद्यांतलीं

त्रासदायक व ओंगळ कामें भिन्न भिन्न जातींतल्या मिश्र शरीरसंबंधाच्या अपत्यांनीं व नवीन धर्मानुयायांनीं पत्करलीं. वर सांगितलेल्या व त्यांसारख्या अनेक कारणांमुळें जातींची संख्या व कोंडी बेसुमार वाढली, आणि जातिभेदाचीं मुळेंपाळें लोकाचारांत इतकीं खोल गेलीं कीं, जातिभेदाचा नायनाट करण्यासाठीं अवतीर्ण झालेल्या महंमदी व ख्रिस्ती धर्मांना सुद्धां ह्या कामांत तोंड फिरवावें लागलें आहे. लाखों हिंदूंनीं महमदी व ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतली तरी त्यांच्या गळ्यांतलें जातिभेदाचें लोढणें सुटलें नाहीं. आतार, मण्यार, झारेकरी, कंजार, तेली, धोबी, मोमीन, तांबोळी, कसई, मदारी, दरवेशी, बंदरवाले, कसबी, कटई, हलालखोर वगैरे कनिष्ठ गणलेले धंदे करणाऱ्या मुसलमान जातींचा व वरिष्ठ जातींच्या मुसलमानांचा बेटीव्यवहार होत नाहीं. ब्राह्मण ख्रिस्ती, साळी ख्रिस्ती, महार ख्रिस्ती, मांग ख्रिस्ती असले भेद लग्नसंबंधांत हिंदी ख्रिस्ती पाळतात. समाजसुधारकांना जरी पुष्कळसे जातिभेद अनवश्यक दिसतात तरी त्यांना फांटा देणें अनेक वर्षांच्या वहिवाटीमुळें दुर्घट झालें आहे. अनेक जातींत अनाचार, दुराचार व दोष ह्यांना जातिधर्माचें स्वरूप आल्यामुळें ज्या त्या जातीला व एकदर समाजाला त्यांतला वावगा प्रकार दिसेनासा झाला आहे. तसेंच जातीजातींत—आचारविचारांचें अंतर कसें व किती दुरावलें आहे, आणि जातिधर्मांमुळें जातिभेदाचा कोट दुर्भेद्य होऊन पर्वताच्या तुटलेल्या कड्याप्रमाणें हिंदु समाजांतल्या जाती एकमेकांपासून बहुतांशीं कशा सुटावल्या आहेत हें गुन्हेगार व व्यभिचारी जातींवरून चांगलें स्पष्ट होतें.

प्रत्येक समाजाला असें वाटत असतें कीं, आपण स्वयंपूर्ण असावें व कोणत्याही गोष्टींत दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी पिण्याची पाळी आपणावर येऊं नये. त्यांतून हिंदु समाजांतील जाती व पोटजाती एकमेकांपासून बहुतेक बाबतींत अलग झाल्यामुळें स्वयंपूर्ण असण्याची आवश्यकता त्यांना विशेष भासूं लागली. जातिपरत्वें जरी सरकारी, खासगी

धंद्यांची वांटणी झाली आणि एकीचा धंदा दुसरी सहसा करणार नाहीं असा आळा पडला, तरी सबंध जातीचा ओघळ होतां होईल तों जाती-बाहेर जाऊं देऊं नये ही कल्पना बहुजनसमाजांत अत्यंत दृढमूल झाल्यानें प्रत्येक जातीनें, पोटजातीनें किंवा पंथानें, कांहीं राजकीय, धार्मिक व सामाजिक अधिकार राजाला, धर्माधिकाऱ्यांना किंवा सर्व-सामान्य समाजाला अर्पण न करतां आपले हातीं राखून ठेविले. त्यामुळें पुष्कळ बाबतींत जातीच्या लोकांचा राजा व धर्माचार्य जातच राहिली. लोकसत्तात्मक राज्यपद्धतींत लोकच आपले राजे असतात, तरी पण धर्मसंस्कारांवरील अधिपत्य धर्मगुरूकडे असतें असें बहुधा पाश्चात्य देशांत आढळून येतें. ह्या नियमाला हिंदु समाजांत मात्र कांहीं अपवाद नजरेस पडतात. अठरा वर्णांचे नामधारी गुरु जरी ब्राह्मण असले तरी ब्राह्मण, मराठे, सोडून प्रत्येक जातीला गुरु व भिक्षुक आहेत; व ते त्यांचे अनेक धर्मसंस्कार चालवितात. उदाहरणार्थ, मिरजगांव परगण्याच्या माळ्यांचे ' माळगण ' आडनांवाचे भिक्षुक आहेत; आराधी, भुत्ये ह्यांचा भोप्या (गुरु) 'कदम' ( मराठा ); ढोरांचा गुरु 'घोडके'; महारांचा मागता ( भिक्षुक ) ' ढेगुजी मेघुजी '; मांगगारोड्यांचा ' डक्कलवार'. लग्नापेक्षां मोठा संस्कार कोणता असावयाचा ? शास्त्रांनीं त्याला धर्मसंस्कार ठर-विला आहे. म्हणून वास्तविक लग्न धर्माचार्यांनीं लावावयास पाहिजे. परंतु फांसपारधी, कोल्हाटी, कुंचीवाले, वड्डर, गोंड वगैरे हिंदु जाती कोणत्याही धर्माचार्याकडून लग्न न लावितां जातपंचांकडून लावितात. जातीचे समायिक बोभाटे जातगंगेनें किंवा दैवानें मिटवावेत, त्यांत जातिबाह्य व्यक्तीचें किंवा संस्थेचें बोट शिरूं देऊं नये; येवढेंच नव्हे, तर ज्या भानगडी जातिविशिष्ट नसून निवळ व्यक्तिविषयक आहेत किंवा ज्यांचा संबंध इतर जातींशींही तितकाच पोंचून त्यांनाही ज्या सामान्य आहेत, त्या देखील जातीनें मिटवाव्यात असा निर्णय हिंदु समाजानें ठरविला; आणि तो धर्माध्यक्षांनीं व प्राचीन राजांनींही मान्य केला. एखाद्यानें कांहीं दुष्कर्म केलें, जमातीच्या आचाराविरुद्ध किंवा ठरावा-

विरुद्ध आचरण केलें, जातिसंप्रदायाविरुद्ध लग्न लावलें, प्रेतसंस्काराच्या प्रसंगीं मदत केली नाहीं, जमातीनें मागितलेली वर्गणी दिली नाहीं, एखाद्या मानार्हाचा उपमर्द केला, तर जात त्याला शासन करते व पावनही करते. जेथें एका जातींतील एक अगर अनेक व्यक्तींचा किंवा सबंध जातीचा संबंध दुसऱ्या एक किंवा अनेक जातींशीं किंवा सबंध समाजाशीं अथवा राजाशीं पडे तेथें जातींतील विशिष्ट व्यक्तीबद्दल किंवा सबंध जातीबद्दल जबाबदारी अवघ्या जातीवर टाकीत, आणि जातगंगा ती पार पाडी. तथापि जेव्हां एखादा इसम माजून जातीला मोजीनासा होई, तेव्हां धर्माध्यक्षाकडे अगर राजाकडे धांव घेऊन त्यांचे मार्फत जात आपल्या कायद्याची अंमलबजावणी करून घेई. धर्माध्यक्षाची आज्ञा जी जात किंवा जातींतील व्यक्ति उल्लंघी, तिचें पारिपत्य धर्माध्यक्ष राजाकडून करवीत. सारांश, ज्याप्रमाणें गांवकऱ्यांच्या बहुतेक सर्व राजकीय, धार्मिक व सामाजिक कृत्यांची जोखीम गांवगाडा उचली, त्याचप्रमाणें जातभाईच्या कृत्यांचा जिम्मा जात घेई; आणि लोकांवर राजा व धर्माध्यक्ष ह्या दोघांपेक्षांही खराखुरा अंमल जातीचा व गांवाचा असे. ह्यामुळें प्रस्तुत काळीं ज्या अनेक गोष्टी खास राजसत्तेच्या म्हणून कायद्यानें ठरविल्या आहेत, त्यांचा निकाल जात व गांव पूर्वी आपल्या अधिकारांत करी. मागून चालत आलेल्या वळणावर लोक अजूनही त्या करावयास जातात, पण नकळत त्यांजकडून कायदा—केव्हां केव्हां तर फौजदारी कायदा—मोडला जातो. पट्टी वसूल करण्याच्या कामीं स्वराज्याप्रमाणें पाटील कुलकर्णी नाठाळ कुळाच्या चुलींत क्वचित् प्रसंगीं पाणी ओततात, किंवा त्याला अगर त्याच्या माणसांला विहीर बंद करतात. त्यांचें हें कृत्य गांवाला पसंत असतें. पण कुळानें फिर्याद केली तर कायद्याप्रमाणें पाटीलकुळकर्ण्यांना शिक्षा करणें अधिकाऱ्यांना भाग पडतें. हिंदुस्थानांतील ख्रिस्ती लोकांच्या लग्नासंबंधानें १८७२ चा १५ वा कायदा आहे. त्याचें ६८ वें कलम असें आहे कीं, ह्या कायद्याप्रमाणें लग्न लावण्याचा अधिकार नाहीं अशा इसमानें डिस्ट्रिक्ट मॅरेज रजि-

ध्रूरच्या गैरहजरींत ज्यांपैकीं एकजण ख्रिस्ती आहे अशा वधूवरांचें लग्न लावलें तर तो दहा वर्षेपर्यंत सक्तमजुरीच्या शिक्षेस पात्र होतो. सोलापूर जिल्ह्यांत एका महार मुरळीनें आपली नात ख्रिस्ती शाळेंत घातली, व तिचा बाप्तिस्मा झाला. ती उपवर झाल्यावर जातीच्या विचारानें तिनें तिचें लग्न दुसऱ्या एका महार मुरळीच्या मुलाशीं गांवभटाकडून लाविलें. बाप्तिस्मा झालेल्या लोकांचें नांववार सर्क्युलर गांवच्या चावडीस लागत नसतें, आणि त्यांची दौंडीही पण देत नाहींत. तरी पण ' शांतिरस्तु पुष्टिरस्तु ' गांवभट, नवरानवरीचे आप्त, जातभाऊ वगैरे मांडव साजरा करणारी सर्व मंडळी गुन्ह्यांत सांपडली. परंतु युरोपियन माजिस्ट्रेटानें सारासार विचार पाहून खैर केली व भटजीचे चौथ्या प्रहरीं धिंडवडे झाले नाहींत.

जातींतल्या लोकांवरील जें प्रमुखत्व जातीनें आपणाकडे ठेविलें, त्याचा अंमल जोंपर्यंत जातीची संख्या थोडी आणि वस्ती लहानशा प्रदेशांत होती तोंपर्यंत सबंध जात एकत्र जमून करी. जसजशी वस्तिवाडी वाढली आणि लोक दूरदूर ठिकाणीं जाऊन राहूं लागले तसतसें सबंध जात गोळा होणें अवघड पडूं लागलें. तेव्हां जातींतील मुरब्बी व शिष्ट माणसें गोळा होऊन जातप्रकरणाचा निवाडा करीत व तो सर्व जात मान्य करी. कालांतरानें सबंध जातींतील शिष्ट किंवा पंच गोळा करणें सुद्धां अडचणीचें होऊं लागल्यावर जातीजातींनीं आपापल्या प्रमुख घराण्यांतून कांहीं अधिकारी नेमले, आणि जेथें जेथें जातीची वस्ती असे तेथें तेथें त्यांनीं सोयीप्रमाणें सबंध जात अगर पंच गोळा करून जातप्रकरणांचा निकाल करावा, असा त्यांस अखत्यार दिला. अशा प्रकारें स्थानिक जातपंचायतीकडून ज्या वादांचा निर्णय लागत नसे त्यांचा निर्णय लग्न अगर दिवस अशासारख्या प्रसंगीं अनेक ठिकाणचे पंच जमवून लावीत. जातीनें जे अंमलदार नेमले त्यांत **जातपाटील, जातचौगुला** हे प्रमुख होत. ब्राह्मण व क्षत्रिय वर्णांत मोडणाऱ्या जातींत जातपाटील वगैरे अधिकारी दाक्षिण प्रांतीं फारसे दिसून येत नाहींत. स्थान-

परत्वें व जातिपरत्वें जातपाटलाला पुढें लिहिल्याप्रमाणें संज्ञा प्राप्त झाल्या. राजा (लाड वंजाऱ्यांचा), राव, गादीवाला, प्रधान, सरपाटील, देसाई, परगणे पाटील, महालकरी, नाईक, फडनाईक, खोत, मुकादम, अधिकारी, मानकरी, कारभारी, अगेवान, मुखी, पाटीदार, महाजन, शेटिया, बुधवंत, गांवडा, कट्टीमनी, मेहतर, देशमेहतर, वडेरो इत्यादि. जातचौगुल्याला हवालदार, कोतवाल, मोहलेदार, पोलकर, तळवार, ठाणी, हाळी, तेलिया, पड्डर वगैरे. कांहीं जातींत ह्यांखेरीज इतर कामगारही नजरेस येतात. अहमदनगर जिल्ह्यांत 'तेलंगी कानडी' नांवाची जात आकोलें डांगाणांत आहे. तिच्या जातपाटलाला 'नाईक' म्हणतात. त्याच्या हुकमतींत 'प्रधान' आणि 'शिपाई' असतो. प्रधानाच्या सांगण्यावर शिपाई जात गोळा करतो, व अपराध्यास पाटलासमोर इनसाफासाठीं धरून आणतो. नाशिककडील भिल्लांच्या जातपाटलाला 'मेहतर' म्हणतात; आणि त्याचे हाताखालीं 'फौजदार', 'हविलदार' असतात. हविलदाराचें काम जमातीला लोक बोलावणें व फौजदाराचें काम त्या वेळीं बंदोबस्त ठेवणें हें असतें. कर्नाटकांतील 'बेडगू' जातीमध्यें जातपाटलाला 'बुधवंत' म्हणतात, आणि त्याचे मंत्र्यास 'चौलगो' व शिपायास 'कोलकर' म्हणतात. जातकामगारांचा अंमल बहुधा सबंध जातीवर चालतो. कांहीं जातींत त्यांच्या अधिकारास स्थलसीमा घातलेली पाहण्यांत येते. कर्नाटकांतील 'काळकुणबी' जातींत 'गांव बुधवंत' असून त्याचा वरिष्ठ 'महाल बुधवंत' आहे. पुण्याचे सुतारांना 'मेहतर' व त्याचे वर 'देश मेहतर' आहे. न्हाव्यांमध्येंही हे अधिकारी आहेत. आगरी लोकांच्या 'गांवपंचायती' असून 'तर्फपंचायती' ऊर्फ 'पेटापंचायती' आहेत. रत्नागिरीकडील चांभारांच्या जातपाटलाला 'महालकरी' म्हणतात आणि त्याच्या वरिष्ठास 'मामलेदार' म्हणतात. विजापुराकडील महारांचा दर गांवीं 'नाईक' आहे. तेहतीस गांवांच्या नाईकांवर 'कसबेदार' नांवाचा अंमलदार आहे. कसबेदारांचे वरिष्ठाला 'कट्टीमनी' म्हणतात.

हे अधिकारी जातींपैकींच असून वंशपरंपरेचे म्हणजे वतनदार असतात. जातीमध्यें जी कुळी किंवा घराणें मानानें सर्वांत अग्रगण्य असतें तें पाटलाचें. कदाचित् असेंही असेल कीं, पाटलाचें घराणें जातीचें आद्य घराणें असावें. ज्याप्रमाणें राज्य मिळविणाराचें घराणें तें राजघराणें असतें, त्याप्रमाणें जात अस्तित्वांत आणणारें घराणें त्या जातीच्या जातपाटलाचें घराणें असावें असें अनुमान वर ज्या पाटलांच्या संज्ञा दिल्या आहेत त्यांवरून निघेल. शिवाय पाटलाला जातींत पहिल्या 'विड्या टिळ्याचा' म्हणजे सर्वांत मोठा मान असतो. पांढरपेशे व निकृष्ट जाती वजा करतां बाकीच्या मराठजातींत पाटील ही बहुमानदर्शक पदवी आहे. गांवांत डोकें हलविणाऱ्या कुणब्याला—मग तो माळी, धनगर, मुसलमान, कोणत्याही जातीचा असो—लोक बहुमानानें पाटील म्हणतात; आणि कुणब्यांच्या सुनाही सासऱ्याला पाटील म्हणून हांका मारतात, मग तो पाटील घराण्यांतला असो वा नसो. पाटलाप्रमाणें जातचौगुल्याचें घराणेंही जातींत प्रमुख असतें. जातपाटलांचीं व चौगुल्यांचीं कांहीं उदाहरणें खालीं टिपेंत दिलीं आहेत. पाटील हा शब्द पट्ट

---

१ साताऱ्याकडे धनगरांचे पाटील कऱ्हाडचे गावढे आहेत. तिसगांवकडील भोयांच्या नायकाची कुळी काथवटे, राशीनकडील बेरड-रामोशांच्या पाटलाची कुळी खराडे, तेलंगी कानडे जातीच्या नायकाची कुळी सदगीर व भुसनर, भराड्यांच्या पाटलाची कुळी शिंदे, वैदूंच्या व तिरमलांच्या पाटलाची कुळी फुलमाळी, मेढिंगे जोशांच्या पाटलाची कुळी गदाई, कुडमुडे जोशांच्या पाटलाची कुळी भोंसले, नागपूरकडील औषधें विकणाऱ्या गोंड लोकांच्या पाटलाची कुळी ठाकर, फांसपारध्यांच्या पाटलाची कुळी चव्हाण, माकडवाल्यांच्या ( कैकाडी ) पाटलाची कुळी सोनकुचरे, चित्रकथ्यांच्या पाटलाची कुळी गांगर्डी, मांगगारोड्यांच्या पाटलाची कुळी सकट इत्यादि. साताऱ्याकडील धनगरांचा चौगुला ( मह्ला अथवा खर्चा ) देहबा, तेलंगी कानड्यांचा करवर ( ह्या जातींत खाडगीर आडनांवाचा जातप्रधान आहे ), वैदूंचा भोई, तिरमलांचा धनगर, कुडमुड्या जोशांचा पाचंग्या शिणगाण, फांसपारध्यांचा पवार ( ह्याला प्रधान म्हणतात ), कांहीं ठिकाणीं मांगांचा आढळगे, चित्रकथ्यांचा सुपलकर, मांगगारोड्यांचा बोडके इत्यादि. गुजराथेंतील भनसाळी जातीला चौधरी नांवाचा कामगार आहे, तोच ह्या जातीचा चौगुला होय.

( हुशार ) ह्या संस्कृत शब्दापासून निघाला असावा; अथवा पट्ट म्हणजे मुख्य ह्या शब्दापासूनही तो निघाला असेल. कौलाला पट्टा म्हणतात, व इजारा म्हणजे मक्ता. ज्यावरून गांवाचें बाबवार घेणें देणें समजतें अशा गांवाच्या जमाबंदीच्या ताळेबंदाला पट्टा किंवा इजारपट म्हणतात, व तो पाटलाजवळ असतो, आणि पाटील त्याप्रमाणें वसूल करतो. हजिरीच्या तक्त्यालाही हजिरीपट किंवा पट म्हणतात. पाटील, पटवारी ( कुळकर्णी ) हें जुळें पट किंवा पट्टा या शब्दांवरून बरेंच संभाव्य दिसतें. ज्यांजवळ पट्टा किंवा पट असतो आणि त्याबरहुकूम जे पट्टी, सारा, अगर सार्वजनिक वर्गणी वसूल करतात ते पाटील-पटवारी. तेव्हां सबंध जमातींत जो स्मरणाचा धड असून लोकांवर ज्याचें वजन आहे अशा बुद्धिमान् व मुख्य माणसाजवळच जातीचा पट रहावयाचा. कानडी मुलखांत पुष्कळ जातपाटलांना नाईक, गौडा, किंवा बुधवंत ( बुद्धिवान् ) म्हणतात; व सिंध-गुजराथेंत मुखी, अगेवान म्हणतात. जो आपल्या गुणांनीं समाजाला पटला असेल त्यालाच त्यानें आपला पाटील पसंत केला असेल. कोणत्याही बाजूनें पाहिलें तरी पाटील हा असामान्य गुणाढ्य असला पाहिजे, हें उघड होतें. म्हणून असें अनुमान निघतें कीं, मूळ पाटील हा समाजस्थैर्यरक्षणास व समाजाभिवृद्धि करण्यास योग्य असा लोकांनीं निवडलेला पुरुष असावा; आणि वतनाची कल्पना दृढ होईपर्यंत पाटीलकी लोकांच्या पसंतीवर अवलंबून असावी. स्वयंपाकाचे अनेक पदार्थ शिजविण्यास बोघोण्या ( पातेलें ) सारखें दुसरें एकही पात्र नाहीं; म्हणून त्याला बहुगुणी म्हणतात. बहुगुणी याचा अपभ्रंश ब्राह्मणांत बोघोणें व ब्राह्मणेतरांत बघुलें किंवा भगुलें असा झाला आहे. त्याप्रमाणें चौगुला हा शब्द चौगुणी ह्या शब्दापासून निघाला असावा. चार ह्याचा अर्थ अनेक. जसें-चार लोक गोळा झाले. चौ-गुणी म्हणजे अनेकगुणी, अथवा चौगुला म्हणजे चौ-चार चौघे गोळा करणारा किंवा चौकडून-चोहोंकडून गोळा करणारा; आणि चौधरी म्हणजे चार चौघे धरणारा, सांवरून धरणारा, किंवा चोहोंकडून धरून

आणणारा, गोळा करणारा; असे चौगुला व चौधरी ह्यांचे मूळ अर्थ असावेत. चौगुल्याला चौ-लगो असेंही म्हणतात. पूर्व खानदेशांत चोपडें म्हणून तालुक्याचें ठिकाण आहे. तेथील लोक सांगतात कीं, चोपडें म्हणजे चौपाड, चोहोंकडून पहाड, चारी बाजूला डोंगर; किंवा चौ-पाडा म्हणजे अनेक वाड्या असलेला गांव.रा. भारदे म्हणतात कीं, चौगुला हा शब्द चौकुल ह्या शब्दापासून निघाला. असो. पाटलाप्रमाणें चौगुला व इतर जातकामगार ह्यांची नेमणूक पहिल्या पहिल्यानें लोकनियुक्त असावी. पुढें जसजसे संख्येनें लोक वाढत गेले व दूरदूर पांगत गेले, तसतसे त्यांचें एकमेकांतील दळणवळण कमी होत जाऊन जातकामगारांची निवड करणें कठीण पडत गेलें. कामगारांच्या पूर्वजांनीं बजाविलेल्या कामगिरीबद्दल कृतज्ञता, त्यांच्या घरंदाजीबद्दल आदर, ‘ शुद्ध बीजा पोटीं फळें रसाळ गोमटीं ’ निपजतातच अशी श्रद्धा, आणि नवीनाबद्दल दचका व त्याची प्राणप्रतिष्ठा करण्याच्या कामांतील घोंटाळा व त्रास इत्यादि भावनांमुळें जातकामगार निरंतरचे करून टाकावेत असें लोकांना वाटलें असावें; आणि त्यांनीं जातकामगारांच्या कुळ्या ठरविल्या असाव्या. राजाच्या मागें त्याचा मुलगा सिंहासनावर बसतो हा न्याय सर्वांच्या डोळ्यासमोर होताच. राजाधिकाराप्रमाणें सर्व प्रकारचे अधिकार व कामें वंशपरंपरेनें चालवावींत हा मार्ग लोकांना राजमार्ग वाटला आणि जातकामगार वतनदार होऊन बसले.

जातपाटलांचीं मुख्य कामें म्हटलीं म्हणजे जातीच्या वतीनें इतरांशीं बोलणें करणें, जातपंचाईत बोलावणें, आणि तिच्यांत पुढाकार घेऊन जातीचे तंटे निवडणें व अपराध्यास शासन करणें हीं होत. पंचांपुढें येणाऱ्या बखेड्यांत ‘ नाटल्याबाटल्यांच्या ’ खटल्यांची संख्या सर्वांत जास्त असते; याचें कारण जातिभेद होय. अप्रबुद्ध लोक एकमेकांचा दावा बहुशः घराला किंवा वळहईला आग लावून साधतात. कुरापतीचें दुसरें प्रमुख कारण एकानें दुसऱ्याची बायको काढून नेणें

किंवा विधवा अगर कुमारिका गरोदर होणें हें होय. ह्यांनाच लोक 'जळीपळीचीं' भांडणें म्हणतात. जातपंचायतींत ह्याही फिर्यादी पुष्कळ असतात. ह्यांखेरीज जातप्रकरणाचे आणखी दावे झटले म्हणजे लग्नमोहतरांत नवरीच्या बापानें जातीच्या ठरावापेक्षां अधिक पैसा घेणें, बायको न नांदविणें, सोयरिकीचे बखेडे, जातीला अनेगा आहे असें कृत्य करणें, ( जसें, गरती कोल्हाटणीनें कुंकूं लावणें, जोडवीं, बुगड्या, नथ घालणें; वड्डरणीनें किंवा गोंडणीनें चोळी, नथ, बांगड्या घालणें; फांसपारध्यांमधील गाईवरून शिकार करणाऱ्या पोटजातींतल्या लोकांनीं जोडा घालणें) वगैरे होत. पाटील दैवाच्या (जातीच्या) सल्लचानें त्यांचाही इन्साफ करतो. गुन्हेगार जातींत एकमेकांच्या दगलबाजीबद्दलचा न्याय अद्यापि जातीमार्फत होतो. त्याला प्रमाण, इमान किंवा दिव्य म्हणतात. आपल्या साथीदाराला चोरून जर एखाद्या भामट्यानें चोरीचा माल बळकावला असा संशय आला तर जात त्याला 'तेल-रवा' किंवा 'तेल-गोटी' चें प्रमाण करावयास लावते. तें असें कीं, कढईत तेल कढवितात व ज्यावर तोहमत असेल त्याला त्या कडकडीत तेलांतून आंगठी, रवा, गोटी किंवा पैसा हातानें काढावयास सांगतात. तेलानें जर त्याचा हात भाजला नाहीं तर तो निर्दोषी आहे असें समजतात. लंगोटीपारधी नदींत बुडी घेण्याचें किंवा तापलेली कुऱ्हाड घेऊन चालण्याचें प्रमाण करतात. व्यभिचार केला नाहीं ह्याचें इमान कढत तेलांतली आंगठी किंवा पैसा काढून घेऊन फांसेपारधिणीला दर दसऱ्याला आपलें नवऱ्याला करून दाखवावें लागतें. उपनिषद्‌कालापासून आमच्या लोकांची प्रमाणावर श्रद्धा आहे असें दिसतें. छांदोग्योपनिषदांत १६ वे खंडांत उद्दालक आरुणी आपल्या श्वेतकेतु-नामक पुत्राला सांगतो कीं, चोरी न करणाराचा हात तप्त परशूनें भाजत नाहीं, कारण त्याच्या आत्म्याला सत्याचें आवरण असतें. सीतेची अग्निशुद्धि पुराणप्रसिद्ध आहे. असो. चौगुला हा ज़ातपाटलाचा तैनाती किंवा हुजऱ्या होय. पाटील किंवा त्याचा मंत्री ह्यांचे सांगण्यावरून

जमातीस आमंत्रण करणें, जातगंगेपुढें अपराध्यास धरून आणणें, पंचायत जमल्यावर पाटलापुढें कंबर बांधून उभें राहणें, पाटलाला पहिल्यानें टिळा अंबर लावणें व विडा देणें, पाटलापुढें सर्व स्वयंपाकाचीं भांडीं मांडणें, व त्याचा हुकूम झाल्यावर जातीला जेवण्यास बसण्याला सांगणें इत्यादि कामें चौगुल्याचीं होत. जातपंचायती बहुधा तोरणादारीं किंवा मरणादारीं होतात. कांहीं कनिष्ठ जातींच्या-विशेषतः अठरा पगड भिकार जातींच्या--पंचायती मढींच्या कान्होबाच्या वार्षिक यात्रेच्या वेळींही होतात. त्यांत लिहिण्यावाचण्याचें बहुधा अनुष्टुप् असतें. सर्व कारभार तोंडातोंडीं चालतो. पाटलाच्या कामाच्या ह्या स्वरूपावरून 'तोंड-पाटिलकी' म्हणण्याची रूढि पडली असावी. लिहिण्याचें काम पडलेंच तर तें ज्या गांवीं जमात जमते तेथील ग्रामजोशी किंवा कुळकर्णी याजपासून करून घेतात. नुकसानीची भरपाई, सोडचिठ्ठी किंवा ज्याची बायको त्याकडे पाठविणें, दंड अगर जेवण घेणें, वाळींत टाकणें इत्यादि शासनें जात करते. दंडाच्या रकमेचा विनियोग जातीच्या एखाद्या कार्याकडे किंवा देऊळ, धर्मशाळा, चावडी, जातीचीं भांडीं खरेदी करणें वगैरे बाबींकडे करतात. कांहीं जातींत दंडाची रक्कम जात-कामगारांना मिळते. न्हाव्यांत जर चार रुपये दंड घेतला तर त्यांतली पावली चौगुल्यास व बाकी मेहतऱ्याला मिळते. पुण्याकडील सुतारांत देशमेहतऱ्याला दोन रुपये, चौगुल्याला एक रुपया, आणि जेथें जमात जमते तेथल्या देशमुखाला रुपया ह्याप्रमाणें अद्याप बटवडा होतो. कुडमुडे जोशांच्या पंचायतींत जो दंड वसूल होतो त्यांतला रुपया दोन रुपये पाटील ठेवतो, आणि बाकी रकमेचे गहूं घेऊन ते जातींत घरोघर वांटतात. गोंड लोकांत व्यभिचार वगैरेबद्दल रुपया दोन रुपये दंड जात घेते, व तो खाण्यापिण्यांत उडविते. फांसपारध्यांत छिनालीबद्दल १५ ते १२५ रुपये दंड होतो. त्यांतला निंमा पाटील घेतो व निंमा जातींतले गोरगरीब, "तळी तापडी"(त्रस्त), व इतर जमात ह्यांना वांटून देतात. वर जे सरपाटील, मामलेदार, महालमेहतरे, कसबेदार सांगितले ते आपापल्या अधिकाराच्या स्थलसीमेंतील

स्थानिक अधिकाऱ्यांच्या कामाची तपासणी करतात, व प्रसंगविशेषीं ते-ही तीं कामें करतात.

वतनदार अधिकारी असण्याची आवश्यकता ज्या कारणांमुळें जाति-जातींना वाटूं लागली, त्याच कारणांमुळें ती गांवांनाही वाटूं लागली; आणि इष्ट तो फेरफार करून जात–वतनदारांच्या नमुन्यावर गांवानें जाति-परत्वें आपआपले वतनी हुद्देदार कायम केले. वतनपद्धति गांव–गाड्यानें जातीपासून उचलली किंवा जातीजातींनीं ती गांवगाड्यापासून उचलली हें निश्चयानें ठरविण्यास अगोदर गांवें वसलीं किंवा अगोदर जाती बनल्या हें समजलें पाहिजे. गांवांत कायमची वस्ती करून राहिलेल्या जाती जरी पुष्कळ आहेत तरी हल्लींच्या सुरक्षित राज्यांतही शेंकडों फिरत्या जाती दृष्टीस पडतात. कायमच्या धंद्याची आवश्यकता व वृद्धि ह्यांमुळें ह्या फिरत्या जातींनाही स्थाईक होणें भाग पडत आहे; आणि वंजारी, कैकाडी, जोशी, तिरमल, घिसाडी, वड्डर वगैरे जाती आपापल्या सोयी-प्रमाणें कांहीं गांवांत घरेंदारें करून राहिल्या आहेत. ह्यावरून असा ग्रह होतो कीं, अगोदर जाती निर्माण होऊन त्या भटकत भटकत सोयी-सोयीनें गांवांत स्थिरावल्या असाव्यात, आणि जातवतनदारीचा ठसा गांवमुकादमानीवर उमटला असावा. राजाची गादी वंशपरंपरेनें चालते हें पाहून समाजव्यवस्था अखंड चालविण्यासाठीं जातीजातींनीं आपा-पले कामगार वतनी केले, व जाति–पोटजातींची संख्या सहस्रावधि असल्यामुळें गांवोगांव वतनी जात-कामगार फडकूं लागले. जातींचे अधि-कार आधुनिक मताप्रमाणें निर्भेळ सामाजिक नसून त्यांनीं राजसत्ता व धर्मसत्ता ह्यांचाही पुष्कळसा भाग व्यापला आहे. तेव्हां जातिजातींनीं मान्य केलेल्या वतनपद्धतीचीं मुळें राजसत्ता व धर्मसत्ता ह्यांतही ओघानें-च शिरलीं. गुणांवरून राजाधिकारी व धर्माधिकारी नेमण्याचा प्रघात असतो. आपल्या देशांतही एका काळीं तो तसाच असला पाहिजे. पण समाज ज्या संस्था पसंत करतो त्यांचा प्रवेश राज्यव्यवस्था व धर्म-व्यवस्था ह्यांत झाल्याशिवाय रहात नाहीं. एकंदर लोकप्रवृत्ति वतनाकडे

वळल्यामुळें राजाधिकारी व धर्माधिकारी कालांतरानें वतनदार झाले आज आहे उद्यां नाहीं, असल्या मिळकतींत जीव काय ? कांहीं केलें तर तें असें करावें कीं, पिढ्यान्‌पिढ्या त्याला घोर नाहीं, ह्या विचारानें वतन निर्माण केलें. राजानें राज्य कमावलें तें एकट्यानें नव्हे, त्याला अनेक मुत्सद्यांचें आणि वीरांचें साह्य झालें तेव्हां तें त्याच्या हातीं चढलें. राज्य संपादन करण्याच्या कामीं ज्यांनीं आपल्या खांद्याशीं खांदा भिडवून संपत्ति, संतति व आपला स्वतःचा प्राण ह्यांची पर्वा केली नाहीं, त्यांचाच ओढा आपणाकडे असणार, आणि कमावलेलें राज्य संभाळण्यांत त्यांचीच योजना करणें अवश्य व हितकर आहे, असें कृतज्ञतापूर्वक ध्यानांत आणून ज्यांची जशी मदत व प्रेम त्याप्रमाणें राजांनीं त्यांना असाम्या दिल्या. स्वतःबरोबरच आपल्या संतानाच्या कल्याणाचा विचार मनांत न बोलावतां येतो, आणि साहजिक असें वाटावयाचें कीं, नव्याची प्रतीति घेण्यापेक्षां देखला पाणोथा खास बरा. जे आपल्या कामा आले त्यांची संतति आपल्या संततीच्या उपयोगीं पडण्याचा संभव अधिक आहे. पूर्वीच्या धामधुमीच्या काळांत जंगमाची किंमत फार कमी होती. स्थावराला चोरांचिलटांची भीति नाहीं म्हणून तें सुरक्षित असें लोक मानीत. त्यामुळें रोकडीच्या मानानें कमी उत्पन्नाचें स्थावर असलें तरी तें निरंतर टिकणारें असतें, असा विचार मनांत वागवून कामगार रोकडीपेक्षां स्थावराला जास्त चहात. शिवाय ज्या राजानें स्थावराची नेमणूक करून दिली त्याचें राज्य टिकलें तर ती नेमणूक चालेल, ही गोष्ट कोणालाही कळण्याजोगी आहे. तेव्हां स्थावर नेमणुका करून दिल्या म्हणजे त्या स्वस्त्या पडतील व नेमणूकदार आपल्या पोटतिडिकेसाठीं राजनिष्ठ राहातील, इतकेंच नव्हे तर राजासाठीं पैशानें, शरीरानें व स्थावरावरील मालकीमुळें रयतेवर प्राप्त होण्याऱ्या वजनानें झटतीलही, असें भूपतींना वाटणें साहजिक आहे. दुसऱ्या

१ 'तुल्यवेतनोऽस्मि, भवद्भिः सह भोग्यमिदं राज्यम् ।' अशी प्रसिद्ध राजनीति आहे.

बाजूलाही स्वाभाविकपणें असें वाटावयाचें कीं, जर आम्हीं हातावर शिर घेऊन राजाला यशस्वी केलें आणि त्याच्या मुलाबाळांची निचिंती केली, तर त्यानेंही आम्हांला आमच्या मुलाबाळांच्या काळजींतून मुक्त करावें. आम्ही खानदानीचे लोक ज्याचें मीठ खाऊं त्याच्याशीं आमच्या घरचें कुत्रें देखील हराम होणार नाहीं. ह्या उभयपक्षीं मनोमय कयासानें राज्यांतील दिवाण, सेनापति, खजीनदार, फडणीस, मुजुमदार, चिटणीस इत्यादीं-सारख्या महत्वाच्या तहाहयात असाम्या वंशपरंपरेच्या केल्या, आणि रोकड तनख्यामोबदला जमीनमहसूल लावून देण्याची युक्ति काढली. सामान्यत्वें ह्या वंशपरंपरेच्या स्थावर नेमणुकांना इनाम ही संज्ञा प्राप्त झाली. सरकारच्या सार्वजनिक नोकरीच्या मोबदल्याबद्दल जमिनीचें उत्पन्न तोडून देण्याची जी ही योजना निघाली, ती सर्व प्रकारची सार्वजनिक नोकरीच काय पण वैद्यकी, गायन, नर्तनाप्रमाणें थेट निवळ खासगी नोकरी व भीकमाग्या दरवेसपणापर्यंत पांगली. हिलाच **वतनपद्धति** म्हणतात.

वतनपद्धतीला जातीजातींच्या बहुविध जनतेकडून समाजव्यवस्थेंत पाठिंबा मिळाला तसा राजाकडून राज्यव्यवस्थेंत व धर्माध्यक्षांकडून धर्म-व्यवस्थेंत मिळाला. वतनी व्यवस्था गांवकींत सुदृढ व विस्तृत होण्याला वतनी राज्यव्यवस्था व धर्मव्यवस्था जशी कारणीभूत झाली, तशी जाति-पोटजाति व पंथ ह्यांमध्यें जी धंद्यांची विभागणी झाली, तीही बऱ्याच अंशांनीं कारणीभूत झाली. जातिधर्माप्रमाणें अमुक धंदा अमक्या कुडींत जन्म घेणाऱ्या इसमानें करावयाचा असें ठरलें. तो धंदा करणारा गांवांत

---

१ नाहीं म्हणावयाला पुण्यश्लोक **शिवाजी**महाराज मात्र इनाम देण्याला प्रतिकूल होते. "तो शिवाजी बहुधा कोणास जहागिर देत नसे…शिवाजीचे किती एक मानकरी लोक मसलत करीत कीं, लष्करास खर्चाची नेमणूक पर-भारें गांवगन्ना करावी, परंतु तें शिवाजीच्या मनास येईना; कां कीं, ते लोक स्वयें सत्ता करूं लागतील आणि रयतेस उपद्रव होईल हें, तो जाणत असे." ग्रँटडफकृत मराठ्यांची बखर पानें ६४-५.

राहण्याला मुख्य आमिष काय तें सर्वमान्य इनामीं वतन होऊन बसलें त्याचा लोभ कोणालाही सुटेना. उपट पाल आणि पुढच्या गांवाला चाल, अशा रीतीनें गांवोगांव रोजगारासाठीं भटकण्यापेक्षां एखाद्या गांवीं स्थाईक होऊन गिऱ्हाईक बांधून टाकावें, म्हणजे मला काम मिळतें कां दुसऱ्याला मिळतें म्हणून वाट पहात बसण्याची गरज उरणार नाहीं, आणि पोटा-पाण्याची चिंता निरंतरची दूर होईल, ह्या विचारानें जातकसब्यांनीं गांवकी वतनावर उडी घातली. सबब गांवकींतले नुसते राजाधिकारी व धर्माधिकारीच वतनदार होऊन बसले नाहींत, तर राजाच्या असाम्यां-प्रमाणें कारूनारूही गांवचे वतनदार चाकर झाले. परंतु गांवगाड्याच्या उभारणीला व बळकटीला सर्वांत जास्त मदत देशांतील बेबंदशाहीची झाली. आतांप्रमाणें एकछत्री, सुयंत्रित, दक्ष व सक्त राज्यव्यवस्था नस-ल्यामुळें रयतेकडील करभार निश्चित रकमेनें निश्चित काळीं सरकारचे पदरांत पडणें मुष्कील होतें. सरकाराला परचक्राची भीति तर होतीच, पण देशांतले देशांतही शत्रुभय पुष्कळ असे. संस्थानिक, सरदार, इनामदार, ह्यांमध्यें राजसत्तेची विभागणी इतकी झाली होती कीं, मध्यवर्ती सरका-राचा दाब राजधानीबाहेर क्वचित् भासत असे; आणि राज्यांतील मुलूख व लोक ह्यांचें संपूर्ण व पद्धतशीर नियंत्रण राजाच्या आंवाक्याबाहेर गेलें होतें. हिंदुस्थानांत ही स्थिति केव्हांपासून सुरू झाली हें जरी निश्च-यानें सांगतां येत नाहीं तरी ती मुसलमानी रियासतीच्या पूर्वीपासून होती ह्यांत संशय नाहीं. राजांनाही असेंच झालें होतें कीं, राजकीय, धार्मिक व सामाजिक बाबतींत जातीचा भार जितकी जात उचलील व गांवचा भार जितका गांव उचलील तितकें बरें. ह्यामुळें गांवगाडा एक सवता सुभाच होऊन बसला, आणि त्यांतलीं सर्व कामें व कारभार हीं इनामदार अगर वतनदार ह्यांच्याकडे पिढ्यानपिढ्या चालू राहिलीं.

जसजशा राज्याच्या, समाजाच्या आणि गांवकीच्या गरजा वाढत गेल्या, तसतसे इनाम देण्याचे हेतु व त्यांचे प्रकारही वाढत गेले. मुख्य इनाम देणारे दोन—राव आणि गांव. भूमीचे स्वामी राजे होते, तरी त्यांनीं

अमुक वसूल व अमुक चाकरी घेण्याचा ठराव करून गांवाच्या दिमतीला सबंध काळी-पांढरी लावून दिल्यामुळें गांवांनाही जरूरीप्रमाणें इनाम देण्यास ऐपत व मुभा होती. तेव्हां इनामांचे दोन भाग पडतात-सनदी आणि गांवनिसबत. राजानें दिलेल्या इनामांना सनदी म्हणतात व गांव-जमिनींतून किंवा गांवच्या उदिमावर अगर प्राप्तीवर गांवानें दिलेल्या इनामांना गांवनिसबत इनाम म्हणतात. इनाम देण्याचे मुख्य हेतु दोन-चाकरी आणि मेहरबानी. जे स्वतः किंवा ज्यांचे पूर्वज विशेष रीतीनें सरकाराच्या कामास आले, किंवा मर्जीस उतरले त्यांना पारितोषक, म्हणजे कोणत्याही प्रस्तुत अगर भावी चाकरीची अट न घालतां जे इनाम देण्यांत आले ते कृतज्ञतापूर्वक किंवा मेहरबानीखातर दिलेले इनाम होत. हे इनाम जात-इनामांत मोडतात. राजघराण्यांतील किंवा सरदारघराण्यांतील लोकांनाही आपापल्या इभ्रतीप्रमाणें राहतां येण्यासाठीं इनाम दिलेले आहेत. नोकर-इनामांचे ठोकळ तीन भाग पडतातः ( १ ) सरकारच्या लष्करी किंवा मुलकी नोकरीच्या शर्तीवर दिलेले जागीर, फौजसरंजाम, अगर जातसरंजाम यांसारखे इनाम ( 'जा' किंवा 'जै' म्हणजे जागा, नेमणूक; 'गिर' म्हणजे प्राप्त होणें. 'सरंजाम' म्हणजे सामुग्री, सामान. मुसलमानांनीं दिलेल्या इनामांना जागीर अथवा जहागीर व मराठ्यांनीं दिलेल्या इनामांना सरंजाम म्हणत. सरंजाम व जहागीर ह्यांमध्यें विशेषसा फरक नाहीं. ); (२) देऊळ, समाधि, मशीद, दर्गा वगैरें-मधील पूजाअर्चा, दिवाबत्ती, झाडसारवण, उत्सव, यात्रा, उरूस, हगामे यांसारखे समारंभ, इत्यादि चालविण्यासाठीं दिलेले धर्मादाय किंवा देवस्थान इनाम; ( ३ ) गांव, महाल, परगण्याची महसुली, फौज-दारीसंबंधानें गांवकीं व घरकीं कामें करणाऱ्या गांवकामगारांना व परगणे अंमलदारांना दिलेले इनाम. इनाम म्हणून जें कांहीं देण्यांत आलें तें काळीचें उत्पन्न-स्वामित्व नव्हे-म्हणजे महसूल घेण्याचा अधिकार, किंवा इनाम जमीन धारण करणारांना महसुलाची सर्वस्वीं अगर अंशतः सूट देण्यांत आली. इनाम मिळकती दोन प्रकारच्या असतात. प्रत्यक्ष

( दुमाला ) आणि अप्रत्यक्ष ( परभारा ). पहिल्या प्रकारांत इनामदारांना सबंध महाल, गांव किंवा गांवांतील कांहीं जमीन दुमाला करून देत, व धारा वसूल करण्याचा राजाधिकारही त्यांना देत. दुसऱ्या प्रकारचे इनाम नक्त किंवा ऐनजिनसी असत. धारा वसूल करून आपल्या खजिन्यांतून सरकार इनामदारांना जी ठराविक नेमणूक रोकडीनें आदा करी तिला नक्त इनाम म्हणतात; आणि जमीन धारण करणारांकडून इनामदार परस्पर ठराविक घुगरी म्हणजे दर बिघ्यास किंवा नांगरास धान्याचीं अमुक मापें घेत ती, अथवा बाजारहाटांत विकावयास आणलेल्या मालाची शेव-फसकी किंवा वाणगी घेत ती, ह्यांना परभारा हक्क किंवा ऐनजिनसी इनाम म्हणतात.

हे झाले राजरोष इनाम. मध्यवर्ती राजसत्तेच्या कमकुवतपणामुळें, राजे, संस्थानिक व इनामदार, ह्यांच्या गृहकलहामुळें, आणि परस्परांबद्दलच्या साशंक व मत्सरप्रचुर वृत्तीमुळें, वेळोवेळीं अनेक बिनकाळजाचे व कपटी पुरुष रयतेपासून पुष्कळ जमिनी, शेतमाल व पैसा उपटूं लागले; आणि असा क्रम कांहीं दिवस चालवून त्यालाच ते हक्क म्हणूं लागले. त्यांना आकळण्याचें सामर्थ्य गांवगाड्यांत नसल्यानें व ते शिरजोर होईपर्यंत राजांनीं त्यांच्याकडे कानाडोळा केल्यानें तेही कालावधीनें गोमागणेशी इनामदार झाले, आणि गांवगन्ना हक्क उकळूं लागले. खानदेशांत ठोके नांवाचे मुसलमान इनामदार आहेत. त्यांचे पूर्वज सातपुडा, सातमाळ, सह्याद्रिपर्वत व किर्र जंगलें ह्यांचा आसरा घेऊन वाटसरांना ठोकून काढून लुटीत; अशा रीतीनें बळावत जाऊन ते पुढें आसमंतांतील गांवांचेंही काम काढूं लागले. तेव्हां गांवांनीं त्यांना दरसाल ठोक ऐवज पावता करण्याचा ठराव करून त्यांच्या लुटालुटीपासून आपली मुक्तता करून घेतली !! एकोणिसावे शतकाच्या आरंभीं बंडखोर रजपूत व कोळी नाईक ह्यांनीं गुजरातेंत गांवेंची गांवें लुटण्याचा सपाटा लावला, आणि सरकारकडून तर रयतेचें रक्षण होईना !! अशा अवस्थेंत गांवांनीं त्यांना **"थोडा ग्रास"** नांवाची खंडणी (घांसदाणा)

देण्याचें ठरविलें, आणि त्यांनींही गांवांला उपद्रव न देण्याचें व दुसरे कोणी लुटारू गांवांवर आल्यास त्यांचा बंदोबस्त करण्याचें पत्करलें. अशा रीतीनें पुष्कळ तोडा गिरासीये इनामदार अस्तित्वांत आले. सबंध राज्य, संस्थान किंवा सरदारकी वडील मुलाला मिळे म्हणून धाकट्या मुलांचा इतमाम चालण्यासाठीं जो ऐवज देत त्यास "**ग्रास**" म्हणत. सबंध रोटी एकाला गेली खरी, पण इतरांना घांसकुटका कांहीं तरी पाहिजे. तसें, सबंध वसूल सर्वसत्ताधिकारी राजाला दिला, तरी ज्या मानानें राजसत्ता. प्रजासंरक्षणास असमर्थ होती त्या मानानें तें संरक्षण करणारे जे हे छोटे-खानी उपटसूळ राजे झाले त्यांनीं आपल्या हक्काला "**थोडा ग्रास**" हें नांव दिलें, असेंही कांहींचें मत आहे. गांवगाड्याचें भरित सर्वस्वीं वतन-दारांचें असल्यामुळें **वतनवृत्तीचें** संक्षिप्त विवरण आवश्यक झालें. वतनदारांनीं स्वराज्यांत गांवगाडा कसा हांकला ह्याचें दिग्दर्शन पुढील प्रकरणांत येईल.



# गाव-मुकादमानी.

वतनपद्धतीच्यायोगानें गांव जरी एक आपला सवता सुभा झाला होता, तरी त्याचा संबंध परगणे-अंमलदारांशीं हरवक्त आणि प्रांत-अधिकाऱ्यांशीं कधींकधीं पडे. ग्रॅन्टडफसाहेब लिहितात कीं, मोठें सरकार, त्यामध्यें परगणा, त्याचे आंत कर्यात, तिचे पोटीं समंत, तिचेमध्यें महाल, त्याचे आंत तालुका, अशीं दक्षिणेंतील मुसलमानी राज्यांत मुलखांचीं नांवें होतीं. मराठशाहींत सुमारें साठपर्यंत गांवें मिळून तरफ, दीडशें पावणें दोनशेंपर्यंत गांवें म्हणजे दोन चार तर्फा मिळून महाल किंवा परगणा, व कांहीं परगणे मिळून सुभा, ह्याप्रमाणें राज्याचे विभाग केले होते. डोंगराचा किंवा जंगलाचा भाग अमुक एका गांवाच्या हद्दींत सामील केला नसल्यास त्याला तरफेंत घालीत. साधारणतः महालाचें क्षेत्र परगण्यापेक्षां लहान असे. सुभ्याला सरकार, प्रांत किंवा देश म्हणत, व कोठें कोठें सरकार हा सुभ्याचा किंवा प्रांताचा पोटभाग असे. खानदेश, गुजरात, कर्नाटक, वगैरे दूरच्या प्रांतांवर सरसुभेदाराचा अंमल होता. सुभ्यावर कुल अखत्यार सुभेदाराचा असे, व आपल्या ताब्यांतील महाल परगण्यांवर हवालदार, कमाविसदार, मामलेदार, वगैरे अधिकाऱ्यांच्या नेमणुका तो करी. पुढें पुढें हवालदारी वंशपरंपरेनें चालूं लागली आणि हविलदार वतनदार बनले. मामलतींत एक ते तीन परगणे येत; आणि मामलेदार व कमाविसदार ह्यांचे अधिकार जरी सारखे होते, तरी कमाविसदाराचा दर्जा किंचित् कमी असे, व त्याच्या ताब्यांतला मुलूखही कमी असे. तरफदार पगारी कारकून असत, आणि त्यांच्या हाताखालीं चार पांच गांवांवर शेकदार असत. सरपाटील, सरदेशमुख, सरदेशपांड्ये, सरदेसाई व सरनाडगौडा, हे सर्वांत वरिष्ठ दर्जाचे वतनदार अधिकारी होत. पण ह्यांची संख्या फार असल्याचें दिसत नाहीं. दर

प्रांताला दिवाण, फडनवीस, पोतनवीस, मुजूमदार वगैरे वतनदार हुद्देदार असत, त्यांना दरकदार म्हणत. पोतनविसाकडे प्रांताचे नगदीचे हिशेब व फडनविसाकडे सबंध दप्तर होतें. दरकदारांची तपासणी परगणे अमलदारांच्या कामांवर असे. परगणे पाटील, देसक, देशमुख, देशपांड्ये, देशकुळकर्णी, देशचौगुला, परगणे-नाईक, महाल नाईक, हे मुख्य वतनदार परगणे-अंमलदार होत. त्यांना जमेदार, महालजमेदार, जमीनदार अथवा हक्कदार म्हणत. देशपरत्वें त्यांचे निरनिराळे पर्याय झाले. देसाई, नाडगीर, नाडकर्णी, नाडगौडा, मुजूमदार, मोहरीर, मोकाशी, शेकदार, हे सर्व महालजमेदार होत. जमेदार, दरकदार व प्रांत-वतनदार ह्यांना बहुमानानें देशाधिकारी म्हणण्याचा संप्रदाय असे. गांवाला जसे पाटील, कुळकर्णी, जागल्या, तसे परगण्याला देशमुख, देशकुळकर्णी, देशपांड्ये, देशचौगुला, परगणे-नाईक हे होत. देशमुख, देशचौगुला हे मराठे; देशपांड्ये, ब्राह्मण; व महाल नाईक भिल्ल, रामोशी, किंवा कोळी असत. वतनाप्रीत्यर्थ मुसलमान झालेले देशमुख, देशपांड्ये, परगणे-नाईक, कोठें कोठें दृष्टीस पडतात. सर्व ग्रामाधिकारी वंशपरंपरेचे हुद्देदार होते. ह्या वर्गांत नुसतें गांवच्या दप्तरचें काम करणारे गांवकामगार व त्यांचे हाताखालील गांवनोकर येत होते असें नाहीं, तर यांमध्यें गांवच्या नित्यनैमित्तिक गांवकी व घरकी व्यवहाराला उपयोगी असे कारूनारू, उदमी, तमासगीर, भिक्षुक, वगैरे सर्व येत; आणि त्यांना गांवकीसंबंधानें थोडें फार नेमलेलें काम असे. आतांप्रमाणें पूर्वीं उद्योगवृद्धि व प्रवाससौकर्य नसल्यामुळें आणि बहुतेक पगारी व वतनी अंमलदार मिजासखोर बनल्यामुळें ते फिरतीवर निघाले म्हणजे त्यांना गांवगन्ना असतील नसतील तितक्या वतनदारांच्या सेवेची गरज पडे; म्हणून ह्या सर्वांचीं वतनें सरकारनें मंजूर केलीं असावींत. वतनांना देशपरत्वें व जातिपरत्वें निरनिराळीं नांवें पडलीं आहेत. इंग्रज सरकारानें उपयोगाच्या दृष्टीनें त्यांचे तीन वर्ग केले आहेत: सरकारउपयोगीं, रयतउपयोगीं, आणि सरकार व रयत ह्या दोघांनाही निरुपयोगीं. वतनदारांची

शक्य तितकी विस्तृत व वर्गवार यादी खालील टीपेंत दिली आहे.* तिच्यांतील निरुपयोगी वतनदारांच्या नामावळीकडे लक्ष दिलें असतां आठशें लष्कर आणि नऊशें न्हावी अशी अनवस्था झाल्याचें दिसून येईल. हे सर्व वतनदार दरएक गांवांत होते किंवा आहेत अशांतला भाग नाहीं; तरी पण वतनदारी किती फोंफावली ह्याची कल्पना करण्याला ही यादी पुष्कळ उपयोगी पडेल.

---

* ( १ ) सरकारउपयोगी वतनदार–पाटील, राव, खोत, गावडा, गांवकर, नाईक, शेटी, मुकादम, ग्राममनसुबो, मुखी, मत्तादार, वाडेरो इत्यादि.

कुळकर्णी, पांड्या, पटवारी, निसुंदा, तलाटी, कर्णिक, शानभोग, ग्राममिरासीदार, पट्टामणी, करणम्, तापेदार इत्यादि.

महार, धेड, वेसकर, कारभारी, वल्हेर, मांद्गेरू, तराळ, जागल्या, चौगुला, कोळी, भील, रामोशी, मांग, हवालदार, जमादार, नाईकवाडी, रखवालदार, पगी, शेतसनदी, कोतवाल, गस्ती, तळवार, अंबीकार, कोलेगार, मधवी, कोरभू, गडकरी, तशदार, शिपाई, वालीकर, बारकेर इत्यादि.

( २ ) रयतउपयोगी वतनदार–जोशी, गुरव, जंगम, जैनोपाध्याय, काजी, मुलाना, खतीब, मुजावर, सुतार, लोहार, चांभार, कुंभार, आंबेकरी, हळकरी इत्यादि.

( ३ ) ज्यांच्या चाकरीची इंग्रजसरकाराला व त्यांच्या रयतेला जरूर नाहीं असे वतनदार–पोतदार ( सोनार ), शेकदार, महाजन, दलाल, शेटे, घाटपांड्ये, निरखदार, चौधरी, डांगे, दानगट, औटी, मुसरीफ, पथकी, पखाली, जिनगर, मेंढगार, थळेकरी, बेलदार, शिकलदार, नावाडी, न्हावी, तांबोळी, परीट, शिंपी, तेली, माळी, गवंडी, कासार, पिंजारी, भाट, ठाकूर, वाजंत्री, घडशी, जोगी, भुत्या, गोसावी, बैरागी, पुजारी, वाघ्या, मुरळी, जोगतिणी, हिजडे, मुंढ्या, डवऱ्या, भराडी, गोंधळी, भगत, घुगरी, पोतराज, फकीर, भोई, वाटाडे, पानडे, गारपगार, डोलीवाले, कलावंतीण, पाट साफ करणारे इत्यादि.

मोकदम ( मुख्य अदमी ) हा किताब पाटलाला असे. पाटील-चौगुल्या-खेरीज सोनार, शेटे, सुतार, माळी, कुंभार, परीट, तेली, मठपती, वगैरे स्पृश्यजातींच्या वतनदारांना 'बाजेवतनदार' ( बाज म्हणजे संपादन केलेला, गुणी, जसे तालिमबाज ) म्हणत. परंतु साधारणतः गांवचे सगळे श्रेष्ठ वतनदार 'गांव-मुकादम' या नांवाखालीं मोडत. त्यांच्या सामान्यतः तीन ओळी किंवा प्रती करतात, त्या येणेंप्रमाणें--पहिली ओळः सुतार लोहार, चांभार, महार; दुसरी ओळः कुंभार, मांग, परीट, न्हावी; तिसरी ओळः जोशी किंवा भट, मुलाना, गुरव, कोळी. बलुतदारांची वरील-प्रमाणें सर्वत्र प्रतबंदी आहे, असें नाहीं. कारूंचा भरणा, काळी-पांढरी-च्या मानानें प्रत्येकाच्या कामाची निकड, ह्या व अशाप्रकारच्या दुसऱ्या कांहीं कारणांचा विचार करून ज्या त्या परगण्यानें ( कोठें कोठें गांवानें ) आपापल्या सोयीप्रमाणें कारूंची प्रतवारी पहिल्यानें लावली; आणि पुढें जसजशीं प्रथमचीं कारणें कायम राहिलीं, अगर बदलत गेलीं, किंवा नाहींशीं झालीं, तसतसे ह्या ओळींतले कारू त्या ओळींत गेले, किंवा अजिबात कारूंतून नारूंत उतरले, आणि नारूंतले लोक कारूंत चढले. जागल्या, वेसकर वगैरे महारकीच्याच कामाचे पोटविभाग असल्यामुळें अनेक ठिकाणीं हीं सर्व कामें महार करतात, आणि तिन्ही ओळींचें बलुतें घेतात. पाटील, कुळकर्णी हेही बलुतदार होते, आणि ते आपले चाकरी-बद्दल गांवकऱ्यांकडून परभाऱ्याचें ऐन जिनसीं उत्पन्न घेत. वतनदार गांव-मुकादमांचीं पूर्वींचीं कामें व आतांचीं कामें ह्यांत पुष्कळ फरक पडला आहे. परंतु सरकारउपयोगी गांवकामगार ह्यांच्या पूर्वींच्या व आतांच्या

१ अव्वल इंग्रजींत इंदापूर परगण्यांत कारूंची संख्या १४ होती व प्रतवारी येणेंप्रमाणें होती-पहिली ओळः-सुतार, लोहार, चांभार, महार; दुसरी ओळः-कुंभार, न्हावी, परीट, मांग; तिसरी ओळः-सोनार, मुलाना, गुरव, जोशी, कोळी, रामोशी. पंढरपूर परगण्यांत त्यांची संख्या १२ असून प्रतवारी येणें-प्रमाणें होती-पहिली ओळः-महार, सुतार,लोहार, चांभार; दुसरी ओळः-परीट, कुंभार, न्हावी, मांग; तिसरी ओळः-कुळकर्णी, जोशी, गुरव, पोतदार.

कामाबद्दल जितकी माहिती मिळाली तितकी इतर वतनदारांबद्दल मिळाली नाहीं. म्हणून फक्त सरकारउपयोगी गांवकामगारांचीं पूर्वींच्या राजवटींतील कामें येथें नमूद करण्याचें योजिलें आहे.

दर गांवाला पाटील असतो. पाटील हा कांहीं कोणी राजानें दिलेला हुद्दा नसावा. जातपाटलाच्या नमुन्यावर सर्वश्रेष्ठ गांवमुकादमाचें पाटील हें नांव ठेवलें असावें. जातपाटलाचें वर्णन दिलें आहे त्यावरून गांवपाटलाच्या दर्जाची व अधिकारमर्यादेची अटकळ बांधतां येईल. जातपाटलाचे सर्व अधिकार गांवपाटलाला असून खेरीज तो गांवांतला राजाचा प्रतिनिधि होता व आहे. पाटलाला गांवचा प्रभु म्हटलें तरी चालेल. बहुतेक गांवांमध्यें सुरक्षिततेसाठीं इतर वस्ती मध्यभागांत व पाटीलगढी गांवकुसाजवळ माऱ्याच्या ठिकाणीं घातलेली आढळते. गांव वसविणारा पुढारी बहुशा गांवपाटील झाला. ज्यांनीं गांव वसविला त्या मिरासदारांपैकीं पाटलाचें घराणें प्रमुख व म्हणून गांवांत मानानें सर्वांत वडील असावयाचें. जो गांवची बाजू सांवरून व उचलून धरणारा आणि गांवाला घेऊन चालणारा म्हणून रयतेला पटला, आणि सरकारी काम, वसूलवासलात, बंदोबस्त बिनबोभाट करणारा म्हणून सरकाराला पटला, तो गांवचा पाटील केला. वतनाची कल्पना निघून ती पूर्णपणें रुजेपर्यंत पाटलाची नेमणूक सरकार व लोक ह्यांच्या पसंतीवर अवलंबून असावी. पाटलांना गांवापुरते मुलकी, दिवाणी, फौजदारी वगैरे कुल अधिकार असत. सर्व पाटील घरंदाज व त्यांतले बहुतेक सरदार असल्यामुळें त्यांना राजाचे बहुतेक अधिकार मिळाले, व ते त्यांनीं नेकीनें गाजविले. भोंसले, दाभाडे, पवार, गायकवाड, शिंदे, होळकर, ह्यांनीं राज्यें कमावलीं तरी ते पाटिलकीला कवटाळून राहिले, आणि त्यांनीं नवीन पाटीलवतनें संपादन केलीं. महाप्रतापशाली **महादजी** शिंद्यांना पाटील म्हणवून घेण्यांत भूषण वाटें हें इतिहासप्रसिद्ध आहे. ' उतरंडीला नसेना दाणा । पण दादल्या असावा पाटील राणा ॥ ' ही म्हण पाटलाचा मानमरातब व्यक्त करते. असो. पाटलाचीं मुख्य कामें खालीं लिहिल्याप्रमाणें होतीं.

एका पाटलाच्या जुनाट कैफियतींत पुढील वाक्य आढळलें. 'गांवची चाकरी, लावणी, उगवणी वगैरे जें सरकाराचें काम पडतें तें करीत असतों.' आतां ह्या सूत्राचा विस्तार थोडक्यांत पाहूं. नवीन कर्दी कुळें उभीं करणें, रयतेच्या विचारानें काळीचा आकार ठरविणें, गांवचें सरकारदेणें मुकरर करणें, तें वसूल करून तहसिलींत पाठविणें, सरकाराच्या हुकुमांची रयतेला समज देणें व त्यांची अंमलबजावणी करणें, गांवातर्फे सरकारनें दिलेला कौल घेणें व कतबा लिहून देणें, मामलेदाराकडून रयतेला तगाई मंजूर करवून आणविणें व फेडीचा जिम्मा आपण घेणें, रयतेचे हक्क, तक्रारी, सूट, तहकुबी वगैरेंबद्दल सरकारांत दाद लावणें, गांवाच्या संरक्षणासाठीं जरूर ती तजवीज करणें, जागल्यामार्फत आल्यागेल्याची, नवख्या व वहिमी लोकांची खबर घेणें, गुन्ह्यांचा तलास करणें, ज्यावर गुन्ह्याचा आळ बसत असेल त्याला पकडणें, गुन्हेगारांना कैद करणें, फटके मारणें व त्यांजकडून गुन्हेगारी घेणें, जातप्रकरणी अगर सावकारी तंटे स्वतः अथवा पंच बोलावून मिटविणें, पंचनिवाड्याप्रमाणें चालण्याबद्दल जामीनकतबा घेणें व तो अमलांत आणणें, गांवची शिवतक्रार असेल तर दोन्ही गांवांच्या शिवारांतील ढेंकळें डोक्यावर घेऊन तंट्याच्या शिवेवर चालत जाऊन प्रमाण करणें, गांवावर बंड, दरोडा आल्यास शिबंदी जमवून त्याचा मोड करणें इत्यादि कामें पाटील करीत. एकंदरींत पाटील हा जितका सरकारचा अधिकारी तितकाच तो रयतेचा कैवारी होता. रयतेला मदत मिळून तिजकडून काळीची मशागत उत्तम होईल, तिजवर सरकारदेण्याचा जास्ती भार पडणार नाहीं, व तिला चोराचिलटांचा उपद्रव लागणार नाहीं, ह्यांस्तव सर्व तजविजी व खटपटी पाटील करी. गांवांत ज्या जातीचे कुणबी किंवा ज्या जातीचा भरणा असतो त्या जातीचा पाटील राहतो. ब्राह्मण पाटील क्वचित् असतो. बहुतेक पाटील मराठे व त्यांच्यानजीकच्या जातीचे असतात. मुसलमान पाटीलही कित्येक ठिकाणीं नजरेस पडतात; त्यांचे पूर्वज बहुधा वतनासाठीं मुसलमान झाले असावेत. बोलणें, चालणें, कुळांची माहिती, पीक-

पाण्याचा अंदाज, गुन्ह्याचा तलास, गांवासंबंधीं सरकारी खासगी व्यवहार वगैरे गोष्टींत ते चांगले वाकबगार असत. परंतु त्यांना लिहिण्याचें अंग अगदीं जुजबीं, बहुतेक नव्हतें म्हटलें तरी चालेल.

पाटील स्मरणाचा कितीही धड झाला तरी वर नमूद केलेलीं त्याचीं गांवकीचीं कामें लिहिण्यावांचून चोख होणें कठीण. सबब त्याला लेखक मदतनीस अवश्य झाला. ह्या मदतनिसाला स्थलपरत्वें पटवारी, कुलकर्णी किंवा पांड्या म्हणतात. ' नांव लिहिणें ' हा एक पूर्वीं जमेदारी हक्क होता. पट म्हणजे इजारपट ( गांवचा मुख्य हिशेबी कागद ) करणारा तो पटवारी, किंवा कुळें करणारा म्हणजे कुळवार गांवचा हिशेब लिहिणारा तो कुलकर्णी. हा शब्द बहुधा दक्षिण हिंदुस्थानांतून उत्तरेकडे आला असावा, कारण द्राविडी भाषेंत शेतकऱ्याला "**कुल**" व कुळकर्ण्याला "**करणं**" म्हणतात. पांड्या हा पंडित शब्दाचा अपभ्रंश आहे. कुळकर्णी हा पाटलाचा हिशेबनीस होय. कुळकरणवतन सुमारें हजार वर्षांचें जुनें आहे असें सांगतात. बहुतेक कुळकर्णी ब्राह्मण, कांहीं प्रभु व क्वचित् मराठे, लिंगायत, व मुसलमान आहेत. पाटिलकीच्या खालोखाल कुळकरणालाही महत्व असे, आणि पेशव्यांपासून तों खालपर्यंत सर्व ब्राह्मण सरदार त्याला बिलगले. सोनपतपानपत खेटलेल्या **अंताजी माणकेश्वरानें** राशीनच्या देवीच्या देवळाभोंवतीं ओंवऱ्या बांधल्या; त्यांच्या शिलालेखांत सरदारी, जहागिरदारी वगैरेंचा उल्लेख न करतां "कुळकर्णी कामरगांव" इतकेंच उपपद त्यानें आपल्या नांवापुढें लाविलें आहे. ही गोष्ट कुळकर्ण्यांचा सामाजिक दर्जा उत्कृष्ट रीतीनें दाखविते. कुळकर्णी गांवच्या दप्तरचें सर्व काम करी. शिवाराचें कमाल क्षेत्र, आकार व वर्णन ह्यांचा आकारबंद, शेतवारपत्रक, लावणीपत्रक, पडपत्रक, सरकारी देण्याचें असामीवार वसूलबाकीपत्रक व त्याची बाबवार फाळणी आणि जमाखर्च, गुरांची व माणसांची गणति वगैरे मुलकी कागदपत्र; दिवाणी कामांतील पंचायतीचे सारांश व फैसलनामे, फौजदारी कामाचे कागद वगैरे लेखी कामें

कुळकर्णी करी. ह्यांखेरीज गांवकऱ्यांचीं पत्रें, देण्याघेण्याचे दस्तैवज, पावत्या व त्यांचे सावकारी सरकारी देण्याचे जमाखर्च ,हेंही लिहिणें तो लिही.

गांवकीच्या कसबी कामाची जातवार वांटणी झाल्यावर बेगार काम उरलें. तें कोणतीही हुन्नरी जात पत्करीना. असें हें पडून राहिलेलें काम महारांच्या गळ्यांत पडलें; म्हणूनच महार म्हणत असतात कीं, आम्ही काय पडल्या कामाचे चाकर. जें काम करण्याला अभ्यास, कला किंवा विशेषसें ध्यान नको त्याला **बेगार** ( बे–कार ) म्हणतात. रोख मेहनतान्या-वांचून करावें लागतें त्या कामाला तेलंगणांत 'वेट्टी' म्हणतात; तेव्हां ह्या शब्दापासून ' **वेठ** ' शब्द निघाला असावा. गांवगाड्याचा खराखुरा वेठ–बेगारी किंवा हरकाम्या फरास **महार** होय. जागल्याचे पर्यायशब्द ' **रामोशी** ' व ' **भिल्ल** ' हे आहेत. 'अमुक वर्षीं मांग अगर मुसलमान रामोसकीवर होता, भिलाबरोबर आरोपी पाठविला ', असें लोक बोलतात. ' रान–वासी ' ह्या शब्दापासून रामोशी शब्द निघाला असावा. वेसकर व रामोशी ह्या व्यवसायवाचक शब्दांवरून महाराचा जावता वेशीच्या आंत असावा असें वाटतें. तरी पण तुफानी रानटी जाती निवळून गांवांत येईपर्यंत पांढरीप्रमाणें काळीचा चौकी-पहाराही महाराकडे होता; आणि रामोसकी उर्फ जागलकी हें महारकी वतनाचा एक पोटविभाग आहे,हें अनुमान जास्त सबळ व सप्रमाण दिसतें. ग्रामसीमांच्या वादांत सीमारक्षक ह्या नात्यानें गांवमाहारानें दिव्य केल्याबद्दल ऐतिहासिक लेखही प्रसिद्ध झाला आहे. असो. महारांच्या कामाची पाळी आली व संपली म्हणजे ' **काठी** ' आली व पडली असें म्हणतात,कारण कामगार महाराचे हातांत भली मोठी कांठी असते. पाळीप्रमाणें सर्व वतनदार महारांच्या हातीं वेसकरकीची काठी चढते.वेस-कर हे तेवढ्यापुरते समस्त महारांचे नाईक समजले जातात; आणि ते वेशीवर किंवा चावडीवर हजर राहून कामगार महारांच्या बाऱ्या वगैरे लावतात, व जरूर तितके महार कामावर आणून गुदरतात. मुलकी,फौज-दारीसंबंधानें महारांचीं मुख्य कामें येणेप्रमाणें होतः–पट्टीसाठीं असाम्यांना;

बोलावणें व तगादा करणें; गांवचा वसूल तहसिलींत घेऊन जाणें कागदपत्र परगांवीं पोंचविणें; पाटीलकुळकर्ण्यांबरोबर गांवांत व शिवारांत हिंडणें आणि परगांवीं जाणें; गांवांत मुक्कामाला मोठे लोक, अधिकारी आले म्हणजे त्यांच्यासाठीं सरपण चारा आणणें, त्यांच्या जनावरांची मालीस करणें, त्यांना दाणापाणी दाखविणें, शेणलीद काढणें, व त्यांच्या तळावर '**बशा**' ( बसलेला ) बसून राहणें; गांवची व कामगारांची वेठ–बेगार वाहणें, त्यांना वाट दाखविणें; वाटसरांना जंगलांतून नेऊन पोंचविणें; ज्या गोष्टी लोकांना जाहीर करावयाच्या असतात त्यांची दौंडी देणें; गांवची शीव व शेताच्या बांध उरुळ्या ध्यानांत धरणें, त्या न मोडल्या जातील अशी खबरदारी घेणें व त्यांबद्दलच्या भांडणांत पुरावा देणें; दरोबस्त पिकें व खळीं राखणें; रात्रीं काळीपांढरींत गस्त घालणें व गांवचें जंगल व झाडें जतन करणें; जंगली जनावरें मारणें; रात्रंदिवस घाटांत पहारा करणें, चोरवाटा व माऱ्याच्या जागा ह्यांची माहिती मिळविणें व त्या रोंखणें; गांवांत आल्यागेल्याची खबर काढणें, न देखल्या माणसावर नजर ठेवणें, वहिमी लोकांची पाटलाला वर्दी देणें; गांवांतल्या माणसान्–माणसांची चालचलणूक लक्षांत ठेवणें; चोरांचा तपास लावणें व माग काढणें, चावडीपुढें, वेशीपुढें व गांवचे रस्ते झाडणें, गांव साफ ठेवणें, मेलें जनावर ओढणें वगैरे होत. ह्यांशिवाय घरकीं कामें महार करीत. गांवकीवर नेमून दिलेल्या महारांना '**पाडेवार**' म्हणत. घरकीं कामें करणाऱ्या महाराला '**राबता' महार** किंवा '**घरमहार**' म्हणत. वतनदार महारांचीं घरकीं कामें येणेंप्रमाणें आहेत:—कुणब्याचें बीं, औत, काठी वगैरे ओझ्यांची शेतांत नेआण करणें, दारापुढें झाडणें व गुरांचे गोठे साफ ठेवणें, सर्पण आणणें व फोडणें; मुऱ्हाळी जाणें, मिरासदार परगांवीं जाण्यास निघाला असतां त्याचेबरोबर गड्याप्रमाणें जाणें, चिठ्ठ्याचपाट्या परगांवीं नेणें, मौतीची खबर परगांवीं पोंचविणें, सरण वाहणें इत्यादि. हीं सर्व कामें अशीं आहेत कीं, महाराचें प्रत्येकाच्या घरीं व शेतांत येणेंजाणें घडे. त्यामुळें गांवचा खडान्खडा त्याला ठाऊक असे. शेत, बांध किंवा गांवची

शीव ह्या.बद्दल भानगड उपस्थित झाली कीं महाराच्या साक्षीवर सगळी भिस्त असे. रयतेच्या दृष्टीनें हा महाराचा फारच मोठा उपयोग होता, कारण वांटपांच्या कामांत भाऊवांटण्या व वहिवाट ह्यांची खात्रीशीर माहिती महार सांगत. सर्व वतनांत महारकी वतन अत्यंत समायिक असल्यामुळें महार आपापसांत वेसकरकी, गांवकी व घरकीच्या कामांवर जरूर तितके इसम नेमून देत. फौजदारी व मुलकी कामें एकट्या महाराकडे राहिलीं अशीं गांवें थोडीं आहेत. पुष्कळ ठिकाणीं त्यांची फारकत होऊन फक्त गांवकी घरकीचीं मुलकी कामें व जातहक्क—जसें पडें ओढणें, सरण वाहणें—हीं महारांनीं आपणांकडे ठेविलीं; आणि फौजदारी स्वरूपाचीं कामें जागले, नायकवाडी ( जासूद ), कोतवाल, हवालदार, ( खळें—राखण ), शेतसनदी ( गांवलष्कर ), ह्यांच्या गळ्यांत घातलीं. नायकवाडी, कोतवाल, हवालदार, कांहीं कांहीं गांवांत आढळतात, परंतु जागले मात्र सर्वत्र आढळतात. अगदींच लहान गांव असला तर तेंथें महारकी व जागलकी एकाच इसमाकडे असतात, व तो जातीनें बहुधा महार किंवा मांग असतो. हवालदार, नाईकवाडी इ. बहुधा मुसलमान, मराठे, सोनार, कोळी वगैरे जातींचे लोक असतात. भील, कोळी, रामोशी, मांग, मुसलमान, महार व क्वचित् कुणबी, हे जागले असतात. **जागल्या** म्हणजे गांवचा पोलीस शिपाई. त्याजकडे बहुधा पोलिसचें काम असतें. तो जातीचा मांग असल्यास येणेंप्रमाणें घरकीं कामें करतो. केरसुण्या, कुंचे, शिंकीं, सोल, नाडे, कासरे, लहान मोठे दोरखंड, घोड्यांच्या आघाड्या, पिछाड्या, वेल्हें, वेठण, प्रेताची सुतळी वगैरे पुरविणें. दौंडी, कुस्त्या, यात्रा, लग्नकार्य इत्यादि प्रसंगीं महार संबळ सनई व मांग डफ वाजवितात. फांशीं देण्याचें काम मगांखेरीज दुसरे कोणी करीत नाहीं. जागल्या मांगाव्यतिरिक्त जातीचा असल्यास तोही आपल्या जातीचीं गांवकी घरकीचीं कामें करतो.

गांवगाड्याचा हरकाम्या महार खरा; पण जातिभेदामुळें त्याला चावडी चढतां येत नसे. त्यामुळें शिवाशिवीच्या कामांत **चौगुला** हा

पाटीलकुळण्र्याचा तैनाती झाला. तो बहुधा पाटलाच्या जातींचा असे. त्याचीं कामें-चावडीची झाडलोट, गांवच्या दप्तरची ठेवरेव, दिवाणी मुलकी फौजदारी वगैरे कामांसंबंधानें लोक चावडीवर बोलावणें, आणि तेथें पाटील-कुळकर्णी सांगतील तें खिजमतीचें काम करणें इत्यादि. पाटील-कुळकर्ण्यांना चौगुल्याच्या चाकरीची गरज फक्त सरकारी कामासंबंधानेंच लागे असें नाहीं. पूर्वीची राज्यव्यवस्था व समाजव्यवस्था आणि पाटील-कुळकर्ण्यांच्या अधिकारांचें व कामांचें क्षेत्र मनांत आणलें, म्हणजे हें उघड होतें कीं, त्यांना गांवकीच्या सार्वजनिक बाबतींमध्यें चावडी भरविण्याचे अनेक प्रसंग येत; आणि त्या वेळीं चौगुल्याला काम पडे. नगर जिल्ह्यांतील अकोलें तालुक्यांत असें सांगतात कीं, कोणी मोठा माणूस गांवीं आला म्हणजे स्वयंपाकाचीं भांडींकुंडीं जमविणें व तीं उटणें हीं चौगुल्याचीं कामें होत. वतनदार चौगुले व त्यांचे इनाम फार थोड्या ठिकाणीं नजरेस पड-तात. स्वराज्यांत हरएक कारणानें जो पैसा जमेला येई त्याला '**तहसील**' '**इरसाल**' '**पोता**' असें म्हणत. पूर्वीं टंकसाळी नव्हत्या, सबब खरें खोटें नाणें ओळखणें कठीण जाई. खाजगी देण्याघेण्यांत नाणें पारख-ण्याची अडचण येईच, पण विशेषतः गांवचा पोता तहासिलींत ( तालुका-कचेरी ) पटविण्याची फार जिकीर पडे. खोटें म्हणून जर तहसिलींतून कांहीं नाणें परत आलें तर तें कोणाच्या माथीं मारावें याचा पाटलाला मोठा बुचकळा पडे. ह्या सर्व गोष्टी ध्यानांत आणून गांवानें सरकारी आणि खासगी देण्यांतलें नाणें पारखण्याला व त्याच्या खरेपणाबद्दल जिम्मा घेण्याला सोनार उभा केला; आणि त्याच्या हुद्द्याचें नांव '**पोतदार**' ठेविलें. सोनारांमध्यें पोतदार ही बहुमानाची पदवी आहे. तालुकाकचेरींत जमेचे पैसे जो सराफ कारकून तपासून घेतो त्याला अजून पोतदार म्हणतात. गांवच्या सोनारानें एकदां कां गांवकऱ्याचे पैसे पारखून घेतले आणि त्यांमध्यें पुढें मागें खोटें किंवा बिन चलनी नाणें निघालें तर तें त्याला पुरें पाडावें लागे. त्याची तोषीस रयतेला बसत नसे. ह्या गांवगाड्याचे कामाखेरीज तो कुणब्यांचें व अलुत्या-बलुत्यांचें सोनार-

काम करी. सुतार, लोहार, वगैरे कारू आपापलीं जातकामें करीत व अजूनही करतात. त्यांचीं प्रस्तुत कामें बलुतें–अलुतें ह्या प्रकरणांत विस्तारानें सांगितलीं आहेत.

मुसलमानी अमलांत तहसिलीचा वसूल करणें हें देशमुख, देशपांड्ये ह्यांचें मुख्य काम होतें. त्यांचेकडे फौजदारी काम असल्याचें दिसून येत नाहीं. तथापि गांवाची किंवा शेताची शीवतक्रार, इनाम, वतनें वगैरेंची वारस-चौकशी, वांटणी इ. दिवाणी पंचायतींत ते प्रामुख्यानें असत. सरकारतर्फें आपापल्या महाल परगण्यांतील पाटलांशीं ते गांवच्या महसुलाचा ठराव करीत. वसुलाची सूट, तहकुबी मागण्यांत, तगाई आणविण्यांत व ह्यासारख्या इतर रयत–हिताच्या कामांत पाटीलकुळकर्ण्यांना त्यांचें चांगलें पाठबळ असें. पुढें पुढें मुसलमान राजे सबंध परगण्याच्या वसुलाचा इजारा त्यांना देऊं लागले. त्यामुळें त्यांची सत्ता अनावर होऊन ते सरकारला धाब्यावर बसवून बेलाशक वसूल तोंडांत टाकूं लागले. मराठेशाहींत त्यांचे बहुतेक वसुली अधिकार संपुष्टांत येऊन ‘ खालसा ’ ( सरंजमाप्रीत्यर्थ दुमाला न झालेला ) महाल मामलेदारांकडे किंवा कमाविसदारांकडे कमाविसीनें देत. तथापि पाटील, कुळकर्णी इरसाल भरण्याचा हिशेब देशमुख देशपांड्यांकडे गुजरीत; आणि सालअखेर मामलतीचा ताळेबंद आपल्या दप्तराशीं रुजू पाहून तो बरोबर आहे अशाबद्दल देशमुखदेशपांड्यांना व दिवाण, फडनवीस, पोतनवीस वगैरे दरकदारांना त्यावर व त्यासारख्या दुसऱ्या हिशेबी कागदांवर मखलसी करावी लागे. महालजमेदार पिढीजाद वतनदार असल्यामुळें सरकारांत त्यांना शिरकाव मिळे व ते मामेलदारांच्या जुलमाबद्दल व गैरवर्तनाबद्दल दरबारांत कानगी करीत. त्यामुळें पंगारी कामगारांना त्यांचें एक प्रकारचें बुजगावणें असे. गांव–जागल्यांवर जशी पाटलाची देखरेख असे तशी परगण्यांतील समस्त जागल्यांवर परगणे–नायकाची होती.

गांवमुकादमांना व महालजमेदारांना नोकरीबद्दल सरकारांतून इनाम म्हणजे दुमाला जमिनी, नक्त नेमणुका व रयतेवर रोखीचे अगर

ऐन-जिनसी परभारा हक्क असत. इनाम जमिनी बिन धाऱ्यानें किंवा कंमी धाऱ्यानें चालत; आणि नक्त नेमणुका गांवच्या ऐन जमेवर बसविल्या असून त्या सरकार वसूल करी आणि आपल्या खजिन्यांतून नेमणूकदारांना खर्चीं घालून आदा करी. पूर्वीं दाम-दुकाळ होता. सरकारसुद्धां आपलें येणें रयतेकडून धान्याच्या रूपानें घेई. मेहनताना किंवा हक्क चुकविणें रयतेला सोपें जावें म्हणून वतन-पद्धतींत सर्व सरकारी खासगी देणें ऐन जिनसीं देण्याचा प्रघात पडला. सोयीप्रमाणें ऐन जिनसी हक्क रयत कधीं कधीं रोकडीनेंही आदा करी. ज्याप्रमाणें वतनदार कामदार कुणब्यांकडून काळीवर सळई, पेंढी, घुगरी किंवा बलुतें घेत त्याप्रमाणें ते पांढरीमध्यें हुन्नरदार, दुकानदार यांजकडून कसबवेरो, शेव, फसकी, वर्तळा घेत. पांढरी-हक्कांना मोहतर्फा म्हणतात. पाटीलकुळकर्ण्यांच्या मानानें देशमुख-देशपांड्याचे इनाम, हक्क व मानपान पुष्कळ अधिक असत. देशमुख-देशपांड्यांच्या हक्कांना 'रुसुम' व 'भिकणें' म्हणत. गांवमुकादमांत पाटीलकुळकर्णी अधिकारानें व मानानें सर्वांत श्रेष्ठ होत. देशमुखाला परगण्याच्या एकंदर वसुलाचा व लावणीचा विसावा हिस्सा व देशपांड्याला चाळिसावा हिस्सा, आणि पाटीलकुळकर्ण्यांना गांवच्या राशीचा दहावा हिस्सा मिळे, असा अंदाज आहे. कुळकर्ण्यांच्या बाबती पाटलाच्या निमानिम होत्या; आणि दोघांना गांवापुरते देशमुख-देशपांड्यांप्रमाणें सर्व-पण कमी प्रमाणांत-बाबती, हक्क, व अम्मल मिळत. मामूलप्रमाणें महारांना गांवकी घरकीबद्दल नांगरामागें आठ पाचुंदे बलुतें मिळे; बाकीच्या पहिल्या ओळीच्या कारूंना चार, दुसरीच्यांना तीन व तिसरीच्यांना दोन पाचुंदे याप्रमाणें बलुतें मिळे. स्थलपरत्वें निरनिराळ्या परगण्यांत किंवा एकाच परगण्यांतील निरनिराळ्या गांवांत बलुत्याचे निरनिराळे निरख होते हें सांगणें नकोच. देशमुख-देशपांड्ये, व पाटीलकुळकर्णी ह्यांच्या बाबती व अंमल काय होते याजबद्दलचीं टिपणें या प्रकरणाच्या शेवटीं दिलीं आहेत.

गांवगाड्याचा सर्व प्रकारचा कारभार चावडींत होतो. कचेरीला सर-

कारवाडा किंवा वाडा म्हणतात. वाडी हें स्त्रीलिंगी रूप लघुत्व दाखवितें. चौ–वाडी चारचौघेजण जमण्याचें ठिकाण तें चावडी. रा. भारदे ह्यांच्या मतें हा शब्द चव्हाटी ह्या शब्दापासून निघाला. गांवकऱ्यांचे परस्पर घरकी व गांवकी व्यवहार एकमेकांत किती गुरफटले होते व आहेत हें जातवतनदार व गांववतनदार ह्यांच्या कामांचें वर जें दिग्दर्शन केलें आहे त्यावरून लक्षांत येईल. चावडीवर नुसते सरकारी व सार्वजनिक व्यवहारच होत नसत. खाजगी वाद, भानगडी सुद्धां चावडीवरच येत. मोठ्या वस्तीच्या गांवांत जातीजातींनीं आपापल्या खास सार्वजनिक कामासाठीं गांव–चावड्यांखेरीज स्वतंत्र जात–चावड्या बांधल्या आहेत. शहरांतून अनेक पेठा आणि त्यांच्या अनेक चावड्या व पाटीलकुळकर्णी पाहण्यांत येतात. महार, मांग वगैरे अस्पृश्य जातींच्या लोकांना गांव–चावडींत येऊन बसतां येत नाहीं; म्हणून बहुतेक खेड्यांत एक गांव–चावडी व दुसरी महार–चावडी अशा दोन चावड्या नजरेस पडतात. पाटलाची गादी गांव–चावडींत असते. तेथें पाटीलकुळकर्णी आपली कचेरी करतात, आणि आपल्या नानाविध वतनदार नोकरांच्या मदतीनें गांवचा कारभार हांकतात. सर्व प्रकारच्या पट्ट्या–विशेषतः सरकार–सारा–पटविण्याचें मुख्य ठिकाण चावडी असल्यामुळें चावडी शब्दाचा विशेष अर्थ सरकार–पट्टी असा झाला आहे. चावडी दिली म्हणजे सरकार–सारा दिला असा अर्थ होतो. लोक नेहमीं पट्टीपासोडी हा जोड शब्द वापरतात, त्यांत पासोडी ह्याचा अर्थ पाटील हक्क असा असावा; कारण पाटील इनामाला 'पासोडी' इनाम म्हटलेलें जुन्या कागदपत्रांत आढळतें. असो. सरकारची गांव–कचेरी म्हणून आपण चावडीकडे पाहूं आणि गांव–मुकादमानीचें थोडक्यांत सिंहावलोकन करूं.

गांवचीं देवस्थानें, धर्मादाय, जत्रा, उत्सव, खेळ, परगणे–अंमलदार, गांव–मुकादम इत्यादींच्या सरकारनें मंजूर केलेल्या गांवावर खर्च पडणाऱ्या नेमणुका व वर्षासनें; गरिबांना भिक्षा, आणि आल्यागेल्यांची सरबराई; अधिकाऱ्यांना नजरभेटी आणि चिल्हर खर्च; वगैरे बाबती

मिळून वसुली रकमेच्या शेंकडा १० ते २० पर्यंत समस्त 'देहखर्च' किंवा गांवकीचा खर्च होत असे. तो सगळा सरकार क्वचित् मंजूर करी. ह्यामुळें आपसांत फाळा करून गांवकरी '**गैरसनदी**' ( नामंजूर ) खर्च भागवीत असत. गांवचे हिशेब सरकारांत पटविण्यासाठीं तेथील हिशेबनिसाला लांच द्यावा लागे; त्याला '**दरबार खर्च**,' '**कारकुनी**' किंवा '**अंतस्थ**' म्हणत. त्याचीही भरपाई गांवाला करावी लागे. पहिल्या पहिल्यानें हा खर्च गुप्त असे. पुढें तो राजरोष हिशेबी कागदांत फडकूं लागला. ह्यांखेरीज गांवकुसाची दुरुस्ती, गांवच्या बंदोबस्तासाठीं शिबंदी (शिवार-रक्षक) ठेवणें, गोसाव्याची पलटण, गोखल्यासारख्या सरदारांचें लष्कर,खंडणी वगैरे गांवकीच्या व सरकारच्या खर्चाच्या अनेक बाबी प्रसंगोपात्त गांवावर येऊन पडत. त्यासाठीं गांव कर्ज काढी, आणि पट्टी करून किंवा सावकाराला गांवनिसबत इनाम ( सावकाराचे रुपये फडशा होईपर्यंत भोगवटा ) देऊन तें चुकतें करी. वरील बाबींपैकीं बऱ्याच सरकारी खजिन्यांत जात. त्या काळीच्या साऱ्यांतून म्हणजे ऐन जमेंतून भागत नसत, म्हणून काळी-पांढरीवर 'एक साल पट्टी' अगर 'ज्यास्त पट्टी' आकारीत. ज्यास्त पट्टी सालोसाल आकारावी लागली म्हणजे ती फिरत्या करांतून निघून कायमचें देणें होऊन बसे, व तिला 'सवाई-जमा' म्हणत. मिरासदार काळीशीं कायमचे जखडल्यामुळें जास्ती पट्टीचा चट्टा उपऱ्यांपेक्षां मिरासदारांना जास्त बसे. एकंदरींत असा अंदाज आहे कीं, जेव्हां दंगाधोपा अगर स्वारी वगैरेंचा खर्च नसे तेव्हां जमिनीच्या उत्पन्नाचे तीन भाग पडतः एक भाग सरकाराला पावे, एक बैल-बियाणें व हक्कदार यांमध्यें मुरे, व एक हिस्सा मिरासदारांना राही.

स्वराज्यांत हिशेबी साल फसली असे, व त्याला आरंभ मृग नक्षत्र निघाल्या दिवसापासून होतो. दरसाल वर्षारंभीं हुजुरांतून मामलेदारांना खालसा महालाबद्दल "**आजमास**" अथवा "**नेमणूक बेहेडा**" देत. ह्या कागदांत एकंदर महालाचा कमाल आकार दाखल करून त्यांतून

दुमाले गांव व जमिनी वगैरेंचा आकार वजा घालून निव्वळ ऐन जमा आकारीत. याशिवाय बलुतें, मोहतर्फा, राबता, व जकात, वगैरे जमा-सुद्धां एकदंर आकार जमा धरून त्यांतून महालाचा मुशाहिरा, मामलेदार, दरकदार, कारकून, शिबंदी ह्यांचा खर्च, देवस्थान, धर्मादाय, खैरात, व रोजींदार वगैरे सरकार-मंजूर खर्च वजा करून बाकी राहिलेल्या बेरजेपैकीं निवळ रसद सरकारास किती यावी व व्याज, हुंडणावळ, बट्टा वगैरे किती मुजरा द्यावयाचा याचा तपशील असे. मामलेदार ह्या आजमासाच्या धोरणानें वसूल व खर्च करीत. बरसात लागली म्हणजे मामलेदार पाटलांला बोलावून घेत, व त्यांजकडून पड-लागणीचा तपशील व वसुलाचा इकरार करून घेत. ठाण्यांतून गांवीं परत आल्यावर पाटील रयतेला लागण करण्यास उभारी देई, पड जमीन वहितीस लावी, नडलेल्या कुळांस मामलेदाराकडून तगाई व सावकारांकडून कर्ज मिळवून देई, व जुनें देणें तहकूब ठेवण्या-साठीं मधस्थी करी. पिकें आकाराला आलीं म्हणजे मामलेदार पाहणीला निघत आणि गांवगन्ना लोकांच्या तक्रारी-अर्ज यांचा इनसाफ करीत. ते शेकदारांच्या मदतीनें गांवचें दप्तर तपासीत. त्यांत लिहिलेला कमाल आकार, वसुली आकार, कमजास्त लावणी, आणि पाटील-कुळकर्णी, देशमुख-देशपांड्ये, व यच्चयावत् वतनदार ह्यांचें सूट-तहकुबीबद्दलचें म्हणणें, ह्या सर्वांचा विचार करून ते जमाबंदीचा ठराव करीत. पाटलानें तो मान्य केला कीं त्याला कबुला-कितबा देत. कोणी किती पट्टी द्याव-याची ह्याबद्दलचा पाटलाचा व रयतेचा ठराव यापूर्वींच झालेला असे. तो मामलेदारांनीं कबूल न केला तर पाटील पुन्हां रयतेचा विचार घेऊन तो मामलेदारांना कळवी. इतकेंही करून दोघांचा मेळ न बसला तर मामलेदार '**बटाई**' ठरवी, म्हणजे अर्धे उत्पन्न कुळानें ठेवावें व अर्धे सरकाराला द्यावें असा ठराव करी. कोठें क्षेत्रावर तर कोठें नांगरांच्या संख्येवर महसूल ठरवीत. पूर्वींची जमाबंदी म्हणजे एके बाजूला सरकार-तर्फे मामलेदार व दुसऱ्या बाजूला रयततर्फे पाटील, मिरासदार, कारूनारू,

देशमुख देशपांड्ये ह्यांमधील देवाण–घेवाणीचा सौदा होता. जमाबंदी मुक्रर होईपर्यंत गांवचीं पिकें हवालदारांच्या जाबत्यांत असत. पट्टीचा हप्ता चुकला म्हणजे शेकदार पाटलाच्या मदतीला शिबंदी पाठवी. ज्याकडे बाकी राही त्याला ती चुकवीपर्यंत मोहसल्ली (महसूल करणारा शिपाई) तगादा करी, चावडींत कोंडी, त्याच्या डोक्यावर धोंडा देई, त्याचे चुलींत पाणी ओती, त्याचा दाणापाणी बंद करी म्हणजे त्याला नदी–विहिरीवर पाण्याला जाऊं देत नसे. इतक्यानेंही तो वठणीवर न आला तर त्याला मामलेदाराकडे पाठवीत. मामलेदार त्याला कैद करी, त्याचीं गुरें ढोरें वगैरे जंगम मालमत्ता विकी, पण ती विकतांना त्याला खाण्यापिण्याला राखून ठेवी, व स्थावर विकीत नसे. गांवच्या सरकारदेण्याची हमी गांववार असल्यामुळें कांहीं कुळें नादार किंवा परागंदा झालीं तर त्यांजकडील येणें बाकीच्यांवर फाळून चुकवावें लागे. क्वचित् प्रसंगीं संभावित गांवकऱ्यांना ओलीस धरून नेत. तेव्हां पाटील व गांवकरी एखाद्या भरदार किंवा गरजू कुळाची जमीन विकून बाकी चुकवीत व त्यांना सोडवून आणीत. सबंध गांवानें पट्टी दिली नाहीं तर गांवावर स्वार दवडण्यांत येई, आणि ‘ शिलकावणें ’ ( ज्याच्याकडे तगाद्याला शिपाई पाठवावयाचा त्याच्याकडून त्याची पोटगी घेणें ) बसविण्यांत येई. एवढ्यानें भागलें नाहीं तर खुद्द पाटलाला तगादा लागे, व नाठाळ कुळाच्या सर्व यातना त्याला भोगाव्या लागत. सारांश, गांवाच्या मुलकी कामांच्या सुखदुःखाचा पूर्ण अधिकारी पाटील होता. ह्या महसुली पद्धतींत मामलेदारांना व त्यांच्याआडून इतर वतनदारांना अवदानें मारण्याला पुष्कळ जागा होती. मामलतीवर जहागीरदार, इनामदार, देशमुख, देशपांड्ये वगैरे जमेदारी पेशांच्या लोकांची नेमणूक होत असे. ह्या वर्गाचीं जाळीं–मुळें रयतेशीं जखडलीं असल्यामुळें सर्व प्रकारच्या भल्याबुऱ्या लोकांशीं त्यांचा संबंध येई, व गोरगरीबांची हलाखी त्यांना कळत असे. तेव्हां ते रयतेची दाद घेत व लावीत, आणि मागचा पुढचा विचार पाहून लोकांचीं मनें मिळवून मामलतीचें काम करीत. लोकांत व सरका–

रांत त्यांचें पिढीजाद वजन असे. जोंपर्यंत मामलतीवर जमेदारांच्या नेमणुका होत तोंपर्यंत रावापासून तों रंकापर्यंत जणों काय एकीशीं एक अशा पायऱ्या लागून राहिल्या होत्या, आणि रांगेनें किंवा ओघानें कोठेंना कोठें तरी सर्वांचा पल्ला पोंहचे, व दुःखपरिहार होई.

मुलकीप्रमाणें गांवचे फौजदारी अधिकारही पाटलाला होते, आणि मुलकी कामांत जे त्याचे मदतगार व वरिष्ठ तेच फौजदारी कामांत असत. ह्या कामांत त्याला मुख्य मदत जागल्याची असे, आणि त्याचा वरिष्ठ मामलेदार होता. कुळकर्णी दप्तरचें काम करी आणि जागल्या गांवचा बंदोबस्त ठेवी. बलुतें, शेव वगैरेसाठीं चोहोंकडे पायपीट आणि चटपट-लटपट करण्याचा महार जागल्यांना बालाभ्यास असतो; व ते माणसाचें पाणी तेव्हांच जोखतात. जागले वहिमी जातीचे असतात. 'चोराच्या हवालीं किल्ल्या' हें तत्त्व त्यांच्या नेमणुकीच्या मुळाशीं असावें. गांवचे सर्व बद-माष जागल्याला माहीत असत. गांवाच्या शिवेंत झालेल्या चोरीचा पत्ता लावण्याची 'बाप दाखीव नाहीं तर श्राद्ध कर' असली जबाबदारी त्यावर असे. चोरीचा माग शिवेच्या बाहेर निघाला नाहीं तर जागल्याकडून चोरी भरून घेत; आणि जर ऐवज त्याच्या ऐपतीबाहेर असला तर बाकींची भरपाई गांव करून देई. त्यानें मुद्देमाल काढून दाखविला किंवा दुसऱ्या गांवाच्या शिवारापर्यंत माग नेऊन भिडविला कीं, त्याच्या गळ्याचें पेंडें सुटे आणि तें सदर गांवाच्या जागल्याच्या गळ्यांत पडे. असें होतां होतां ज्या गांवापुढें माग जात नसे त्या गांवाला चोरी भरून द्यावी लागे. जागले पाटलांची कसूर किंवा सामलात दिसून आल्यास त्यांचे इनाम काढून ते त्यांच्या बिरादरांना देण्यांत येत. गुन्ह्याच्या तपासांत आरोपी कबूल व्हावा, त्यानें मुद्देमाल काढावा, व आपल्या साथीदारांचीं नांवें सांगावीत म्हणून त्याला मारपीट करून त्याचे फार हाल करीत; आणि मारहाणीच्या निशाण्या त्याच्या अंगावर दिसून येऊं नयेत अशी खबरदारी घेत. स्वतः किंवा पंचामार्फत फिर्यादीचा निकाल लावून अपराध्याला दंड, कैद करण्याचा अधिकार पाटलाला असे. पेंढारी,

लुटारू जाती, सशस्त्र हल्ला, अगर बंड ह्यांचा प्रतिकार करण्यासाठीं पाटील सबंध गांवाची मदत घेई, अगर प्रसंगविशेषीं गांवच्या महार जागल्यांच्या जोडीला शिबंदी, बारगीर, स्वार चाकरीस ठेवून पुंडावा मोडी. मुलखांत शांतता राखण्यासाठीं मामलेदारांच्या ताब्यांत शिबंदी व बारगीर होते, आणि ते बंडाळी मोडीत. ह्याखेरीज भील, रामोशी वगैरे तस्कर-जातींच्या नायकांकडून मामलेदार जामीन घेत. परंतु एका दोरींत राज्यव्यवस्था नसल्यामुळें गुन्हेगारांचें चांगलेंच फावे. एका प्रांतांतून हुसकून लावलें तर त्यांना दुसरीकडे आसरा मिळे. पुष्कळ छोटेखानी राजे, इनामदार, पाटील वगैरे दरोडखोरांना पाठीशीं घालून गबर होत. कामदार लोकही गोरगरिबांवर आळ घालून पैसे उपटीत, व लांच खाऊन खऱ्या गुन्हेगारांना सोडून देत. **श्रीसमर्थांचा** अनुभव असा आहे:-कोणी एके ग्रामीं अथवा देशीं। राहणें आहे आपणाशी। न भेटतां तेथल्या प्रभूशीं। साख्य कैंचें॥ त्यास न भेटतां त्याचे नगरीं। राहतां धरतील बेगारी। तेथें न करतां चोरी। अंगीं लागे॥-दासबोध.

दीवाणी कामांत पाटील, मामलेदार, सरसुभेदार व शेवटीं पेशवे अशा पायऱ्या होत्या; खेरीज शहरोशहरीं न्यायाधीश नांवाचे अधिकारी नेमले होते[1]. पाटलाकडे फिर्याद नेली म्हणजे तो प्रतिवादीला बोलावी,

---

[1] धुळ्याचे रा० रा० भट यांच्या मतें सुमारें तेराशें वर्षांपासून दिवाणी, फौजदारी व्यवहारांचा निर्णय करणाऱ्या महाराष्ट्रीय संस्था गोत, देशक, न्यायाधीश व राजा ह्या होत्या. गोत म्हणजे गांवांतील निरनिराळ्या जातींच्या व धंद्यांच्या लोकांची सभा. ती सर्व जातींच्या लोकांच्या गांवकी स्वरूपाच्या वादाचा निवाडा करी, व पाटील वगैरे अधिकाऱ्यामार्फतच तिच्याकडे फिर्याद आली पाहिजे असा निर्बंध नसे. तिच्या निवाड्यास थळपत्र, गोतपत्र, किंवा गोत-महजर म्हणत. गोतानें दिलेल्या निवाड्याचा पुन्हां निर्णय करण्याचा व प्रांतिक स्वरूपाच्या व्यवहाराचा निर्णय करण्याचा अधिकार देशकास असे, आणि त्याच्या निवाड्यास देशकाचा किंवा परगण्याचा महजर म्हणत. गोत व देशक ह्यांच्या वरिष्ठ न्यायाधीश व राजा हे होते.

आणि त्यानें दावा कबूल केला तर दोन्ही घरीं दिवा लागेल असा निकाल देई. पाटील-कुळकर्ण्यांना सळ घालतां आला नाहीं, तर वादी-प्रतिवादींकडून पंचांकडे कज्या सोंपविल्याबद्दल राजीनामा,व पंचनिवाड्या-प्रमाणें चालू असा प्रतिज्ञालेख ( कबूली ) लिहून घेऊन पंचनिवाडा अमलांत आणण्याबद्दल पाटील जामीन घेई; आणि पंचा-यतीकडे दावा सोंपवी. पंच बहुधा पक्षकारांच्या दर्जाचे आणि वाद उमजण्यासारखे-जसें जमाखर्ची कामांत पेढीवाले, स्थावर वतनाचे कामांत देशमुख, देशपांड्ये-असे असत. जात-पंचायतींत ज्या त्या जातीचे लोक असत. पंचांत नांव येणें हें मोठें भूषण समजत. पंचांना पक्षकारांकडूनही कांहीं ‘ **हारकी** ’ ( हर्षानें दिलेलें बक्षीस ) प्राप्त होत असे. पक्षकारांचे कतबे, जाबजाबाब, व लेखी तोंडी पुरावा घेऊन पंच सारांश लिहून काढीत; त्यांत पुराव्याचा गोषवारा आणि शेवटीं निर्वाह ( निवाडा ) असे. पंचायत ज्या गांवांत भरे तेथील कुळकर्णी तिचें लेखी काम करी. जो दावा जिंकी तो सरकारांत हारकी किंवा शेरणी व जो हरी तो गुन्हेगारी देत असे. पंच कोणाचेही बांधलेले चाकर नस-ल्यामुळें ते वक्तशीर जमत नसत व पंचायतीचें काम रेंगाळत चाले. निर्लोभी पंच व निःपक्षपाती साक्षीदार विरळा. मूठदाबीचा प्रकार जारी असल्या-मुळें पुष्कळसे दावे पायरीपायरीनें थेट दरबारपर्यंत जात. ज्याच्या तर्फे निवाडा होई तो अमलांत आणण्यासाठीं तो प्रतिपक्षाकडे गोडीनें मागणें करी; त्यानें दाद दिली नाहीं तर तगादा लावी, तगाददाराकडून त्याचें खाणेंपिणें बंद करी, त्याच्या डोक्यावर धोंडा देई व त्याला घरांत कोंडून ठेवी; इतक्यानें वळलें नाहीं तर त्याच्या घरीं बहुधा ब्राह्मणाला धरणें बसवी. मागमागून थकला म्हणजे ब्राह्मण शिव्याशाप देई, आपली शेंडी खुंटीला बांधी, डोक्यावर धोंडा घेई, किंवा अन्नपाणी वर्ज करी. ब्राह्मणाला याप्रमाणें यातना भोगण्याला लावून आपण मोठें पाप करतों असें वाटून ऋणको देण्याचा फडशा करून टाकीत. निवाड्याचा अंमल खासगी तगाद्यानें झाला नाहीं तर पाटील मामलेदाराकडे दाद मागत.

शेवटच्या रावबाजीनें मामलती मक्त्यानें देण्याची सुरुवात करून लिलांवांत जो जास्त बोलेल त्याला मामलेदार करण्याचा तडाखा लाविला; तेव्हां मामलती खानदानीच्या व कर्तबगारीच्या लोकांकडून निघाल्या, आणि मामलत कमावणें हें भूषण व ती गमावणें म्हणजे नामुष्की ही लौकिक भावना नष्ट झाली. एखाद्याजवळ एकाएकीं फार पैसा झाला म्हणजे 'कोठें मामलत गाजविली' असें त्याला विचारण्याचा प्रघात पडला. मक्तेदार मामलेदार कूस ठेवून मामलतीचे पोट–मक्ते देत, व अखेरचा मक्ता पाटील उचली. ह्यामुळें कोणी कोणाचा गुरु ना चेला अशी दुर्दशा झाली. पूर्वीं जशी पाटलाची कागाळी मामलेदाराकडे व मामलेदाराची दरबाराकडे करतां येई, तसें कांहीं उरलें नाहीं. उलट एकमेकांच्या आड एकमेकांना यथेच्छ चरावयाला मोकळें रान झालें. पाटलानें मक्ता घेतला तर रयतेची कांहीं तरी धडगत लागे. कारण त्याला गांवची माहिती असे. पण जर कां तो त्यानें पत्करला नाहीं तर रयतेचे बुरे हाल होत. मग वसुलाचें काम मामलेदार करीत. ते खात्याप्रमाणें किंवा लावणीप्रमाणें वसूल न करतां जशी ज्याजवळ माया तशी त्यावर मन मानेल त्या प्रकारची पट्टी आकारीत, आणि ती न दिल्यास मक्ता संपण्यापूर्वीं जमिनी खालसा करून त्या विकून आपली तुंबडी भरून काढीत. पीक पदरांत पडण्याच्या आंतच ते किस्त ( हप्ता ) नेमीत, त्यामुळें पुष्कळांना सावकाराचा हवाला द्यावा लागे, आणि सावकार जबर व्याज चोपीत. ह्या अमदानींत गांववार दोन इजारपट होत. एक खरा व दुसरा खोटा. खोट्या इजारपटांत आकारणी कमी दाखवीत म्हणून तो पाटील व मामलेदार ह्या दोघांनाही सारखाच उपयोगी पडे. खोटा इजारपट दरबारांत पुढें करून मामलेदार पुढील सालचा मक्ता उतरवी; आणि मामलेदार बदलला म्हणजे नव्या मामलेदाराला तो दाखवून पाटील आपल्या ठोक्याची रकम उतरवी. पाटील अगर गांवचा इनामदार ह्यांचें जर दरबारांत वजन किंवा संधान असलें तर मात्र त्या गांवावर आकार कमी बसे, आणि चढलेल्या आका-

राच्या गांवांतले कुणबी असल्या गांवांत जाऊन लागण करीत. जसा मुलकींत तसा दिवाणी फौजदारींतही मामलेदारांनीं धुडगूस घातला. ह्याप्रमाणें—देशमुख, देशपांड्ये, पाटील, कुळकर्णी, व इतर वतनदार, बलुतदार, ह्यांच्या कारस्थानांना व पंचांच्या न्यायाला आळा राहिला नाहीं. पक्ष धरून पाटील—कुळकर्णी व कारूनारू हे खोटींनाटीं कामें पुष्कळ करीत. गांवांत कोणीही कामगार व प्रवाशी आला आणि गांवांत कसलीही पंचाईत झाली कीं कारूनारू चावडीवर जमतात आणि कान पसरून सर्व कांहीं ऐकतात. असली संधि सर्वांपेक्षां महार जागल्यांना अतिशय येई व येते. त्यामुळें हे लोक मोठे तिखट, चौघास, हजर-जबाबी, आंगचुकवे व गुलाम झाले आहेत. पाण्यांत राहून माशांशीं वैर करूं नये; आपल्याला ज्या लोकांत जन्म काढावयाचा त्यांच्या डोळ्यां-वर येऊं नये ह्या भीतीचा गांवमुकादमांवर जो दाब असे तेवढाच काय तो लोकांना थोडाफार न्याय मिळवून देई. त्या वेळच्या काय आणि आतांच्या काय कुणब्यांच्या फिर्यादी म्हटल्या म्हणजे शेतमालाची व जनावरांची चोरी, जळीत, जनावरें मारणें, बांध, उरळ्या व वांटण्या वगैरे स्थावरच्या भानगडी—ह्या असत. कुणब्यांचें आयुष्य बहुतेक रानांत जात असल्यामुळें त्यांच्या बोलण्याचालण्यांत विशेष ठेपराई नसते, त्यांना सभाधीटपणा नसतो, आणि पुराव्याच्या खुब्याखाब्या व आडाखे माहीत नसतात. हे गुण गांवांत वापरणारे जे वतनदार कारूनारू व गांव-कामगार ह्यांच्यामध्यें पुष्कळ उतरले. हक्क भिकण्यासाठीं त्यांना काळी पांढरी पायाखालीं घालावी लागे. म्हणून त्यांच्या साक्षीवर काय ती कज्या-ची मदार असे, व त्यांनीं कुणब्याला चांगलेंच पोखरलें. पेशवाईचा लय व इंग्रजीचा उदय डोळ्यानें पाहिलेला गंगथडीचा **परशराम** शाहीर म्हणतोः—

लोहार, सुतार, कुंभार, परीट, बारा कारू, अडकले ।
त्यांना आडून कज्जा जिंकून बिन-संधीनें कोण आले ? ॥

.......................................

नवशिक्याला काय पुसावे हजारो टाले टोले ? ॥

———

## देशमुख, देशपांडे व पाटील-कुळकर्णी ह्यांच्या हक्क-अमलांचीं टिपणें.

**देशमुखी अमल व बाबतीः**-शिरपाव ( जमाबंदीचे कतबे होतील तेव्हां ). हक्करुसूम (दरसाल दरोबस्त येत आहे त्यापैकीं निमे). वरो ( दरोबस्त पैकीं निमे ). भेट. कारकुनी. फुरमासीचीं कलमें १२-बकरें, गांव निसबत दरसाल. तूप. राबता महार, महारांकडील दरसाल. जोडा चर्मी, चांभारांकडील. आधोड ( जनावराचें सबंध कातडें . मालडबा, लोहारांकडील. झूल भुरकी, धनगरांकडील व साळ्यांकडील. शेव साचणी हराजिनसी. सायरपैकीं जमेदारी. संक्रांतीचे तीळ-गूळ, ऊंस वगैरे- मोळी, महारांकडील दर सणास. मांगांकडील आघाडी पिछाडी.

**देशपांडे अमल व बाबतीः**-देशपांडपण परगणे मजकूर देहे २९. इनाम जमीन मौजे +++ येथें चाहूर २. दरोबस्त पैकीं २ हिस्से देशमुख, तिसरा हिस्सा आमचा. नगदीबाब रु. ७४७½:- ५७६॥. हक्क दर चाहुरीं १ रुपाया प्रमाणें देहे २९ चाहूर ६५०॥. पैकीं वजा कसबे मजकूर ७४ बाकी चाहूर ५७६॥. ५६ दसरा, तूप देहे २८ दर गांवास २ प्रमाणें कसवा खेरीज. १०० शिरपाव जमाबंदीसमयीं सरकार पोत्यांपैकीं. १५ जकातीवर हक्क ऐन १०, डबी ५. वरोचें अनाज दर चाहुरीं कैली ००२ प्रमाणें सोळोले कैली लावणीचे आकाराप्रमाणें. चांभारांकडील चर्मी जोडे दर गांवास दरसाल २ प्रमाणें, व हयास तोचरा आणीन सालांत दर गांवास एकादे लागल्यास पाळीप्रमाणें. संक्रांतीस हुर्डा पेंढी दर गांवास १ प्रमाणें. पंडेवलाचें कवाड कण-साळें दर गांवास १ प्रमाणें. महारांकडून सरपण दर गांवास दर सणास मोळ्या २ प्रमाणें. दर सालास सण ५. लग्न मुंज वगैरे शुभकार्य जाहल्यास आहेर फरमास गांव पाहून घेण्याचें आहे, माहिज नाहीं. दुखोट्याचे समयीं दुखोटा घेण्याचें आहे, माहिज नाहीं. मळे ज्या गांवीं भारी असतील तेथें मळ्याचें पीक पाहून जोड व मिर्च्या दोन मण घेण्याचें आहे. राबता महार दर गांवास अनुक्रमें. कांहीं पोटास आडशेरी देऊन काम घेण्याचें आहे. यात्रा व लग्न मुंज झाल्यास बैल घोडीं व बिगारीं माणसें गांव पाहून एक दोन आणवण्याचें आहे. गांवगन्ना हरएक कामास खासा अगर कारकून अथवा माणस गेलें त्यास भोजनखर्च दाणा वैरण गांवखर्ची गांवकरी यांनीं देण्याचें आहे. कडबा

थोटणा गांव पाहून दर गांवास कोठें शंभर, कोठें दोनशें गांवापासून घेऊन गांवकरी यांनीं देण्याचें आहे. कसबे मजकूरचे पेठेंत आंब्यांचीं ओझीं येतील त्यांस दर ओझ्यास आंबे सुमारें ५ घेण्याचें आहे. पेठा कसबे मजकुरीं होतील त्यांस दर पेठेस, कोष्ट्यांकडील पासोडा १ प्रमाणें कुल मागांस. सनगराचे कुल मागांस कांबळा १ प्रमाणें. कसबे मजकुरीं तांबोळी याचे दर दुकानास दररोज पान सुमारें १० प्रमाणें. लग्न, पाट, मागर्णी, जागरण वगैरे कार्य कोणाचे घरीं होईल त्यानें विडा आणून देऊन परवानगी न्यावी. सरकारचा विडा तसरीफ देशमुखाचे मागें. शिराळशेटीस खोचरें कसब्याचें गांवखर्चीं वजन ८।. मळे ज्या गांवीं भारी असतील तेथें मका लाविल्यास दर फडास कणसें पन्नास पंचवीस फड पाहून. उंसाचे थळास रसाची घागर १ व उंसांची १ मोळी. वतनदारीचा वाद विल्हस लागल्यास कागदपत्र जाहल्यास शेला पागे टें काम पाहून. सरकारी कामाकरितां गांव सोडून कोठें जाणें येणें झाल्यास खर्च होईल त्याची वरगत तालक्यावर. कापड, भूस, किराणा, जनावरें वगैरे खरीदी अगर विक्री अथवा परगांवाहून शेत खोतीहून आणिल्यास परगांवास नेल्यास जकातदारानें हांशील घेऊं नये. बलुत्ये, सुतार, लोहार वगैरे ज्याचें काम लागेल त्यानें करावें, मजुरी मागूं नये.

**पाटीलकी हक्क व बाबती**—मानपान व उत्पन्न. दरोबस्त सरकारचे मान २–नांगर; भेट दिव्यांत ठेवणें. आधींचे मान सरकाराचे ३–शिरपाव; विडा; दसऱ्याचें वाजविणें. बगेबरीचे मान ४–होळीस पोळी; पोळ्याचे बैल; शिराळशेट; गौर. किता मान १५ व उत्पन्नापैकीं निमे सरकार व निमे पाटील याप्रमाणें बीतपशील—फळाचा वांटा; दसऱ्याचें बकरें; तेलाचे घाण्यास तेल दररोज नऊ टांक; पट्टी पासोडीचे रुपये ५ पांच; शेलपाटी दर तिवड्यास गल्ला केली तीन पायली; दर गुऱ्हाळास गुळाची ढेप एक, रसाची घागर एक, ऊंस दररोज अडीच–प्रमाणें आठ रोज वीस; साळ्याचे दर मागास पासोडी एक; धनगराचे दर मागास चवाळें एक; राबता दर एक महार महिने सहा; तांबोळ्यांकडील पानें दररोज तेरा दर दुकानास; मुहूर्ताचा शेला; शेव साचणी, कोळ्यांचें पाणी दररोज घागरी चार; चांभारांकडील जोड दोन; महारांकडील कातडीं. मागाहूनचे मान ४–नांव; टिळा; दिवाळीचें वाजविणें; तोरण व गेरू. एकूण २८. घर ठिकाण सरकार निमे पाटीलकीची जागा.

**कुळकर्णी हक्क व बाबती ( अ )**— दर चाहुरीं रुपया एक. ४१ दाणे दर चाहुरीं बारुळे मापें मण एक. ४४५ सळई दर खंडीस दर जिनसी वजनी खंडीस पांच शेर. ·॥· गांवांत खोती विकली तर खोत पट्टी रुपया एक पैकीं निमे पाटील जाऊन कलम. सरकारचा शिरपाव पाटलामागें. पाटलाचें सुदामत हक्क जाऊन व ज्योतिषपणाचीं षोडशकर्में क्षत्रियाचें सर्व कर्म जाऊन उत्पन्न होईल तें पाटलांनीं दोन हिस्से घ्यावे. एक हिस्सा कुळकर्णी यानें घ्यावा. ·॥· धनगरांचे मागास चवाळें एक पैकीं निमे पाटील व बाकी निमे कुळकर्णी. गांवांत बागाईत झालें तर शिरस्तेप्रमाणें हक्क घ्यावे कलम एक. लोहारांपासून पोहरा एक दरसाल. तेली यापासून तेल दर घाण्यास सालास अर्ध्या रुपयाचें घ्यावें कलम एक. चांभारांपासून जोडा पायपोसाचा एक. किरकोळ हक्क मानपान पाटलाबरोबर घ्यावा कलम एक. महारांपासून सणाचे दिवशीं भारा सरपण. तेरा सुदामत हक्क.

**कुळकर्ण कसबे × × ( आ )**—नगदी बाब मुशाहिरा दर चाहुरीं १ प्रमाणें रुपये ७४. घुगरी रयतावा जमिनीस अनाज दर चाहुरीं कैली ४२ सागवली जमिनीस. मळ्यास पाव चाहुरास—जोड कैली ०१, मकाचीं कणसें २५०, भाजी सणावरास असेल ती. पेठा वसतील त्यांस.-कोष्ट्यांकडील दरोबस्त मागांस दर पेठेस पासोडी १ प्रमाणें, सनगरांचे दरोबस्त मागांस दर पेठेस कांबळा १ प्रमाणें, आंबे विक्रीस येतील त्यास दर ओझ्यास आंबे सुमारें ५ प्रमाणें, तांबोळी याचे दुकानास दररोज पानें विड्यांचीं पांच प्रमाणें वाण्याचे दर दुकानास गूळ वजन ४१।· शिमग्याचे सणास, तेल्याचे दर घाण्यास दरसाल तेल वजन ०।· दररोजची माळ्याची शेव, बाजारचे दिवशींची शेव वगैरे उकाळा माल पाहून, पेठ वसल्यावर वीस वर्षे हक्क नाहीं, पुढें सरकार मुकरार करून देईल त्याप्रमाणें, मुशाहिरा नगदी बाब घेण्याचे. कागद शाई लागेल ती गांवखर्चीं घ्यावी. माहिजा नाहीं. फारकत वगैरे बहुत दाखल्यास राहण्यासारखा कागद करून दिल्यास व घर जागा गांवांतील अगर पेठेंतील नवीन खरीदी वगैरे कोणा कुळास दिल्यास पोटगी कुल काम पाहून घेण्याची आहे.

# वतन-वेतन.

गांव-मुकादमानीचा परिणाम जनतेच्या दानतीवर फार अनिष्ट झाला. इसवी सन १८१८ सालीं क्याप्टन् ब्रिग्ज ह्यांनीं खानदेशाचा ताबा घेतल्यावर तेथील लोकस्थितीचें जें निरूपण केलें आहे, तें इतत्रही लागूं पडण्यासारखें आहे. ते म्हणतात-अगदीं साध्या गोष्टींतसुद्धां खरें काय आहे, हें लोकांच्या तोंडून काढून घेण्यास यातायात पडते. लौकर दाद मिळविण्याच्या आशेनें ते नेहमीं राईचा पर्वत करितात. लांचलुचपती व एकमेकाशीं अन्यायाचें वर्तन ह्यांचें प्रमाण इतकें वाढलें होतें कीं तें सांगूं गेल्यास कोणी खरेंसुद्धां मानणार नाहीं. धाकटे घराण्यांत अवश्य तितकी धूर्तता आणि रोकड मात्र पाहिजे, कीं त्यानें वडील घराण्याच्या तोंडाला पानें पुसून त्याची मालमत्ता सरकारांतून आपल्याकडे ओढलीच समजा. ह्यामुळें जिकडे तिकडे गृहकलहाचा वणवा पेटून सरकारी दप्तरांतसुद्धां बनावट दस्तैवज घुसले, आणि अस्सल खरे दस्तैवज मिळविण्यासाठीं मारामारी व ठोकाठोकी माजून राहिली. शेतकऱ्यांच्या अनाथ स्थितीला तोड उरली नाहीं, असें झालें. मामलेदार, लष्करी लोक, सावकार, पाटील-कुळकर्णी, देशमुख-देशपांडे ह्यांना मात्र अकरावा आला. दुर्बल-प्रबलांच्या झगड्यांत लबाडी आणि कावेबाजपणा हींच काय तीं हत्यारें दुर्बलांला कामास येतात. लोक जात्या लुच्चे किंवा पापपुण्याला न मानणारे असतात असें नाहीं. पण जुलमांतून कसें बसें निसटून जाण्याला त्यांना असत्याचा अवलंब करणें प्राप्त होतें.

अशा भूमींत इंग्रजी राजसत्तेनें आपला नांगर टाकला व जसजशी व्यवस्था लागत गेली तसतसे सुभे, सरकार-परगणे वगैरे राज्यविभाग मोडले. देशमुख, देशपांड्ये, हावलदार वगैरे महाल जमेदारांचे देव्हारे मराठशाहींत डगमगूं लागले; ते इंग्रजींत सन १८६३ सालीं पार बसले. पहिल्या पहिल्यानें देशमुख-देशपांड्यांना वसूली कामगार समजत, व तें काम ते स्वतः

किंवा गुमास्त्यामार्फत करीत. त्यांच 'जमेदार कारकून' तालुक्यांच्या किंवा पेट्यांच्या कचेरींत सरकारच्या कारकुनांना मदत करीत. ह्यांखेरीज ते जमिनींचे राजिनामे, कबुलायती, कौल, फारकती, तबदील वगैरेंची नोंद करीत, आणि स्थावरच्या कज्जांत जरूर तेव्हां आपल्या दप्तरचीं कागदपत्रें हजर करीत. पुढें सरकारनें परगणे वतनदारांची चाकरी वजा करून त्यांना नक्त नेमणुका ठरवून दिल्या. इसवी सन १८३९ चा आक्ट २० अन्वयें शेव, फसकी, वाणगीसारखे यच्चयावत् पांढरी हक्क ऊर्फ मोहतर्फा उकळण्याची झाडून सर्व वतनदारांना सरकारनें मनाई केली आहे. सर्व्हे सेटलमेंटप्रमाणें परगणे वतनदार व पाटील–कुळकर्णी ह्यांना घुगरी, सळई, बलुत्यांसारखे काळीचे हक्क उकळण्याची बंदी केली आहे; आणि पाटील–कुळकर्ण्यांची चाकरी वंशपरंपरेनें कायम करून त्यांना त्यांच्या सर्व परभारे उत्पन्नाबद्दल वसुली रकमेवर रोकड मुशाहिरा ठरवून दिला आहे. महार जागले ह्यांना मात्र मामूलप्रमाणें बलुतें हक्क उकळण्याची मोकळीक सरकारनें ठेविली आहे. ह्याप्रमाणें सार्वजनिक किंवा सरकारी नौकरींत गांवकामगारांशिवाय वतनपद्धतीला इंग्रज मुत्सद्यांकडून अजिबात फांटा मिळाला; आणि चाकरीबद्दल वतनाऐवजीं रोख वेतन देण्याची पद्धत चालूं झाली.

आपल्या मुंबई इलाख्यापुरतें पाहूं गेलें तर सिंध प्रांत सोडून मुलकीसंबंधानें सरकारनें त्याचे उत्तर, मध्य व दक्षिण असे तीन भाग केले आहेत; आणि प्रत्येकावर रेव्हेन्यु कमिशनर नांवाचा महसुली अंमलदार नेमून अमदाबाद, पुणें, बेळगांव, हीं शहरें अनुक्रमें त्यांचीं मुख्य ठाणीं केलीं आहेत. प्रत्येक भागांत सहा सात जिल्हे आहेत. जिल्ह्याचें क्षेत्र सुमारें १६०० ते ६५०० चौरस मैल असून त्यांत ६ ते १२ तालुके व ६०० ते १७०० गांवें असतात; आणि लोकसंख्या समारें १० लाख असते. तालुक्याचें क्षेत्र सुमारें ६५ तें ४५० चौरस मैल असून त्यांत ५० ते २५० गांवें असतात. तालुका मोठा असला तर त्याचा महाल किंवा पेटा नांवाचा पोटविभाग असतो. पूर्वीच्या राज्यांत सगळा कार-

भार एका मुठींत असे. ती स्थिति पालटून अधिकारांची विभागणी झाली, आणि लष्करी, नगदी, मुलकी, मीठ, कस्टम, अबकारी, पैमाष, शेतकी, वळू घोडे, पोलीस, जंगल, आरोग्य, न्याय, नोंदणी, शिक्षण, सडका, इमारती, पाटबंधारे, टपाल, तारायंत्र इत्यादि खातीं अलग करून तीं स्वतंत्र अधिकाऱ्यांकडे सोंपविण्यांत आलीं आहेत. खेड्यांचा संबंध जिल्ह्यापलीकडे प्रायः जात नाहीं; आणि सर्व इलाख्या—प्रांतांतले सुमारें २५० जिल्हे हेच हिंदुस्थानांतील ब्रिटिश अंमलाचे मध्यबिंदु होत. म्हणून आपण जिल्ह्यापर्यंतची राजव्यवस्था संक्षेपानें पाहूं.

जिल्ह्यांत कलेक्टर हा अधिकारी सरकारचा प्रतिनिधि असतो. नगदी, वसुली, शेती, पैमाष, पंतपेढ्या, पोलीस, जंगल, अबकारी, मीठ, नोंदणी, कारखाने तपासणें इत्यादि खातीं जरी त्याजकडे मुख्यत्वें असतात तरी अमुक खात्याच्या कामांत कलेक्टरचा हात, निदान बोट नाहीं, असें एकही खातें नाहीं. कलेक्टरला डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट व डिस्ट्रिक्ट रजिष्ट्रार असे हुद्दे आहेत; आणि जिल्ह्यांतील फौजदारी व दस्तऐवज नोंदणी ह्या कामांवर त्याचा हुकमत चालते. फार मोठ्या गुन्ह्यांशिवाय सर्व गुन्ह्यांचा इनसाफ करण्याचा अधिकार कलेक्टरला असतो. जिल्ह्याला लागून संस्थान असलें, तर त्याचा पोलिटिकल एजंट कलेक्टरच असतो. जिल्ह्यांतील पोलीसचा कारभार डिस्ट्रिक्ट सुपरिटेंडेंट ऑफ पोलिस, व जंगल फार असलें तर जंगलखात्याचा कारभार डिव्हिजनल फॉरेस्ट ऑफिसर कलेक्टरच्या देखरेखीखालीं पहातात; आणि मीठ, अफू, अबकारी, एक्साईज खात्याचे असिस्टंट कलेक्टर व इन्स्पेक्टर्सवर त्याचीच हुकमत असते. देणें घेणें, वांटण्या, गहाण, विक्री, करारमदार, हक्क व हितसंबंध वगैरे दिवाणी स्वरूपाचे दावे, आणि मोठाले फौजदारी गुन्हे ह्यांचा इनसाफ डिस्ट्रिक्ट जज्ज करतो. सडका, सरकारी इमारती, पाटबंधारे, ह्या कामांवर एक्झिक्युटिव्ह एंजिनीयर असतो. पाटबंधाऱ्यांचीं कामें मोठालीं असल्यास त्यांवर स्वतंत्र इरिगेशन एक्झिक्युटिव्ह एंजिनीयर असतो, आणि त्याकडे शेतीला पाटाचें पाणी सोडण्याचें काम असतें. शाळा-

किंवा गुमास्त्यामार्फत करीत. त्यांच 'जमेदार कारकून' तालुक्यांच्या किंवा पेट्यांच्या कचेरींत सरकारच्या कारकुनांना मदत करीत. ह्यांखेरीज ते जमिनींचे राजिनामे, कबुलायती, कौल, फारकती, तबदील वगैरेंची नोंद करीत, आणि स्थावरच्या कज्जांत जरूर तेव्हां आपल्या दप्तरचीं कागदपत्रें हजर करीत. पुढें सरकारनें परगणे वतनदारांची चाकरी वजा करून त्यांना नक्त नेमणुका ठरवून दिल्या. इसवी सन १८३९ चा आक्ट २० अन्वयें शेव, फसकी, वाणगीसारखे यंच्चयावत् पांढरी हक्क ऊर्फ मोहतर्फा उकळण्याची झाडून सर्व वतनदारांना सरकारनें मनाई केली आहे. सर्व्हे सेटलमेंटप्रमाणें परगणे वतनदार व पाटील-कुळकर्णी ह्यांना घुगरी, सळई, बलुत्यांसारखे काळीचे हक्क उकळण्याची बंदी केली आहे; आणि पाटील-कुळकर्ण्यांची चाकरी वंशपरंपरेनें कायम करून त्यांना त्यांच्या सर्व परभारे उत्पन्नाबद्दल वसुली रकमेवर रोकड मुशाहिरा ठरवून दिला आहे. महार जागले ह्यांना मात्र मामूलप्रमाणें बलुतें हक्क उकळण्यांची मोकळीक सरकारनें ठेविली आहे. ह्याप्रमाणें सार्वजनिक किंवा सरकारी नौकरींत गांवकामगारांशिवाय वतनपद्धतीला इंग्रज मुत्सद्यांकडून अजिबात फांटा मिळाला; आणि चाकरीबद्दल वतनाऐवजीं रोख वेतन देण्याची पद्धत चालूं झाली.

आपल्या मुंबई इलाख्यापुरतें पाहूं गेलें तर सिंध प्रांत सोडून मुलकीसंबंधानें सरकारनें त्याचे उत्तर, मध्य व दक्षिण असे तीन भाग केले आहेत; आणि प्रत्येकावर रेव्हेन्यु कमिशनर नांवाचा महसुली अंमलदार नेमून अमदाबाद, पुणें, बेळगांव, हीं शहरें अनुक्रमें त्यांचीं मुख्य ठाणीं केलीं आहेत. प्रत्येक भागांत सहा सात जिल्हे आहेत. जिल्ह्याचें क्षेत्र सुमारें १६०० ते ६५०० चौरस मैल असून त्यांत ६ ते १२ तालुके व ६०० ते १७०० गांवें असतात; आणि लोकसंख्या सुमारें १० लाख असते. तालुक्याचें क्षेत्र सुमारें ६५ तें ४५० चौरस मैल असून त्यांत ५० ते २५० गांवें असतात. तालुका मोठा असला तर त्याचा महाल किंवा पेटा नांवाचा पोटविभाग असतो. पूर्वींच्या राज्यांत सगळा कार-

भार एका मुठींत असे. ती स्थिति पालटून अधिकारांची विभागणी झाली, आणि लष्करी, नगदी, मुलकी, मीठ, कस्टम, अबकारी, पैमाष, शेतकी, वळू घोडे, पोलीस, जंगल, आरोग्य, न्याय, नोंदणी, शिक्षण, सडका, इमारती, पाटबंधारे, टपाल, तारायंत्र इत्यादि खातीं अलग करून तीं स्वतंत्र अधिकाऱ्यांकडे सोंपविण्यांत आलीं आहेत. खेड्यांचा संबंध जिल्ह्यापलीकडे प्रायः जात नाहीं; आणि सर्व इलाख्या-प्रांतांतले सुमारें २५० जिल्हे हेच हिंदुस्थानांतील ब्रिटिश अंमलाचे मध्यबिंदु होत. म्हणून आपण जिल्ह्यापर्यंतची राजव्यवस्था संक्षेपानें पाहूं.

जिल्ह्यांत कलेक्टर हा अधिकारी सरकारचा प्रतिनिधि असतो. नगदी, वसुली, शेती, पैमाष, पंतपेढ्या, पोलीस, जंगल, अबकारी, मीठ, नोंदणी, कारखाने तपासणें इत्यादि खातीं जरी त्याजकडे मुख्यत्वें असतात तरी अमुक खात्याच्या कामांत कलेक्टरचा हात, निदान बोट नाहीं, असें एकही खातें नाहीं. कलेक्टरला डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट व डिस्ट्रिक्ट रजिस्ट्रार असे हुद्दे आहेत; आणि जिल्ह्यांतील फौजदारी व दस्तऐवज नोंदणी ह्या कामांवर त्याचा हुकमत चालते. फार मोठ्या गुन्ह्यांशिवाय सर्व गुन्ह्यांचा इनसाफ करण्याचा अधिकार कलेक्टरला असतो. जिल्ह्याला लागून संस्थान असलें, तर त्याचा पोलिटिकल एजंट कलेक्टरच असतो. जिल्ह्यांतील पोलीसचा कारभार डिस्ट्रिक्ट सुपरिंटेंडेंट ऑफ पोलिस, व जंगल फार असलें तर जंगलखात्याचा कारभार डिव्हिजनल फॉरेस्ट ऑफिसर कलेक्टरच्या देखरेखीखालीं पहातात; आणि मीठ, अफू, अबकारी, एक्साईज खात्याचे असिस्टंट कलेक्टर व इन्स्पेक्टर्सवर त्याचीच हुकमत असते. देणें घेणें, वांटण्या, गहाण, विक्री, करारमदार, हक्क व हितसंबंध वगैरे दिवाणी स्वरूपाचे दावे, आणि मोठाले फौजदारी गुन्हे ह्यांचा इनसाफ डिस्ट्रिक्ट जज्ज करतो. सडका, सरकारी इमारती, पाटबंधारे, ह्या कामांवर एक्झिक्युटिव्ह एंजिनीयर असतो. पाटबंधाऱ्यांचीं कामें मोठालीं असल्यास त्यांवर स्वतंत्र इरिगेशन एक्झिक्युटिव्ह एंजिनीयर असतो, आणि त्याकडे शेतीला पाटाचें पाणी सोडण्याचें काम असतें. शाळा-

खात्यावर दर जिल्ह्याला डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टर असतो. जिल्ह्याच्या ठाण्यांत सरकारी दवाखान्यांत आजारी माणसांना औषधपाणी देण्याचें काम सिव्हिल सर्जन करतो. देवीखातें आणि आरोग्यखातें ह्यांवर जिल्हानिहाय सॅनिटरी इन्स्पेक्टर नेमलेला असतो. गुरांचे दवाखाने जिल्ह्यांच्या ठिकाणीं झाले आहेत, आणि कोठें कोठें तालुक्यांतही झाले आहेत. त्यांत जनावरांना औषधोपचार व शस्त्रक्रिया करण्यांत येते. ओव्हरसिअर ऑफ ॲग्रिकल्चर ह्याची देखरेख जिल्ह्यांतल्या शेती खात्यावर असते. दोन किंवा अधिक जिल्हे मिळून टपाल, व तारायंत्र खात्यांची व्यवस्था पोस्टाचे सुपरिंटेंडेंट पाहतात. बहुतेक खात्यांच्या जिल्हाधिकाऱ्यांना मदतनीस आहेत. सबंध जिल्ह्यांतील नगदी कामासाठीं हुजूर डेप्युटी कलेक्टर नांवाचा अधिकारी कलेक्टरच्या दिमतीला दिला असतो; आणि पैमाषसंबंधीं कामें पाहण्याला डिस्ट्रिक्ट इन्स्पेक्टर ऑफ लँड रेकार्ड्स दिलेला असतो. जिल्ह्यांतील दोन ते चार तालुके मिळून मुलकी कामासाठीं जो पोटविभाग करतात, त्याला 'प्रांत' म्हणतात, व त्यावर असिस्टंट किंवा डेप्युटी कलेक्टर नेमतात. तो आपल्या प्रांतापुरतीं कलेक्टरचीं बहुतेक मुलकी, फौजदारी कामें पाहतो. असिस्टंट किंवा डेप्युटी सुपरिंटेंडेंट ऑफ पोलीस व सर्कल पोलीस इन्स्पेक्टर हे डिस्ट्रिक्ट पोलीस सुपरिंटेंडेंटचे मदतनीस असतात, आणि त्यांकडे कांहीं तालुके दिलेले असतात. एंजिनीयर खात्यांत कांहीं सडका व कामें मिळून सब्डिव्हिजन करतात. त्यावर सब्डिव्हिजनल ऑफिसर नेमतात, व तो एक्झिक्युटिव्ह एंजिनीयरचे ताब्यांत असतो. डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टरला असिस्टंट डेप्युटी मदतनीस असतात, आणि सर्व मिळून जिल्ह्यांतील शाळांची तपासणी, स्थापना वगैरे व्यवस्था पाहतात. पोस्टल सुपरिंटेंडेंटचे हाताखालीं पोस्टाचे इन्स्पेक्टर असतात. ते जिल्ह्यांतील टपालखात्यावर देखरेख करतात.

तालुक्यांत मुख्य अंमलदार—मामलेदार, पोलीस सबइन्स्पेक्टर ऊर्फ फौजदार, सबरजिस्ट्रार, रेंज फॉरेस्ट ऑफिसर, कस्टम, मीठ, एक्सैज खात्यांचे

सरकारकून, दरोगे, बंदर कारकून, सब्इन्स्पेक्टर वगैरे, सब् असिस्टंट सर्जन, सब्ओव्हरसियर किंवा मेस्त्री, शाळामास्तर, पोस्टमास्तर, देवीडॉक्टर इत्यादि होत. काळीच्या व इतर करांचा वसूल, खंडाच्या, वहिवाटीच्या व साधारण गुन्ह्यांच्या फिर्यादींचा इनसाफ, नगदी, वतन, हक्क, जमिनीच्या खात्यांची वारस चौकशी, प्लेग, पटकी, दुष्काळ, तगाई, पतपेढ्या, शेतकी सभा, इत्यादि संबंधानें कामें मामलेदाराकडे चालतात. साधारणतः जिल्ह्याचीं जशीं सर्व कामें कलेक्टरमार्फत चालतात, व एकंदर जिल्ह्याच्या बऱ्यावाईट स्थितीबद्दल कलेक्टरवर जबाबदारी असते, तशी तालुक्यांसंबंधानें सर्व कारवाई मामलेदारमार्फत चालून तालुक्याच्या स्वस्थतेबद्दलची जोखीम मामलेदारावर असते. तालुक्याचे दप्तरी व फिरतीच्या कामाच्या मानानें मामलेदाराच्या हाताखालीं ६ ते १६ सोळा कारकून व १० ते २० शिपाई असतात. तालुक्यांतील सर्व खेड्यांचे मिळून दोन ते चार भाग केलेले असतात, त्यांना सर्कल म्हणतात. त्यावर जो मामलेदार-कचेरींतला कारकून असतो, त्याला सर्कल इन्स्पेक्टर म्हणतात. आपल्या सर्कलांतील गांवांची दप्तरतपासणी, पीकपाहणी, मोजणी, वांटप, बांध-उरुळ्यांची दुरुस्ती, अतिक्रमण, वसूल वगैरे कामें सर्कल इन्स्पेक्टर मामलेदाराच्या हुकमतींत करतो. गांवकामगार व तालुका कामगार ह्यांमधील सांखळीची कडी सर्कल इन्स्पेक्टर होत. तालुक्यांत गुन्हे न होतील अशी खबरदारी घेण्याचें, व झाल्यास त्यांचा पत्ता लावण्याचें काम सब्इन्स्पेक्टर ऑफ पोलीस करतो, व त्याचे मदतीस हेड कॉन्स्टेबलस व सुमारें तीस ते पन्नास कॅन्स्टेबलस असतात. त्यांत दहा पंधरा हत्यारी व बाकीचे आड-हत्यारी असतात. तालुक्यांत एकाहून अधिक सब्इन्स्पेक्टर नेमण्यास सुरुवात झाली आहे. तालुक्याचा बंदोबस्त नीट रहावा म्हणून त्यांत दोन चार पोस्त अथवा पोलीस ठाणीं असतात, आणि त्यावर हेड कॉन्स्टेबल, एक दोन हत्यारी व दोन चार आड-हत्यारी कॉन्स्टेबलस असतात. ह्यांना आपापल्या हद्दींत नेहमीं फिरावें लागतें. अबकारी, कस्टम, मीठ खात्यांचे

अधिकारी आपापल्या खात्यांचीं कामें करतात. फॉरेस्टचे विभाग करून त्यांवर राउंडगार्ड, बीटगार्ड नेमतात. ते आपापल्या हद्दींत फिरून रेंज फॉरेस्ट ऑफिसरच्या हुकमतींत कामें करतात. स्थावर–जंगमचे दस्तैवज सब् रजिस्ट्रार नोंदितो. देवीडॉक्टर गांवोगांव देवी काढीत फिरतो. तालुक्याचे ठिकाणीं दवाखाना असतो; तेथें सबअसिस्टंट सर्जन रोग्यांना औषध देतो. बुळकुंड्या, खुरकत वगैरेसारखे जनावरांच्या सांथीचे रोग उद्भवले म्हणजे तालुक्यांत गुरांचा दवाखाना नसल्यास नजीकच्या दवाखान्यावरील ढोर–डॉक्टर येऊन उपचार करतो. सडका वगैरेंचें काम एंजिनीयरकडील सब्ओव्हरासियर, मेस्त्री पाहतात. खेड्यांतील कांहीं शाळा–मास्तरांकडे शाळा व टपाल असतें. शाळेसंबंधाचें त्यांचें काम तालुका शाळामास्तरमार्फत व टपालचें सब्–पोस्टमास्तरमार्फत चालतें. पोस्टांत चार आणे तें पांच हजार रुपयांपर्यंत तीन टक्के व्याजानें लोकांच्या ठेवी ठेवतात, व हुंड्या ( मनिऑर्डरी ) पाठवितात. स्थावर–जंगमाचे दाव्याच्या निवाड्यासाठीं एक दोन तालुके मिळून सबॉर्डिनेट जज्ज ऊर्फ मुनसफ कोर्ट असतें.

वरीलप्रमाणें पगारी चाकरीखेरीज कांहीं सार्वजनिक कामें सरकारनें लोकांच्या विश्वासू पुढाऱ्यांवर बिन–पगारीं सोंपविलीं आहेत. फौजदारीं कामें चालविण्यास शहरांत मानाचे मॅजिस्ट्रेट नेमले आहेत. तसेंच शेतकऱ्यांचे दहा रुपयांचे आंतील दावे चालविण्यासाठीं शेतकरी कायद्याप्रमाणें कांहीं कांहीं गांवांत बिनपगारी गांवमुनसफ नेमले आहेत. पण ते कमी करून गांवपंचायतीकडे हलके दिवाणी दावे देण्याचें घाटत आहे. मुंबईचा १९०१ चा कायदा ३–डिस्ट्रिक्ट म्युनिसिपल आक्टान्वयें मोठ्या शहरांतून सार्वजनिक आरोग्यरक्षण व प्राथमिक शिक्षण हीं कामें म्युनिसिपालिट्यांकडे सोंपवून त्यांचा खर्च भागविण्यासाठीं त्यांना नागरिकांवर व त्यांच्या व्यापारावर कर बसविण्याचे अधिकार दिले आहेत. म्युनिसिपालटीचा कारभार कांहीं लोकनियुक्त सभासद व कांहीं सरकारनें नेमलेले सभासद ह्यांच्या विचारानें चालतो, आणि तिच्या एकंदर व्यवस्थे-

वर व जमाखर्चावर सरकारची कलेक्टरमार्फत देखरेख असते. मुंबईचा सन १८८४ चा ॲक्ट १ प्रमाणें प्रत्येक जिल्ह्याला डिस्ट्रिक्ट लोकल-बोर्ड म्हणून सभा असते, आणि तालुक्याला तालुका-लोकलबोर्ड नांवाची सभा असते. जिल्हा-बोर्डांत कांहीं सभासद सरकारनें नेमलेले असतात, व कांहीं लोकनियुक्त असतात. लोकनियुक्त सभासद तालुका-लोकलबोर्डें, म्युनिसिपालिट्या, व जहागिरदार ह्यांनीं निवडलेले असतात. जिल्हा-बोर्डाचा अध्यक्ष कलेक्टर असतो, व तालुका-लोकलबोर्डाचा अध्यक्ष मुलकी प्रांताधिकारी असतो. तालुका-लोकलबोर्डांत कांहीं सभासद सरकारनें नेमलेले व कांहीं लोकनियुक्त असतात. लोकनियुक्त सभासद हे म्युनिसिपालिट्या, जहागिरदार, व ह्या कामासाठीं तालुक्याचे केलेल्या विभागांतील विवक्षित सरकार-सारा देणारे खातेदार ह्यांनीं निवडलेले असतात. जमीनमहसुलावर दर रुपयास एक आणा कर आणि नाव, दस्तुरी, विषारी पदार्थ, खाणी, वाळू, कोंडवाडा वगैरेंचे खर्च वजा जातां उत्पन्न सरकारनें लोकलबोर्डाच्या दिमतीला लावून दिलें आहे. त्यांतून त्यानें प्राथमिक शिक्षण, सडका, पूल, देवी काढणें, दवाखाने, तळीं, विहिरी, पाणीपुरवठा, धर्मशाळा, रहदारी बंगले, बाजार, झाडें, घाण-पाण्याचा निकाल ह्यांबद्दल खर्च करावयाचा असतो. तालुक्याच्या ठाण्यांत, किंवा त्याच्या तोडीच्या एखाद्या भरण्याच्या गांवीं म्युनिसिपालिटी नसली तर तेथें मुंबईचा सन १८८९ चा ॲक्ट १ ( खेड्यांतील स्वच्छतेबद्दलचा कायदा ) अन्वयें सॅनिटरी कमेटी किंवा सॅनिटरी बोर्ड स्थापन करण्यांत येतें. त्यामध्यें कलेक्टर किंवा प्रांताचे अधिकारी ह्यांनीं नेमलेले तीन किंवा अधिक गांवकरी सभासद असतात, व त्यांपैकीं एक पोलीस पाटील असतो. सॅनिटरी कमेटी लोक-वर्गणी गोळा करून तिची रक्कम तालुक्याच्या तिजोरींत भरते. लोक-वर्गणींत खर्च भागला नाहीं, तर कमेटीच्या विचारानें कलेक्टर गांवावर कर बसवितो. लोकलबोर्ड आणि सरकार यांजकडून कमेटीला निम्म्याहून जरा कमी मदत मिळते. खेरीज सदर कायद्याचें कलम ४२ प्रमाणें, ज्या गांवकी महार मांगांना

हाडकी, हाडोळा इनाम जमिनी किंवा बलुतें आहे अशांपैकीं कांहींजण, सरकार कमेटीकडे नोकरीला देतें, व त्यांनीं तिचे हुकमतीखालीं गांव सफा करण्याचें काम करावयाचें असतें. स्वच्छ व पुरेसा पाण्याचा पुरवठा, रस्ते, व सहान ( खुल्या ) जागा झाडणें, व सर्व घाण दूर नेणें, हीं व असलीं लोकांच्या आरोग्यास जरूर तीं कामें कमेटीनें करावयाचीं असतात. त्याबद्दल ती नियम ठरविते आणि ते मोडणारांना गांवावर अधिकार असलेल्या मॅजिस्ट्रेटच्या अध्यक्षतेखालीं दंड करते. ह्या दंडाची रक्कम कमेटीला मिळते. खेड्यांतील आरोग्याच्या व पाणीपुरवठ्याच्या कामाला पैशाची मदत करण्याबद्दल हिंदुस्थानसरकारनें स्थानिक सरकारांला फर्माविलें आहे. ह्यासंबंधानें कोणतीं विशेष कामें करावयाचीं हें ठरविण्याच्या कामीं कलेक्टरला आरोग्यखात्याच्या अधिकाऱ्यांची सल्ला मिळते. खेड्यांतील आरोग्य सुधारण्यासाठीं मिस फ्लॉरेन्स नाइटिंगेल फंड निघाला असून त्याचे विद्यमानें वडाळें व काळें येथें नमुन्यादाखल प्रयोग चालू आहेत. म्युनिसिपालिट्या, लोकलबोर्डें, सॅनिटरी-कमेट्या वगैरे संस्था स्थानिक करांवर चालतात. कर देणारांच्या तंत्रानें त्या चालविल्या म्हणजे पैशाचा व्यवस्थित उपयोग होईल, आणि सार्वजनिक कामें अंगावर घेऊन करण्याची सामान्य जनतेला संधि लाभल्यानें त्यांना राजनीतीची संथा मिळेल, असा ह्या संस्था निर्माण करण्यांत सरकारचा आद्य हेतु आहे. तो सफल होणें लोकांच्या दक्षतेवर, प्रामाणिकपणावर, व स्वार्थत्यागावर अवलंबून आहे.

तालुका सोडून आपण खेड्यांत आलों म्हणजे, वतनी नोकरी दिसावयाला लागते. पाटील, कुळकर्णी, महार व जागले हे खेड्यांतले वतनदार सरकारी गांव-नौकर होत. ह्यांपैकीं महार, जागले ह्यांचें पोट बहुतांशीं रयतेकडून मिळणाऱ्या बलुत्यांवर व दुसरे हक्कांवर चालत असल्यामुळें त्यांना वेतनी वतनदार म्हणण्यापेक्षां बलुतदार वतनदार म्हणणें रास्त दिसतें. इंग्रजींत पाटील-कुळकर्ण्यांना बलुतें नसून फक्त मुशाहिरा आहे. तेव्हां ते वेतनी वतनदार आहेत आणि त्यांचाच विचार ह्या प्रकरणांत करण्याचें

योजिलें आहे. गुजरात, कोंकणमध्यें कुळकर्णी वेतनदार झाला आहे. त्याला तलाठी म्हणतात. देश व दक्षिण महाराष्ट्र ह्यांतल्या सुमारें दहा जिल्ह्यांत तो अजून वतनदार आहे, व तलाठी होण्याच्या पंथास लागला आहे. पाटील, महार, जागल्या हे सर्वत्र वतनदार आहेत. वतनदारांसंबंधानें सरकारानें मुंबईचा सन १८७४ चा ॲक्ट ३ (वतन कायदा) केला आहे. सरकारचा खेड्यांतला मुख्य प्रतिनिधि पाटील होय. बहुतेक पाटील लिहिणारे नसल्यामुळें गांवचा सर्व सरकारी पत्रव्यवहार एकट्या पाटलाच्या नांवानें न चालतां पाटील-कुळकर्णी या जोडनांवानें चालतो, आणि गांवच्या सरकारी कागदपत्रांवर दोघांनाही सह्या कराव्या लागतात. पाटील निरक्षर असला तर तो आपल्या सहीची निशाणी करतो. सरकार-उपयोगी वतनदार गांवकामगारांची नेमणूक वर सांगितलेल्या वतन ॲक्टाप्रमाणें होते. पाटील-कुळकर्ण्यांच्या वतनांच्या तक्षिमा, वडीलकी व पाळ्या वगैरेंची चौकशी करून सरकारनें वतन राजिष्टर तयार केलें आहे; त्यांत जे 'वारचे' वतनदार लागले आहेत, ते आपापल्या आणेवारीप्रमाणें स्वतः किंवा गुमास्त्यामार्फत काम करतात. गांव कितीही लहान असला तरी त्याला स्वतंत्र पाटील असावयाचाच, आणि बहुतेक खेड्यांत एकाच पाटलाकडे मुलकीं व फौजदारीं काम असतें. गांवें फार लहान असलीं तर एका कुळकर्ण्याकडे दोन ते आठपर्यंत गांवें असतात, आणि मोठ्या गांवांत एकाहून अधिक मुलकी व पोलीस पाटील आणि कुळकर्णी नेमतात. कोणत्या गांवाला किती पाटील-कुळकर्णी असावयाचे हें सरकार ठरवितें. पाटील-कुळकर्ण्यांची संख्या ठरवितांना सरकार पूर्वापार वहिवाटीपेक्षां प्रस्तुत कामाच्या मानावर जास्त भिस्त टाकतें. पाटील-कुळकर्ण्यांची नेमणूक मुलकी प्रांताचे आधिकारी करतात. कामावर जो पाटील किंवा कुळकर्णी नेमावयाचा तो वयांत आलेला, चांगले वर्तणुकीचा, आणि काम करण्यास लायक असा पाहिजे. तो तसा नसला तर तो वारचा वतनदार असला तरी त्याला कामावर नेमतां येत नाहीं. पाटील निरक्षर असला तरी चालतो, परंतु कुळकर्ण्याला कुळकर्णाची परीक्षा द्यावी

लागते. वारचा वतनदार सोळा आण्यांचा मालक असला तर त्याची तहायात म्हणजे साठ वर्षांच्या उमरीपर्यंत नेमणूक होते. सोळा आण्यापेक्षां कमी आणेवारी असली तर कुळकर्ण्यांची पांच वर्षें व पाटलांची दहावर्षें नेमणूक करतात. कामगार पाटील कुळकर्ण्यांचे गैरवर्तन किंवा कामांत सदोदित निष्काळजीपणा दिसून आला किंवा ते मोठ्या गुन्ह्यांत सांपडले, म्हणजे वारच्या वतनदाराचें वतन खालसा होतें; मग अपराध करणारा वारचा वतनदार असो किंवा गुमास्ता असो. वतनाची वारस चौकशी प्रांताचे अधिकारी मामलेदारामार्फत करतात. परंतु वतनाचा मोह असा दांडगा असतो कीं, त्याबद्दलचे पुष्कळ कज्जे रेव्हेन्यू कमिशनरपर्यंत व कित्येक थेट सरकारापर्यंतही जातात.

सर्व्हे किंवा रिव्हिजन सेटलमेंटच्या वेळीं पाटील–कुळकर्ण्यांच्या मुशाहिऱ्याची आकारणी विंगेट–स्केलप्रमाणें होते. जमीनमहसुलाच्या पहिल्या हजारीं शेंकडा ३, दुसऱ्या हजारीं शेंकडा २ व पुढें शेंकडा १ ह्याप्रमाणें पाटील मुशाहिरा आकारतात; आणि कुळकर्णी मुशाहिरा पहिल्या हजारीं शेंकडा ५, दुसऱ्या हजारीं शेंकडा ४, तिसऱ्या हजारीं शेंकडा ३, चौथे हजारीं शेंकडा २ व पुढें शेंकडा १ ह्याप्रमाणें आकारतात. गांवाला इरिगेशनचा वसूल असला, तर जमीनबाब व इरिगेशन ह्या दोन्ही बाबी एक करून त्यांच्या बेरजेवर वरील प्रमाणांत पाटील–कुळकर्ण्यांचा मुशाहिरा आकारतात. ह्यांखेरीज लोकल फंडाच्या वसुलावर पाटलाला ५ ते १० रुपयेपर्यंत दोन आणे, ११ ते २५ चार आणे, २६ ते ५० आठ आणे, ५१ ते ७५ दहा आणे, ७६ ते १०० बारा आणे, १०१ ते १२५ एक रुपया व पुढें दर पंचवीस रुपयांना चार आणे प्रमाणें मुशाहिरा मिळतो; आणि कुळकर्ण्याला पाटलाच्या दुप्पट मिळतो: वनचराईच्या वसुलांत पाटलाला आठ आण्यांच्या धरसोडीनें दर रुपयास सहा पै व कुळकर्ण्याला नऊ पै देतात. कोंडवाड्याच्या वसुलाची चौथाई करून ती पाटील कुळकर्ण्यांत निमानिम वांटून देतात. पाटलाला पोटगी व चावडीखर्च ऊर्फ 'तेल कांबळा' गांवच्या लोकसंख्ये-

वंर मिळतो, तो असा:--१ ते १०० दोन रुपये, पुढें १००० पर्यंत शेंकडा एक रुपया आणि पुढें दर २०० लोकसंख्येस एक रुपया. विस्तार, चव्हाटा, बाजार, आल्यागेल्यांची वर्दळ, कामाची जिकीर इत्यादि कारणांवरून खेड्यांचे चार वर्ग केले आहेत. ह्या वर्गवारीवर पाटलांना दरसाल मुशाहिरा मिळतो तो असा:—गांव चौथे वर्गांत असेल तर दहा रुपये, तिसऱ्यांत वीस रुपये, दुसऱ्यांत तीस रुपये व पहिल्यांत पन्नास रुपये. कुळकर्ण्याला वसुलावर येणेंप्रमाणें 'कागद-बहा' ओकारतात. १ ते २० रुपये वसुलापर्यंत एक रुपया, २१ ते ५० पर्यंत दोन रुपये, ५१ ते १०० पर्यंत अडीच रुपये व पुढें १५०, २००, २५०, ३००, ५०० प्रमाणें वाढव्यावर आठ आणे. इन्कमटॅक्स, तगाई ह्यांच्या वसुलावर पाटील-कुळकर्ण्यांना कांहीं मिळत नाहीं. तारीख २८।७।१९१३ चे मुंबई कायदे कौन्सिलच्या बैठकींत नामदार बेल्वी ह्यांच्या प्रश्नास सरकारतर्फे मिळालेल्या उत्तरावरून असें दिसतें कीं, कुळकर्ण्यांना सरासरीनें ६८ रुपये वार्षिक मुशाहिरा मिळतो. पाटलाला अर्थात् ह्यापेक्षां कमी पडणार.

सरकार-उपयोगी गांवकामगारांत पाटील-कुळकर्णी प्रमुख आहेत. गांवचा सर्व सरकारी व्यवहार त्यांच्यामार्फत चालतो. राज्याची शिस्त जसजशी बसत गेली, राजाधिकारांची विभागणी होऊन निरनिराळीं खातीं अस्तित्वांत आलीं, आणि प्राचीन पौर्वात्य व्यवहार आधुनिक पाश्चात्य सुधारणेच्या वर्चस्वामुळें बदलून लोकांच्या गरजा वाढल्या, तसतसें गांवचें दप्तर फुगत चाललें. म्हातारेकोतारे पाटील-कुळकर्णी मागच्या गोपाळ-कथा सांगतात कीं, अव्वल इंग्रजींत कुळकर्णी वसुलाच्या दोन हप्त्यांच्या वेळेला दप्तरची गांठ सोडी, एक इरसालीनें संबंध गांवचा भरणा तालुक्यांत पाठवी, आणि जमाबंदीखेरीज गांवची शीव क्वचित् ओलांडीत असे. आतां दप्तर सोडल्याशिवाय एक दिवस जात नाहीं, आणि गांव सोडल्याशिवाय एक आठवडा लोटत नाहीं. गांवच्या दप्तरचें काम कुळकर्णी नीट करतो कीं नाहीं हें समजावें, म्हणून त्यानें कामाची

रोजनिशी ठेवावी असा हुकूम आहे. सरकारच्या सर्व निरनिराळ्या खात्यांचें तोंड गांवांत येऊन जाऊन पाटील-कुळकर्ण्यांवर पडतें. तरी साधारणतः गांवच्या दप्तरांत पाऊण हिस्सा काम मामलेदाराचें व चौथा हिस्सा इतर खात्यांचें असतें.

मुलकी खात्यानें गांवच्या दप्तराचे अठरा मुख्य नमुने केले आहेत, व जरूरीप्रमाणें मुख्य नमुन्यांना कित्येक पोटनमुनेही जोडले आहेत. दर तीस वर्षांनीं सर्व्हेखात्यानें गांवचा आकारबंद तयार केला म्हणजे त्यावरून कुळकर्णी शेतवार पत्रक उतरून घेतो, आणि कारणपरत्वें वेळोवेळीं खात्यांत जसजसे बदल होतील तसतसे ते त्यांत नोंदून ठेवतो. शेतवार पत्रकांत काळी-पांढरीच्या क्षेत्राची, आकाराची, व खातेदारांची सर्व-प्रकारची माहिती असते. त्याला नमुना नंबर १ म्हणतात. दर पांच वर्षांनीं जमिनीवरील हक्कांची नोंद कुळकर्णी करतो, आणि नमुना नंबर १ क ऊर्फ हक्कनोंदणीचें रजिस्टर तयार होतें. त्यांत वेळोवेळीं जे फरक होतात ते नमुना नंबर १ ड मध्यें दाखल होतात, व सालाबादची पीक-पाहणी, आणि भाडे-पट्टे नमुना नंबर १ इ मध्यें येतात. सरकारी पड-पाहाणी, गवत-लिलांव व वन-चराई नमुना नंबर २ मध्यें, आणि बांध-वरुळ्यांची पाहणी नमुना नंबर ३ मध्यें नोंदलेली असते. दर-साल जिराईत-बागाईत पिकांची क्षेत्रवारी नमुना नंबर १६ व १६ अ मध्यें आणि तळीं-विहिरींची पांच सालीं नोंद नमुना नंबर १५ मध्यें असते. पांच सालीं जनावरांची खानेसुमारी नमुना नंबर १३ मध्य असते. वरील पत्रकांना शेतकीं पत्रकें म्हणतां येतील. कबजेदार-वार खतावणी नमुना नंबर ५, जमीनबाब व तगाई लावणी पत्रक नमुना नंबर ६ व ६ अ, पावतीसह जमीनबाब व तगाई कीर्द नमुना नंबर ११ व ११ अ, हे नगदीचे मुख्य कागद होत. ह्यांशिवाय कमजास्त पत्रक, तक्रार-कैफियती इनामपत्रक, चलनें वगैरे नगदी कागद असतात. ह्या सर्वांवरून जमा-बंदीचा मुख्य कागद ताळेबंद ऊर्फ ठरावबंद नमुना नंबर १० तयार होतो, आणि तो प्रांतसाहेब किंवा कलेक्टर यांनीं पसंत केला

म्हणजे त्याबरहुकूम गांवचा वसूल होतो. देवी, पटकी, प्लेग, जनावरांचे रोग इत्यादि गांवीं चालू असतांना त्यांबद्दल दररोज रिपोर्ट करावा लागतो. नमुना नंबर १४ मध्यें जन्ममृत्यूची नोंद असते. वळू घोड्यांची उत्पत्ति, ऊंस, कापूस, तीळ, जवस, गहूं वगैरे विशेष पिकें, पाऊस व निरख ह्यांचे तक्ते गांववार तयार होतात. गांवच्या कोंडवाड्याचा हिशेब गांवकामगार ठेवतात. वारचा वतनदार, खातेदार, कबजेदार, पेन्शनर, नेमणूकदार वगैरेंचा मृत्यु, धार्मिक बाबींकडे दिलेल्या इनामजमिनीचा उपयोगगैर उपयोग, वहिती जमिनीचा व तगाईचा गैर उपयोग वगैरेंबद्दल कुळकर्ण्याला रिपोर्ट करावे लागतात. इनाम व खातें ह्यांची अदलाबदल, वारस चौकशी, तगाई चौकशी, गांवकऱ्यांची जागा किंवा जमीन सरकारी अगर सार्वजनिक कामाकडे घेतल्यास तिच्या नुकसानभरपाईची चौकशी वगैरेंसंबंधानें लोकांसह पाटील–कुळकर्ण्यांना चौकशी अंमलदारांचे कचेरींत हजर रहावें लागतें. सरकारी जागा, झाडें ह्यांचें रक्षण; निवडुंग काढणें व त्याबद्दल वर्गणी वगैरे गोळा करणें; खाणी, दगड, वाळू ह्यांची विक्री; प्राप्तीवरील कर, नाव, दारू, अफू, गांजा, दुकानें वगैरेंबद्दल माहिती; पलटणीसाठीं बैल, गाड्या, सुतार, लोहार, नालबंद, वगैरेंची माहिती; टोळ वगैरेबद्दल माहिती व बंदोबस्त; इत्यादि संबंधानें कागदपत्रें कुळकर्ण्याला तयार करावीं लागतात. वसूल न आला तर नोटिसा, जप्ती, पंचनामे वगैरे कागद व कामें त्याला करावीं लागतात. लोकलबोर्डाकडील पाण्याचीं कामें, चावडी, धर्मशाळा, शाळागृह इत्यादिकांच्या मक्तेऱ्यांच्या चौकशीच्या कामीं त्यांना जाबजबाबासाठीं हजर रहावें लागतें. मामलेदाराचे 'मदत' किंवा 'कबजा' कोर्टाच्या हुकूमनाम्याची बजावणी पाटील–कुळकर्णी करतात. स्थानिक वस्तुस्थितीप्रमाणें कस्टम, अबकारी, मीठखात्यांचें कामही गांवकामगारांना पडतें. जंगलसंरक्षण, चराई, तरवड, शेण्या वगैरेंचे लिलांव, आग, नुकसानी, गुन्हे वगैरेंचे पंचकयास, इत्यादि जंगलखात्यांचीं काम पाटील–कुळकर्णी करतात. पाटबंधाऱ्यासंबंधानें इरिगेशन–खात्याला, देवी काढण्यासंबंधानें देवीखात्याला,

नॉटपेड पत्रांचें हांशील वसूल करण्याच्या कामीं पोस्टखात्याला, दिवाणी कोर्टांचीं समन्सें, दरखास्तीचे पंचनामे, ताबे-पावत्या, वगैरे कामांत दिवाणी खात्याला गांवकामगार साह्य देतात. गांवांत वहिमी लोकांची ये-जा, फिरत्या गुन्हेगार जातींबद्दल माहिती, गुन्ह्याची स्थिति, वगैरेंसंबंधानें डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट ठरवील तितकीं रजिस्टरें, पत्रकें व रिपोर्ट पाटील-कुळकर्णी तयार करतात. गांवांत गुन्हा अगर आकस्मिक मृत्यु झाला तर त्याची खबर पोलीसठाण्यांत त्यांना ताबडतोब दिली पाहिजे, अपमृत्यूबद्दल पंचक्यास केला पाहिजे, व जरूर तर प्रेत डॉक्टरकडे पाठविलें पाहिजे. पोलीस-पाटलाला गांवांत गस्त घालावी लागते, आणि मोठा गुन्हेगार पकडला तर त्याला चोवीस तासांत पोलीसठाण्यांत पाठवावें लागतें. लहानसहान मारामारी किंवा शिवीगाळीची फिर्याद गुन्ह्याच्या तारखेपासून आठ दिवसांत आली तर अपराध्यास बारा तासपर्यंत चावडींत कोंडून ठेवण्याचा अधिकार पोलीस-पाटलाला आहे. मुंबईचा सन १८६७ चा ॲक्ट ८ ( गांवपोलीस कायदा ) कलम १५ प्रमाणें ज्या पोलीस-पाटलाला कमिशन देण्यांत येतें, त्याला दोन रुपयांच्या आंतील चोरी किंवा अक्रिया करणारास पांच रुपयेपर्यंत दंड अगर दोन दिवस चावडींत साधी कैद, आणि घाण करणारास एक रुपया दंड अगर बारा तास चावडींत कैद याप्रमाणें शिक्षा देतां येते. अनाथ प्रेतें, मेलेलीं जनावरें, कुत्रीं वगैरे घाण महार जागल्यामार्फत काढविण्याचें काम म्हणजे गांवांत स्वच्छता, आरोग्य राखण्याचें काम पोलीस-पाटलाचें आहे. गांवांत कोणीही प्रवासी आला तर त्याजकडून पैसे घेऊन त्याला समानसुमान पुरविण्याचें काम पाटील-कुळकर्ण्यांचें आहे. बरसातींत मुलकी, जंगल, पोलीस, दिवाणी वगैरे खात्यांचे कारकून, शिपाई, बेलीफ वगैरे गांवगन्ना फिरतात. एक्सैज सबइन्स्पेक्टर, फॉरेस्ट गार्ड, पोलीस पेस्ताचा कॉन्स्टेबल, सर्कल इन्स्पेक्टर ह्यांचें त्यांतले त्यांत गांवाला विशेष जाणें होतें. बरसात संपली म्हणजे सर्व खात्यांचे अंमलदार फिरतीवर निघतात. त्यांचा बंदोबस्त ठेवण्याचें महत्वाचें काम

पाटील–कुळकर्ण्यांकडे असतें. पलटणीच्या हालचाली किंवा खेळ होतात त्यावेळीं मुक्कामाच्या गांवच्या आसपासच्या गांवांना आगाऊ मागणी-प्रमाणें सामानसुमानाचीं दुकानें तयार ठेवावीं लागतात.

पाटील–कुळकर्ण्यांच्या हल्लींच्या कामाचें वर दिग्दर्शन केलें आहे. पूर्वीच्या राजवटीपेक्षां तें पुष्कळ वाढलें आहे, आणि सरकारच्या व लोकांच्या गरजा जसजशा वाढतील, तसतसें तें आणखी वाढणार. साधारण मराठी सातव्या इयत्तेच्या आंतील शिक्षणाचे माणसास व्यवस्थितपणें करतां येण्यासारखें तें राहिलें नाहीं; आणि त्यांतच शेतांतील पोटहिश्शांची व गांवठाणाची मोजणी व त्यांचे नकाशे काढणें हीं कामें गांवकामगारांच्या गळ्यांत अडकविलीं म्हणजे त्यांच्या शिक्षणाची मर्यादा किती असली पाहिजे ह्याची अटकळ कोणालाही बांधतां येईल. कोणत्याही खात्याला गांवगन्नाची माहिती पाहिजे असली, कीं ती पाटील–कुळकर्ण्यांना पुरवावी लागते. गांवकऱ्यांशीं किंवा काळी–पांढरीशीं कोणत्याही खात्याचा संबंध येवो, त्याची कारवाई पाटील–कुळकर्ण्यांना करावी लागते, आणि तें काम पुरें पडण्यासाठीं जरूर ती मदत त्यांनाच द्यावी लागते. राज्यव्यवस्था सुधारत चालली तिजबरोबर सरकारचीं खातीं वाढत चाललीं, आणि प्रत्येकाची चिकित्सा व बारकाईही वाढत चालली. त्यामुळें गांवचें दप्तर किती तरी पटीनें फुगून त्यांत कीसही पुष्कळ काढावा लागतो. खेड्यापाड्यांनीं शाळा झाल्या नाहींत. जेथें झाल्या आहेत, तेथें कुळकर्णाच्या परीक्षेपुरतें सुद्धां ज्ञान मिळविण्याची सोय नसते, आणि अभ्यासासाठीं पर ठिकाणीं मुलें ठेवण्याची ऐपत फार थोड्या वतनदारांना असते. कर्तुकीचे वतनदार पाटील–कुळकर्णी दुसरीकडे रोजगार पाहतात. कुळकर्ण्यांनीं स्वराज्यांत व इंग्रजींत लहान मोठ्या कारकुनी पेशाच्या व खानदानीच्या पाटलांनीं लष्करी पेशाच्या नौकऱ्या पतकरल्या व पतकरतात; आणि ज्यांना दुसरीकडे पोट भरण्याची पंचाईत असे वतनदार गांवकीच्या वांट्याला येतात. तेव्हां एकसारख्या नवीन नवीन सुधारणा ज्यांत

होत आहेत अशा गांवकीच्या कामाला तोंड देण्यास कामगार वतनी पाटील–कुळकर्ण्यांपैकीं फार थोड्यांची तयारी असते. उदाहरण, पीक-पाहणीचें पत्रक घ्या. तें काळजीनें तयार केलें तर कुळांनाच काय पण सगळ्या देशाला त्याचा उपयोग होईल. हक्कनोंदणीच्या पत्रकामध्यें जमिनींत कोणाचे काय हक्क आहेत हें नोंदून ठेवावयाचें असतें. स्थावराच्या दाव्यांत अशिक्षित कुणब्यांना ह्या कागदाचा फार उपयोग आहे. पण ह्या पत्रकाचें तत्त्व व त्याचा उपयोग समजणारे गांवकामगार क्वचित् आढळतात. ब्राह्मणद्वारा गांवें लिहून घेणाऱ्या कुळकर्ण्यांचें प्रमाण बरेंच आहे, आणि सुमारें निमा हिस्सा गांवचे कागद तालुका–कारकुनांना पदरचें तेल जाळून मिळवून घ्यावे लागतात. पाटील-कुळकर्ण्यांचें काम बिनचूक व वक्तशीर करून घेण्यांत मामलेदारांना कोण यातायात पडते, हें त्यांनाच विचारावें. इकडे कामाचा विस्तार वाढत चालला आहे; पण अजून बहुतेक पाटील निशाणी नांगर असतात. अक्षरशत्रुत्वाची सबब पुढें करून ते सर्व जबाबदारी कुळकर्ण्यांवर लोटतात. लिहिणारा पाटील असला तरी लेखणी चालविण्यांत त्याला बाट वाटतो. ज्यांत पाटलाला इकडची काडी तिकडे करावी लागत नाहीं अशीं गांवकीचीं कामें पुष्कळ दाखवितां येतील. पण ज्यांत कुळकर्ण्याचा मुळींच हात नाहीं, असें एक देखील काम दाखवितां येणें दुरापास्त आहे. सर्व खात्यांच्या विशेषतः मुलकी फौजदारी खात्यांच्या नानाविध चौकशांचे प्रसंगीं पाटील–कुळकर्ण्यांना बिन–भत्त्यानें परगांवीं रहावें लागतें. लेखी काम कुळकर्ण्याचें असल्यामुळें पाटील वेळेवर न आला तरी बोभाटा होत नाहीं, म्हणून पाटलापेक्षां कुळकर्ण्याचे बाहेर मुक्काम जास्त पडतात, व गांवचें लिहिणें तसेंच तुंबून रहातें; तें कुळकर्णी परत आल्यावर कसेंतरी निपटतो. जमाबंदी, सालअखेरचे कागद मिळवणें ह्यांसारख्या प्रसंगीं एकट्या कुळकर्ण्यांचे आठ आठ दहा दहा दिवस व हक्कनोंदणीच्या प्रसंगीं महिना महिना बाहेर राहणें पडतें. इंग्रजींत तोंडपाटीलकी मिटून सरस्वतीदान वाढलें, आणि तें बहुतेक कुळकर्ण्याला निचरावें लागतें. अधिकाऱ्यांपुढें जें काम जातें तें बहुतेक लेखी

असल्यामुळें शिक्षेची आली गेली बलाय पाटलापेक्षां कुळकर्ण्यावर जास्त आदळते. कुळकर्ण्याला वाटतें कीं पाटील बसून पगार खातो, आणि पाटलाला वाटतें कुळकर्णी माझा कारकून असून त्याला पगार जास्त. कुळकर्ण्याच्या ताब्यांत दप्तर असल्यानें रयतेला त्याची जितकी गरज लागते तितकी पाटलाची लागत नाहीं. तेव्हां पाटील गांवचा नामधारी प्रभु होऊन कुळकर्ण्याइतके लोक त्याला भजत नाहींत. ह्या व अशा इतर कारणांमुळें बहुतेक ठिकाणीं पाटील–कुळकर्ण्यांची दिलफांक नजरेस येते. ह्या सर्वांचा परिणाम गांवचे दप्तरावर विपरीत होतो, आणि तो रयतेला भोंवतो. तो तातडीनें टाळण्याचा उपाय म्हटला म्हणजे पाटलांना कुळकर्णाची परीक्षा देण्यास लावणें हा होय. असें झालें असतां कामाचा चोखपणा वाढला नाहीं तरी तें वांटलें जाईल, व दप्तर पाटलाचे हातीं चढून तो नुसता टिळ्याचा अधिकारी न राहतां खराखुरा प्रमुख गांव-मुकादम बनेल. शिवाय, शिक्षणप्रसाराचा **बादशाही** हेतु सिद्धीस जाण्याला एक प्रकारची मदत होईल, आणि परीक्षेच्या लकड्यानें पुष्कळ पाटील–घराणीं साक्षर होतील.

कामाचा आणि मुशाहिऱ्याचा हिशेब घालून वतनदार गांवनौकरांच्या काम–कुचरपणाची तरफदारी करण्यांत येते. सुमारें पस्तीस वर्षांपूर्वी नामदार हायकोर्टानीं असा फैसला दिला कीं, वतन देतेवेळीं त्याचा प्रकार कोणता हें सरकारनें ठरविलें, त्याचें काम किती ह्याबद्दल सरकारनें आपणाला मुळींच बांधून घेतलें नाहीं. तेव्हां काम वाढलें ही तक्रार वतनदारांना कायद्यानें करतां येत नाहीं. त्याचप्रमाणें पूर्वी जितके वतनदार गांवकीवर असत तितकेच सतत रहावेत असें कोणाला वाटत असेल तर तो त्यांचा भ्रम आहे. “ कामाची सोय ” हा महामंत्र सरकार कांहीं केल्या विसरत नाहीं. खानदेशांत चोपडें गांवाला पाटील–कुळकर्ण्यांच्या प्रत्येकीं ५७ तर्फा होत्या. त्यामुळें कामाची टंगळमंगळ चाले, हें पाहून सन १९०६–७ चे सुमारास सरकारनें कामगार कुळकर्ण्यांची संख्या चार कायम केली, व बाकीच्यांस घरीं बसविलें; आणि हल्लीं

नांवाला जरी ३५ तर्फवार पाटील आहेत, तरी कामाला तिघे चौघेच जबाबदार आहेत. नगर जिल्ह्यांत पारनेर गांवाला चार पाटील असत. ते सुमारें पांच सहा वर्षांपूर्वी वरील कारणासाठीं तीन ठरवून टाकले. पूर्वीच्या अंधेरनगरींत पाटील-कुळकर्ण्यांनीं जी चंगळ व कमाई केली आणि लोकांवर जो अधिकार गाजविला, ते दिवस गेले. आतां नांव घेण्यासारखे कोणतेही मुलकी, फौजदारी, दिवाणी अधिकार त्यांना कायद्यानें ठेवले नाहींत, आणि वरिष्ठ हुकूम करतील तितकेंच काम त्यांनीं केलें पाहिजे. वसुलाची सूट, तहकुबी, तगाई, अतिक्रमण वगैरेसंबंधानें सरकारनें कायदेकानु केले आहेत, त्याबरहुकूम काम चालतें. त्यांत त्यांच्या कृपेनें अगर अवकृपेनें कमजास्त होतें अशांतला भाग मुळींच नाहीं. तेव्हां आतां लोकांच्या अज्ञानाचा व नडीचा जो काय फायदा घेतां येईल, तेवढ्यावर त्यांना आपली भूक भागवावी लागते. हल्लींच्या पाटील-कुळकर्ण्यांच्या वाडवडिलांनीं वतन पतकरलें तेव्हां गांवकीचें काम हंसत खेळत सांभाळून घरची शेतीपोती, व्यापारहुन्नर पाहण्याला त्यांस मुबलक सवड मिळे. दिवस स्वस्ताईचे असून त्यांना घरचा पुरवठा चांगला असे, आणि लोकही भजून होते. व्यापारांत इकडील लोकांपेक्षां हुषार असे परप्रांतीय मारवाडी गुजराती इकडे आले, आणि त्यांनीं सर्व व्यापार आपल्याकडे ओढला. ज्या कारणांनीं इकडील बहुतेक कुणबी कर्ज-बाजारी झाले, त्यांनीं पाटील-कुळकर्ण्यांना वगळलें असें नाहीं. दोन पैसे बाळगून असणारे पाटील-कुळकर्णी नमुन्यासाठीं सुद्धां बाराबारा कोसांत दुष्काळी टापूंत तरी दिसत नाहींत. पंचवीस वर्षांपूर्वी पाटील-कुळकर्ण्यांचीं घोडीं तालुका कचेरीच्या आजूबाजूला दिसत. आतां बहुतेक पाटील-कुळकर्णी पादचारी दिसतात. पाटील-कुळकर्ण्यांना चारचौघांप्रमाणें प्रपंच चालवावयाचा असून आतिथ्याच्या कामांत जमेदारी पेशा राखावयाचा असतो. पूर्वी त्यांना आडमाप पैका मिळत असल्यामुळें त्यांना भडंग खर्च करण्याची ढब पडून गेली; नव्हे-त्यांच्या बोकांडीं अनेक वायफट खर्चाच्या बाबी-सणवार, यात्रा,

उत्सव, संतानप्राप्ति , विवाह वगैरे प्रसंगीं महार, मांग, कोळी, तमासगीर, गोसावी इत्यादिकांचे मानपान-हक्क होऊन बसल्या आहेत. असे खर्च न केले तर नामुष्की होते. 'भीक मंगना पन म्हशालजी रखना;' 'ऋण फिटतें पण हीन फिटत नाहीं;' असला जमेदारी खाक्या असतो. त्यांचा मुशाहिरा पाहिला तर त्यांत नित्य खर्च निघणें कठीण: आणि नैमित्तिक खर्चासाठीं वडिलार्जित स्थावर जंगम किती पिढ्या पुरणार ? मेहनत करून किंवा अक्कल लढवून कांहीं कमाई करावी तर अशा सोयी किंवा कारखाने खेड्यांत नसतात. तेव्हां येऊन जाऊन हात घालावयाला जागा म्हटली म्हणजे खुषीची किंवा जुलमाची पानसुपारी. वारसाची किंवा लायकीची चौकशी, रजिस्टराकडे ओळख किंवा मिळकतीची चतुःसीमा वगैरे कामांत गरजू पक्षकारांनीं त्यांना खूष केलें नाहीं तर दिवस मोडून काम बिघडतें. पाटील-कुळकर्णी कलभंड असले तर त्यांचा प्रळय बराच फैलावतो. तरी पण वाम मार्गानें गब्बर होणें कठीण, हें लहान मूल देखील सांगेल.

वतन मिळविण्यासाठीं वतनदार एकमेकांचें उणें काढून त्यांना रसातळाला पोहोंचविण्यास डोळयांत तेल घालून टपलेले असतात. तेव-

---

१ एका गांवीं एका विधवेच्या नांवानें कुळकर्णाची आणेवारी लागली होती. ती तिच्या हयातींतच आपल्याला मिळावी, म्हणून तिच्या जवळच्या भाऊबंदानें ती व्यभिचारी असल्याचा बनावट पुरावा करून तिला वतनांतून वजा करण्याचा प्रयत्न केला. तो असाः-गांवच्या जननमरणाच्या रजिस्टराची एक प्रत महिनाअखेर डेप्युटी सॅनिटरी कमिशनरकडे जाते; व अस्सल कागद तालुक्यांत दोन वर्षांनीं जातो. महिनाअखेर डेप्युटी सॅनिटरी कमिशनरकडील प्रत निघून गेल्यावर ह्याला युक्ति सुचली कीं, गांवच्या प्रतींत ती बाळंत झाल्याची नोंद करावी, आणि पुढें मागें तालुक्यांतून तिची नक्कल मागवून तिला व्यभिचारी ठरवावें, म्हणजे तिच्या नांवावरील आणेवारी आपल्या नांवावर चढेल. कांहीं वर्षांनीं ह्याप्रमाणें त्यानें अर्ज देऊन चौकशी उपस्थित

( पृष्ठ ८६ पहा. )

ढ्यासाठीं कामावर असलेल्या भाऊबंदांच्या चुका काढण्यास, त्यांजवर कुभांड रचण्यास, खोटानाटा पुरावा करण्यास ते सदैव तत्पर असतात; आणि कामगार वतनदारही आपल्या भाऊबंदांस व त्यांच्या गोटांतल्या गांवकऱ्यांस परत टोला देण्याची अगर मेला मुर्दा उकरून काढण्याची एकही संधि वाया जाऊं देत नाहींत. वतनाच्या वारसचौकशींत वतनदारांनीं खोटा पुरावा केल्याचीं उदाहरणें जागोजाग सांपडतील. सारांश, पाटील-कुळकर्ण्यांच्या नांवानें खर्च पडणारा मुशाहिरा बहुतेक अर्ज आणि अपिलें ह्यांच्यांत गडप होतो, असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. वतनें मिळविण्यासाठीं वतनदार पापपुण्याला बिलकुल भ्याले नाहींत, व भीत नाहींत. पूर्वींच्या अंदाधुंदीच्या काळांत त्यांना अतोनात अवदानें मिळत, आणि सरकारामध्यें त्यांचें वजन असे. गादीवर बसण्यासाठीं राजपुत्र हवें तें—वेळेला खूनही—करीतः त्याचींच छोटेखानी नक्कल वतन आपल्या नांवाचें करवितांना वतनदार करीत. त्यांची भाऊबंदकी व वतन मिळविण्याप्रीत्यर्थ उलघाल पाहून युरोपियन लोक थक्क होतात. इकडे पाटीलकीसाठीं जितकी उलथापालथ होते तितकी त्यांचे मुलुखांत ड्यूक होण्यासाठीं कोणी करीत नाहींत. पाटील—कुळकर्ण्यांना वाटलें असावें कीं, इंग्रजींतही आपली पैदास व मानमरातब स्वराज्याप्रमाणें चालेल. म्हणून सरकारी मुशाहिऱ्यावर भिस्त न देतां, त्यांनीं मनांत मनसुभा केला कीं, " इंग्रज बहाद्दर मुशाहिरा द्या किंवा नका देऊं, आम्हांला गांवचें दप्तर घेऊन नुसतें चावडींत बसूं द्या; म्हणजे तुमच्या नांवावर आम्ही आपलें पोट वाटेल तसें भरूं. " जसजसा इंग्रजी अंमल बसला तसतसा त्यांच्या

---

( मागील पृष्ठावरून समाप्त. )

केली; पण अखेर डेप्युटी सॅनिटरी कमिशनरकडील दाखला आल्यानें गांवचा कागद खोटा ठरला, आणि कुळकर्णीबुवांची मसलत फसली. एका पाटलानें आपल्या तक्षिमदारास दासीपुत्र ठरवून, त्याजवर अबकारी का कोणतासा खटला करविला, व तक्षिमदारानें त्याचेवर कोंडवाड्यांत आलेलें घोडें उपटल्याबद्दल खटला रचला, आणि दोघेही पांच सात हजार रुपयांना बुडाले.

भ्रमाचा भोपळा फुटत चालला. कारण, त्यांची पोटदुखी काढण्यासाठीं सरकारचा यत्न अव्याहत चालूं आहे. कामाच्या पाळ्या ठरल्यामुळें वतनदारांना पाळी संपली, म्हणजे रिकामें बसण्याचा प्रसंग येतो, आणि रिकाम्यांना तेव्हांच उपद्व्याप सुचतात. दुसरा धंदा करणें कमीपणाचें आहे असें कित्येक समजतात. तसेंच गांव सुटला म्हणजे लोकांवरील बस कमी होतो, म्हणूनही पुष्कळजण उद्योगधंदा पाहण्यासाठीं गांव सोडीत नाहींत. तशांतून जे गांव सोडून दुसरा धंदा पत्करतात, ते पाळी आली म्हणजे तो धंदा सोडून गांवकीवर येतात. अशा प्रकारें गांवकीवर कोणा एकाचेंही धड चालेनासें होऊन यादवी मात्र गांवभर पिंगा घालते.

आतां वतनांतील 'हिंग गेला आणि वास राहिला.' तरी वतनदारांतील पिढिजाद गुणावगुण एकदम कसे जातील ? स्वतः पैसे मारावेत आणि अधिकाऱ्यांनाही चारावेत, ही पूर्वापार परंपरा. दिवसेंदिवस किफायत घटत चालली; पण गांवकुटारी भानगडी मात्र यथामति, यथाशक्ति चालूं आहेत. त्यामुळें पाटील—कुळकर्ण्यांच्या कानीं लागल्याशिवाय परोपकारी माणसाला गांवांत पानसत्रासारखें पुण्याईचें कृत्य करण्याची सुद्धां पंचाईत पडते. आपलें पागोटें शाबूत ठेवण्यासाठीं आपणांशीं नेहमीं संबंध असणाऱ्या हलक्या नोकरांना त्यांना हाताशीं धरावें लागतें, निदान गप्प बसण्याइतकी तरी त्यांची हरप्रकारें मनधरणी किंवा डोळाचुकव करावी लागते. गांवकामगारांना सरकार आणि रयत यांच्यामधील दुवा म्हणून कितीही आळविलें, आणि प्रसंगविशेषीं शेलापागोट्यांनीं त्यांचा बहुमान केला तरी काय होणार ? 'द्रव्येण सर्वे वशाः ' अशी जर लोकांची समजूत—मग ती अजाण म्हणा कीं तिला दुसरें एखादें विशेषण द्या—आहे, तर ओढगस्त पाटील—कुळकर्णी लांचलुचपतीवर पाणी सोडण्याला कसे तयार व्हावेत ? पाटील—कुळकर्ण्यांची कसूर व अपराध उघडकीस आणणें मुष्किलीचें होतें. वसुलाची अफरातफर केल्याचा बोभाटा झाला, म्हणजे कित्येक वेळां गांवकरी वर्गणी करून

पैसे भरतात, व कानांवर हात ठेवून पुरावा लंगडा पाडतात. गांवकामगार पैसे खातात, त्यांत बहुधा सर्व जातींच्या गांवगुंडांची पाती असते. तरी ह्या बाबतींतल्या खटल्यांत निरक्षरतेच्या सबबीवर कुळकर्ण्यांखेरीज इतरांना निसटून जाण्याला सांपडतें. मे. एम्. केनडीसाहेब बहादूर, इन्स्पेक्टर जनरल ऑफ पोलीस, इलाखा मुंबई, ह्यांनीं गुन्हेगार जातींसंबंधानें इंग्रजींत पुस्तक रचिलें आहे; त्यावरून असें समजतें कीं, वंजारे, मांगगारोडी, काथकरी, वाघरी वगैरे जातींच्या चोरट्यांना पाटील लोक मदत करतात. छप्परबंद नांवाचे लोक खोटीं नाणीं पाडतात; त्यांना त्यांच्या गांवच्या पाटलाची मदत असते. ती इतकी कीं, ते पाटलांच्या बायकांच्या नांवानें मनिऑर्डरी करतात. बेरड, कैकाडी, भिल्ल, गुजराथ–कोळी, पारधी, रामोशी जातींच्या चोरट्यांना पाटील–कुळकर्ण्यांचें अंग असतें. भामटे लोक पाटील–कुळकर्ण्यांची मूठदाबी करतात, आणि मनिऑर्डरी व पार्सलें पाटलांच्या नांवानें पाठवितात. असो, वतनदारांचा अवतार मागेंच संपला. जोंपर्यंत वतन–पद्धति आहे तोंपर्यंत गांव–गाड्याचा कारभार निर्मल व वक्तशीर होण्याची आशा करणें, म्हणजे 'मुसळाला अंकुर फुटण्याची' वाट पहात बसण्यासारखें आहे.

# बलुतें–आलुतें.

पाटील–कुळकर्ण्यांपेक्षां हलक्या दर्ज्याचे गांवनोकर म्हटले म्हणजे महार जागले होत. त्यांना प्रांतपरत्वें निरनिराळ्या संज्ञा आहेत. त्यांची यादी '**गांव–मुकादमानीं**'त दिलीच आहे. सरकार उपयोगी वतनदार गांवनोकरांमध्यें आतां बलुतदार काय ते महार जागलेच राहिले आहेत, आणि रयत उपयोगी गांवनोकरांपेक्षां त्यांना बलुतें फार मिळतें. त्यांचीं कांहीं कामें रयत उपयोगी मानतात, म्हणून महार–जागल्यांना सरकार–रयत–उपयोगी गांवनोकर असेंही म्हणतात. पाटील–कुळकर्ण्यांप्रमाणें त्यांचीं तपशीलवार वतन–रजिस्टरें पुष्कळ ठिकाणीं होणें राहिलीं आहेत. जागल्याची नेमणूक बहुधा तहायात असते; ती पोलीस सुपरिंटेंडेंट करतो, व तिला प्रांत मॅजिस्ट्रेटची मंजुरी लागते. त्यांच्या नेमणुकीचें काम सरकारांत गेल्यामुळें कोणच्या गांवाला किती जागले लागतात, ह्याची वेळोवेळीं सरकारी अंमलदार चौकशी करतात, आणि जरूर तितक्याच जागल्यांची नेमणक करतात. ह्यामुळें सरकारनें नेमलेल्या जागल्यांची संख्या गांवोगांव नियमित झाली आहे. परंतु गांवकामगार सदर संख्येपेक्षां जास्त जागले गांवकीवर लावून घेतात, किंवा कोठें कोठें ते स्वतःच कामावर उभे राहतात. अशा जागल्यांना सरकारांतून मुशाहिरा मिळत नाहीं, पण गांवकऱ्यांकडून बलुतें, हक्क वगैरे मिळतात. जागल्यांना कोठें कोठें इनाम जमिनी आहेत. सरकार नेमतें त्या जागल्यांना तें दरसाल पांच ते दहा रुपये रोख मुशाहिरा देतें. गांवकामगार दरसाल मामूल वहिवाटीप्रमाणें गांवकीवरील महारांना नेमून घेतात. महारांची काठी कोठें अक्षयतृतीयेला, तर कोठें भावईच्या अमावास्येला बदलते. महारांना रोख मुशाहिरा नाहीं. बहुतेक गांवीं महारांना इनाम जमिनी आहेत, त्यांना '**हाडकी हाडोळा**' म्हणतात. ज्या गांवीं महारांना इनाम नाहीं त्यांतल्या क्वचित् गांवांत त्यांना जागल्याप्रमाणें रोख पांच दहा रुपये सालीना मुशाहिरा सरकार

देतें. अशा ठिकाणीं महारांची संख्या जागल्यांप्रमाणें सरकारनें नियमित केली आहे. तरी पण गांवकामगार तिजपेक्षां जास्त महार लावून घेतात. साधारणतः सर्वत्र पाडेवार महारांची संख्या प्राचीनपासून जी चालत आली आहे तितकीच सर्वत्र अद्याप कायम आहेः किंबहुना गांवकामगारांच्या चालढकलीनें ती वाढली असें म्हटलें तरी चालेल. गांवकीचे कामाबद्दलची जिम्मा नेमलेल्या महारांवरच आहे, असें सरकार, गांव व महार समजत नाहींत; ती समस्त महारांची समजली जाते. म्हणून, ज्या गांवीं गुरांना विषप्रयोग फार होतात, तेथलें सबंध महार-वतन सरकार जप्त करतें. महार-जागले ह्यांचें पोट सर्वस्वीं रयतेकडून मिळणाऱ्या ऐन जिनसी बलुत्यावर चालतें. त्यांच्या कामाबद्दल रयतेकडून मिळणाऱ्या बलुत्यांसबंधानें लढा पडला म्हणजे वतन आक्ट कलम १८ प्रमाणें कलेक्टर पंचायत नेमतो. तिचे दोन पंच गांवकरी व दोन पंच वतनदार महार जागले नेमतात, आणि सरपंच कलेक्टर नेमतो. पंचायतीच्या निवाड्याप्रमाणें वतनदार महार जागल्यांनीं आपलीं कामें केलीं पाहिजेत, आणि रयतेनें त्यांना हक्क दिले पाहिजेत. सरपंच नेमल्या तारखेपासून सात दिवसांत पंचायतीनें निवाडा न दिला, तर कलेक्टर निकाल देतो, व त्याप्रमाणें अंमलबजावणी होते.

महार-जागले हे पाटील-कुळकर्ण्यांचे हरकामे शिपाई होत. सरकारी कामानिमित्त ज्या इसमाची त्यांना गरज लागते त्याला बोलावणें; गांवांत कोणी परकी मनुष्य आला, जनन, मरण किंवा गुन्हा झाला, काळी-पांढरींतली सरकारी मालमत्ता, झाडें, हद्दनिशाण्या यांचा बिघाड झाला किंवा सरकारी जागेवर कोणीं अतिक्रमण केलें, तर त्याबद्दलची बातमी पाटील-कुळकर्ण्यांना देणें; गांव स्वच्छ ठेवणें; गस्त घालणें; पाटील-कुळकर्ण्यांबरोबर काळी-पांढरींत व परगांवाला सरकारी कामानिमित्त जाणें; गांवचा वसूल, कागदपत्र व सरकारी सामान ठाण्यांत किंवा परगांवीं पोंचविणें; पलटणचा बंदोबस्त, सरकारी अंमलदारांची सरबराई, गाड्या धरणें वगैरे कामांत पाटील-कुळकर्ण्यांना मदत करणें; इत्यादि कामें महार

जागले करतात. जागले वतन हें अवलच्या महार वतनाचा एक पोटभाग असल्यानें अमकें काम महाराचें व अमकें जागल्याचें असा स्पष्ट भेद करतां येत नाहीं. तथापि, महार मुलकीकडील व जागले पोलीसकडील नौकर असल्यानें वरील कामांपैकीं जीं मुलकी अंमलदारांकडून चालतात तीं महार करतात व जीं पोलीसाकडून चालतात तीं जागले करतात. राज्यव्यवस्थेची सुधारणा होत गेली तसें पाटील-कुळकर्ण्यांचें काम वाढलें, पण महार जागल्यांचें मात्र कमी होत गेलें. त्यांचें सर्व काम पायपिटीचें असल्यामुळें त्यांत त्यांना चुकवाचुकव करण्याला फार फावतें. शिवाय, ते पूर्वींच्या झोटिंगपादशाहींत पुरे कसून निघाल्यामुळें कामचुकारपणा हा त्यांचा व्यवसायधर्मच होऊन बसला आहे. सरकार-रयतेच्या दृष्टीनें पूर्वींचें महारांचें मोठें भरंवशाचें काम म्हटलें म्हणजे शेताच्या बांधउरुळ्या, भाऊ वांटण्या व वहिवाट ध्यानांत धरणें हें होय. पैमाष खात्यानें काळी-पांढरींचे नकाशे तयार करवून सर्व्हे नंबर, पोट नंबर ह्यांच्या हद्दनिशाण्या कायम केल्या, तेव्हांच महारांची ही कामगिरी लोपली. शिवाय स्थावरचे कागद नोंदले जातात; आणि पीकपहाणी, बागाईत पत्रकें, खानेसुमारी वगैरे मुलकी खात्यांकडून तयार होणाऱ्या कागदांत स्थावरच्या हक्कांचा पुष्कळ चांगला पुरावा रयतेला मिळतो. आतां हक्कनोंदणीच्या पत्रकानें सर्वांवर कडी करून बटाईपासून ता खरेदी, वांटणी, कबजापर्यंत जमिनीवरील सर्व हक्क नोंदण्याची तजवीज लावली आहे. पाटील-कुळकर्णी, सर्कलइन्स्पेक्टर तों रेव्हेन्यु कमिशनरपर्यंत अंमलदारांची हद्दनिशाण्या, अतिक्रमण वगैरेंवर नजर व तपासणी आहे. गांवचे नकाशे व इतर सरकारी दप्तरचे कागद पाहून तेव्हांच अतिक्रमण हुडकून काढतां येतें. हद्दनिशाण्या मोडल्याबद्दल पन्नास रुपयेपर्यंत दंड व त्यांतला निमा बातमीदाराला द्यावा, असें लँड रेव्हेन्यू कोडनें ठरविलें आहे. तरी आजपर्यंत महारांनीं अतिक्रमणाचे किंवा बांधउरूळ्यांचे खटले बहुतेक दिले नाहींत, असें म्हटलें तरी चालेल. सबब, बांधउरुळ्यांच्या कामांत सरकारला व रयतेला महारांचा व इतर बलुतदारांचा बिलकुल उपयोग उरला

नाहीं. नकाशे झाल्यामुळें, सडका झाल्यामुळें, व शिपाई लोकांस वाटा माहीत असल्यामुळें अंमलदारांना महार वाटाड्या काढण्याचा प्रसंग क्वचित् येतो. ठाण्यापासून पांच मैलांवरच्या गांवांच्या कुळकर्ण्यांना सर्व्हिस तिकिटें सरकारनें दिलीं आहेत. त्यामुळें गांवीं पोष्ट नसल्यास फार तर पोष्टाच्या गांवापर्यंत महारांना सरकारी लखोटे पोंचवावे लागतात. वसुलाचे बाबतींत पूर्वींचे तगादे, धरणें वगैरे बंद आहे. वसूल न दिला तर व्याज, चौथाई दंड वगैरे शिक्षा लँडरेव्हेन्यू कोडनें ठरविल्या आहेत. वसुलाची मुख्य जबाबदारी पाटील–कुळकर्ण्यांवर असते. तो वक्तशीर न झाल्याबद्दल महारांना कोठेंही शिक्षा झाल्याचें ऐकिवांत नाहीं. म्हणून, कुळाला चावडीवर बोलावणें, दौंडी देणें वगैरेपेक्षां या कामांत जास्त मेहनत महार जागल्यांना पडत नाहीं. मनिऑर्डरीनें पट्टी पाठविण्याची सोय झाल्यामुळें पाटील–कुळकर्ण्यांचें लिहिणें वाढलें, आणि महार जागल्यांचे हेलपाटे कमी झाले. दरोडे बंडाच्या भीतीमुळें गांवाला कूस करून वेशी ठेवीत, व त्या वेसकर राखीत. आतां हवा खेळती करण्यासाठीं गांवकूस पाडतात, आणि वेसही कोणी बंद करीत नाहीं. बहुतेक ठिकाणीं त्या मोडून गेल्या आहेत. तेव्हां वेसकराचें काम उडालेंच म्हणावयाचें. फार बोभाटा न होईल इतक्या बेतानें महार–जागले गांवांत गस्त घालतात, आणि ह्या कामांत फिरतीवरील पोलीसाकडून त्यांची थोडी फार सोडवणूक होते. सडका, रेल्वे, तारायंत्रें झाल्यापासून गुन्ह्यांचें व गुन्हेगारांचें स्वरूप बदललें आहे. आतां या मुलखांतला इसम त्या मुलखांत गुन्हे करतो. त्यांच्या पद्धती व कसब ओळखणें हें गांवपोलिसाच्या वकूबापलीकडचें आहे. म्हणून गुन्ह्यांसंबंधीं बहुतेक कामकाज सरकारच्या पगारी पोलीसाला करावें लागतें. चोर व जंगलीं जनावरें ह्यांपासून उभीं पिकें, व खळीं राखण्याचें काम महार जागल्यांनीं अजिबात टाकून दिलें आहे; आणि पूर्वींप्रमाणें ते जंगलाची गस्तही करीत नाहींत, व चोरवाटा, माऱ्याच्या जागा, घाट ह्यांवर पहाराही करीत नाहींत. इतकेंच नव्हे तर ते स्वतः गुन्हेगार जातींतले असल्यामुळें गुन्हे करतात, अगर पर ठिकाणच्या गुन्हे-

गारांना बातमी देऊन बोलावतात, आणि त्यांचें बेमालुम सारथ्य करतात. कारण, पूर्वींचे राज्यांत गांवाच्याबाहेर माग निघाला नाहीं, तर जागल्याला चोरी भरून द्यावी लागत असे. ही वेसण आतां नाहींशी झाली आहे. सन १८२७ च्या १२ व्या रेग्युलेशनचें ३७ वें कलम असें आहे कीं, एखाद्या गांवांत जबरीची चोरी झाली, किंवा त्या गांवाला चोरट्यांचा माग निघाला, आणि ती गांवपोलिसांच्या अगर गांवकऱ्यांच्या कसुरीमुळें किंवा फुसलतीमुळें झाली असें निष्पन्न झालें, तर डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट किंवा सब्‌डिव्हिजनल मॅजिस्ट्रेटला चोरीच्या ऐवजाची किंमत गांवपोलीस किंवा गांवकरी ह्यांजपासून दंड म्हणून वसूल करण्याचा व ज्याची चोरी झाली असेल त्याला ती आदा करण्याचा अधिकार आहे. पण ह्या कायद्याचा अंमल झाल्याचें ऐकिवांत नाहीं. सरकारी मालमत्ता, झाडें, जंगल वगैरे सांभाळणें, गुन्हे, अपमृत्यु ह्यांची खबर ठेवणें व पोलीसला देणें वगैरेंची मुख्य जबाबदारी पाटील-कुळकर्ण्यांवर आहे. त्यांनीं काळी-पांढरींत चक्कर दिलें पाहिजे, व सर्वत्र नजर ठेविली पाहिजे असा निर्बंध आहे. बलुत्याच्या मिंधेपणामुळें या कामांतील महार जागल्यांचा कानाडोळा किंवा आळसाची हयगय पुराव्यानिशीं शाबीत करणें दुरापास्त पडतें. त्यामुळें पाटील-कुळकर्ण्यांनाच हें काम ओढावें लागतें. गांव स्वच्छ ठेवण्याचें काम मामूलपासून महारांकडे आहे. हें काम खासगी नसून सरकारी आहे, आणि तें घरकीचें आहे अशी महारांची समजूत होऊं देऊं नये, असें तारीख २८ जून सन १८८८ च्या सरकारी ठराव नंबर ४२७३ मध्यें फर्माविलें आहे. मेलेलें जनावर महार ओढून नेतात, आणि जवळच नाल्यांत अगर खोंगळींत टाकतात. गांवचे रस्ते झाडण्याचें ते साफ नाकारतात. कोणी मोठा अंमलदार गांवीं येणार असला म्हणजे ते गांवकऱ्यांच्या मागें जिकडे तिकडे साफसूफ करण्याची निकड लावतात, आणि आपण फारतर चावडीपुढें व कांहीं ठिकाणीं येण्याजाण्याच्या रस्त्यावर खराटा फिरवितात. ज्याचे हद्दींत घाण असेल त्याचेवर फौजदारी खटला होतो, त्यामुळें स्वतः राबून किंवा महारमांगांना मोल देऊन

जो तो आपली जागा साफ करतो. देशांत जसजशी दुकानदारी वाढली, सडका, रहदारी बंगले झाले, तसतशी सरबराईच्या कामांतील महार–जागल्यांची पायपीट कमी झाली. हव्या त्या जिनसा दुकानांत मिळूं शकतात; आणि सरकारी सामान व्यवस्थेनें लावणें, तें सांभाळणें, गाड्या ठरविणें इत्यादि कामांसाठीं अंमलदारांबरोबर सरकारी खासगी नोकर असतात. सरबराईच्या कामांत महार जागल्यांना चांगली पैदास असते. त्यांना फिरती अंमलदार दोन ते आठ दहा रुपयेपर्यंत पोस्त देतात. मामलेदारापर्यंत सरकारी सामानाचें गाडीभाडें मिळतें, त्यामुळें महारांची सरकारी बिगारही कमी झाली. मनुष्याचें वजन पडण्याला हिंदीस्तानांत तरी संपत्ति किंवा अधिकार लागतो. पाटील–कुळकर्ण्यांचीं दोन्हीं अंगें उणीं पडल्यामुळें त्यांना महार-जागल्यांकडून सक्तीनें काम घेतां येत नाहीं. पाटील–कुळकर्ण्यांनीं दिलेले सरकारी कागद महार–जागल्यांनीं ठाण्यांत न आणतां टपालांत टाकले, ते नाटपेड झाले, आणि त्यांचें पाटील–कुळकर्ण्यांनीं भरलेलें हांशील महार–जागल्यांनीं दिलें नाहीं, असें कित्येक वेळां पाहण्यांत येतें. महार–जागले पूर्वींइतके पाटील–कुळकर्ण्यांबरोबर गांवांत व परगांवीं जात नाहींत. शंकु–साखळी घेऊन सर्कल इन्स्पेक्टरबरोबर शिवारांत जाण्यासाठीं महार काढणें झाल्यास पुष्कळ पाटलांना महारवाड्यांत हेलपाटे घालावे लागतात; नंतर कोणाची बारी आहे याची विचारपूस सुरू होते, आणि बारीवाला घरीं नाहीं अशी तास अर्धातास खळखळ चालून कसातरी महार मिळतो. लोकस्थितीचें सूक्ष्म निरीक्षण करणाऱ्या **परशराम** कवीनें केव्हांच भाकीत केलें,

पाटीलकुळकर्णी नांव उगीच घालून दमले येरझारा ।
सत्ता साहेबी अगदीं बुडाली महाराचा त्यांहूनी तोरा ॥

स्वराज्यांत गांवकऱ्यांचें वित्त व जीवित ह्यांचें नेहमींचें रक्षण सरकाराकडून होत नसे. म्हणून गांवगाड्यानें महार–जागल्यांचें एक लहानसें लष्कर तयार केलें; आणि दरोडखोर व बंडखोर ह्यांशीं झुंजणें व गांवमुकादमानींतलीं जातिपरत्वें कामें, ह्यांचा ठोकळ अंदाज पाहून गांवानें त्यांची संख्या ठरविली. पूर्वींच्या भोपळसुती अमदानींत जसजसें फावलें तसतशी ती

फुगत गेली असावी असें वाटतें. आतां दंगेधोपे नामशेष आहेत, आणि क्वचित् झाल्यास ते मोडण्याला आणि गुन्ह्याचा बंदोबस्त करण्याला सरकारचें लष्कर व पोलीस आहेच. सरकारच्या निरनिराळ्या खात्यांनीं व सुधारणांनीं महार–जागल्यांचें काम किती कमीं केलें आहे, आणि त्यांतलेंही ते कसें चुकवितात ह्याचें दिग्दर्शन वर केलें आहे. तरी पण कामाच्या मानानें पाटील–कुळकर्ण्यांची संख्या ज्याप्रमाणें सरकारनें उतरविली, तशी महार–जागल्यांची उतरविली नाहीं. जरूरीपेक्षां जास्त कामकरी असले म्हणजे खेळणी चालून काम बिघडतें, आणि खर्च मात्र अधिक येतो. 'रिकामा न्हावी आणि भिंतीला तुमड्या लावी,' हा सर्वानुभव महार–जागल्यांच्या संख्येला लागू करणें अत्यंत आवश्यक आहे. नगर जिल्ह्यांत सुमारें चार हजार वस्तीच्या पारनेर गांवाला महार–जागल्यांचें राजरोष लष्कर ५० आहे. तें असें:–३२ महार, ४ वेसकर, ८ रामोशी जागले, २ सोनार व २ मुसलमान जागले ऊर्फ हावालदार आणि एक दोन नायकवाडी. इतके लोक तेथें शिवारांत व बाजारांत हक्क बेधडक उकळतात. सरसकट २५० चौरस मैल क्षेत्र व पाऊणलाख लोकवस्ती असणाऱ्या तालुक्याला १५।१६ मुलकी शिपाई व ३०।३५ पोलीस शिपाई पुरतात, तर खेड्याच्या कामाच्या मानानें प्रत्येकीं किती महार–जागले लागतील हें मुकरर करणें फारसें कठीण नाहीं. दुष्काळाच्या दिवसांत लोकांत चलबिचल व हालचाल जास्त असते, गुन्ह्यांचें प्रमाण चढतें, आणि तपासणीअंमलदारांची संख्या वाढून त्यांचा गांवगन्नां मुक्कामही अधिक होतो. म्हणून सुबत्तेपेक्षां दुष्काळांत गांवकीचें कागदी व पायपिटीचें काम रगड माजतें, आणि त्यांतच महार–जागले पोटामागें गांव सोडून जाण्याचा संभव अधिक असतो. अशा स्थितींत गांवचे किती महार–जागले डोळांत ( सरकार दुष्काळांत महार-

---

१ धांदरफळ तालुके संगमनेर जि. नगर येथें लोकसंख्या सुमारें १६२५ वसूल सुमारें ३७०० रुपये असून तेथें महार १६, वेसकर ४, आणि जागले ३ आहेत. ठाकुर पिंपळगांव तालुका शेवगांव जि. नगर येथें गांवाची लोकसंख्या ८०० असून गांवाला ८ महार व २ कां ३ जागले आहेत.

जागल्यांना रोकड किंवा धान्य खावटी देतें त्याला डोल म्हणतात. )
घालावे ह्याचा सरकारनें खालीं लिहिल्याप्रमाणें निर्बंध केला आहे.

| लोकसंख्या | महार | जागल्या |
|---|---|---|
| १ ते ५०० | १ | १ |
| ५०१ ते १००० | २ | १ |

आणि पुढें दर १००० लोकसंख्येला १ महार व १ जागल्या. ह्यावरून एवढें खास कीं, हें प्रमाण एरवींच्या दिवसांत फारच सढळ होईल. तेव्हां महार-जागल्यांसंबंधानें अगदीं निकडीची सुधारणा झटली म्हणजे कामाच्या मानानें गांवाप्रत त्यांची संख्या ठरविणें, नेमणुकीच्या महार-जागल्यांखेरीज इतरांना काळी-पांढरींत हक्क उकळण्याची सक्त मनाई करणें, आणि त्यांचें वतन रजिष्टर करणें ही होय. सरकारच्या सर्व खात्यांत वेळोवेळीं छाटाछाट होत असतांना महार-जागल्यांच्या संख्येला धरबंध असूं नये आणि ह्या पेंढारानें सरकारच्या नांवावर बेसुमार चरावें ही नैतिक व सांपत्तिक पिछेहाट होय !

शेतांतील वहिवाट, वांटण्या, विहीर, पाट यांचें पाणी घेण्याच्या पाळ्या इत्यादि कामीं महार-जागल्यांच्या तोंडी पुराव्याचा रयतेला उपयोग होत नाहीं. पिकाचें, फळांचें व गुरांचें रक्षण कुणब्यांना जातीनें किंवा राखणदार ठेवून करावें लागतें. भडोच जिल्ह्यांतील झाडेश्वर गांवीं असें समजलें कीं, सुमारें १०।१२ वर्षांपासून शेती सांभाळण्यासाठीं कुणब्यांना अजमासें ६०० सिंधी लोक दरसाल पगार देऊन ठेवावे लागतात. नगर जिल्ह्यांतील शेवगांव तालुक्यांतील मुंगी व लाखेफळ गांवीं कुणब्यांनीं अनुक्रमें ५ ते ७ व २ खंडी धान्य दरसाल देण्याच्या करारानें कोल्हाटी लोक पिकें राखोळीसाठीं ठेवल्याचें पाहण्यांत आलें. रानडुकरांपासून पिकांचें रक्षण करण्यासाठीं कांहीं ठिकाणीं कुणबी शेतांत पिकाभोंवतीं खोल व रुंद खंदक खणतात, आणि कित्येक ठिकाणीं कोल्हाटी, वड्डर वगैरे मोलानें ठेवतात. ह्याप्रमाणें ह्या कामांतही कुणब्यांना महार जागल्यांचा उपयोग होत नाहीं. गांवकऱ्यानें स्वतःसाठीं किंवा पाहुण्यासाठीं महार-जागल्यांपैकीं वाटाड्या

काढला तर त्याला भाकर, धान्य किंवा तीन चार आणे रोज द्यावा लागतो. खानदेशांत आग्रा रोडवर भिल्लांच्या चौक्या पहाण्यांत आल्या. त्या कोणीं बसविल्या हें समजलें नाहीं. त्यांवरील भिल्ल वाटेच्या गाड्यांबरोबर पुढील चौकीपर्यंत जाऊन आणा अर्धा आणा रहदारी (दस्तुरी) घेतात. गांवांत घोडें, गाडी रात्रीं मुक्कामाला राहिली तर महार जागले आणा अर्धा आणा जागलकी घेतात. पूर्वी लोक गांव सोडून धंद्याला देखील लांबवर जात नसत, आणि सोयरसंबंधही दूर गांवीं करीत नसत. त्यामुळें चिठ्ठी-चपाटी, निरोप–पडताळा, मुऱ्हाळकी या कामीं महारांचा उपयोग होई. आतां हें सर्व पालटलें आहे. त्यामुळें व टपालखात्याचें जाळें सर्व देशभर पसरल्यामुळें महारांची जासुदकी सुटली. गांव झाडून साफ करण्याचें काम पाडेवार महार टाकवेल तितकें अंगाबाहेर टाकतात. ह्याप्रमाणें महार–जागल्यांच्या सार्वजनिक अथवा गांवकीच्या कामाची कहाणी झाली. घरकी कामाबद्दलही तेंच किंवा त्याहून अधिक रडगाणें आहे असें म्हटलें तरी चालेल. तोंड पाहून गांवांतल्या कर्त्या लोकांचीं, पाटीलकुलकर्णी, देशमुख–देशपांडचे, किंवा श्रीमंत कुणबी ह्यांचीं मात्र थोडीं फार घरकीं कामें महार करतात; पण तीं सुद्धां पुष्कळ बोलावणीं पाठवून गांठ पडल्यास करतात. नाहीं तर 'पाटील मी घरीं नव्हतों, मला कळलें नाहीं' वगैरे थाप मारून चाळवतात. गरीब कुणब्यांना त्यांच्याकडे हेलपाटे घालण्याला, त्यांची वाट पाहण्याला व त्यांशीं हुजत घालीत बसण्याला सवड नसते. कुणब्याचे गोठे साफ करतांना आतांशा महार आढळत नाहींत. कांहीं ठिकाणीं घरांपुढें झाडण्याला महारणी फुरसतीनें येतांना दिसतात. नांगर, कुळव, बीं वगैरे ओझें ज्या त्या कुणब्याला स्वतःच घरून शेतांत न्यावें लागतें. बोलावलें तर 'येतों जातों' अशी महरांची टंगळमंगळ चालते. हीं कामें निकडीचीं असतात. त्यामुळें शेंकडा एका कुणब्याचें सुद्धां–आऊतकाठी, मोट, बीं, सर्पण वगैरे ओझें महारांच्या वांट्याला येत नाहीं. फॉरेस्ट झाल्यामुळें व ओहोळ–खोळ वगैरे ठिकाणांचीं झाडें सरकारच्या मालकीचीं असल्यामुळें महारांचें सर्पण पुरविण्याचें काम

आयतेंच सुटलें. स्थलपरत्वें, कालपरत्वें आणि जातिपरत्वें महारकी वतनांत जागलकी, वेसकरकी इत्यादि फोड झाली, आणि महार-मांगांनीं आपापलीं कांहीं मूळचीं कामें टाकून दिलीं, व तीं दुसऱ्या जातींनीं उचललीं. त्यामुळें महार-मांगांचें काम हलकें झालें, आणि रयतेवरील बलुत्याचा बोजा मात्र वाढला. गुजराथेंत धेड फक्त मेलेलें ढोर उचलतात, व मेलेलीं कुत्रीं, मांजरें भंगी उचलतात. केरसुण्या, शिंकीं, कासरे, नाडे, आटणें ( त्यांसाठीं ताग आंबाडीचे वाख, दोरखंड, कुणबी आपल्या पदरचे पुरवितात. ), जुंपण्या, वेल्हें, वेठण, मोऱ्हक्या, पिछाड्या, प्रेताची सुतळी, डफ वाजविणें, मरेआईची पूजा, फांशी देणें वगैरे कामें जातिधर्म म्हणून मांग करतात. त्यांतलींही कांहीं कामें उदाहरणार्थ—साळयांच्या कुंच्या, शिंकीं, कासरे, जुंपण्या, हातळी, पिछाड्या, मोऱ्हक्या वगैरे मांगानें सोडून कंजार, माकडवाले वगैरे जातींच्या गळ्यांत घातलीं; आणि प्रेताची सुतळी तर बाजारांतून विकत आणावी लागते.

ओढून नेलेल्या जनावरांची फाड जेथें होते तेथेंच त्यांचीं हाडकें पडावयाचीं. ढोर ओढणें हें महारकीचें मुख्य काम आहे, आणि त्यांची फाड महार इनामांत व्हावयाची; म्हणून महार इनामांना हाडकी-हाडोळा ही संज्ञा प्राप्त झाली, व हाडारक्ताचें खत त्यांना अनायासें मिळूं लागलें. हाडकी-हाडोळ्याच्या जमिनी, व असतील तेथील जागले-इनाम, महार-जागले स्वतः करीत नाहींत. ते त्या कोणातरी कुणब्याला बटाईनें लावतात, व कांहीं ठिकाणीं त्या गहाण पडलेल्याही दृष्टीस पडतात. हाडकी-हाडोळ्याच्या जमिनी बहुधा फार सरस असतात. तरी महारजागल्यांना इनामाचें उत्पन्न आहे आहे नाहीं नाहीं अशांतलें आहे. जागले नेमतांना तालुका पोलीस कुणब्यांकडून लेखी कबुलायत करून घेतात कीं, मामुलप्रमाणें दर जागल्यास एक शेर तें एक पायली धान्य देत जाऊं. ह्याचप्रमाणें दुकानदारही सालींना प्रत्येकीं कांहीं पैसे देण्याचें कबूल करतात. कोठें कोठें दर कुळामागें दरसाल एक रुपया व पेठेंतील दुकानामागें आठ आणे रामोसपट्टी ह्मणून जागल्यांना देण्याचा प्रघात आहे. ही वहिवाट पाडण्याच्या व

चालविण्याच्या कामांत त्यांना गांवकामगारांचें विशेषतः पोलीस पाटलाचें अंग असतें. महार दर शेतांत बलुतें उकळतात, त्याला स्थानपरत्वें पेंढी, शेर, पसा अशीं नांवें आहेत. प्रांतपरत्वें बलुत्याचे दर, प्रकार व धान्यें निरनिराळीं आहेत. कोठें दोन बैलांच्या नांगरामागें शंभर पेंढ्या तर कोठें अर्धमण धान्य, कोठें भात नागली, तर कोठें ज्वारी बाजरी, ह्याप्रमाणें बलुतें देतात. एका गांवच्या इसमानें दुसऱ्या गांवचें शेत केलें तर त्याला 'ओवांड्यानें' शेत केलें असें ह्मणतात. गांवकऱ्यांपेक्षां ओवांडदारांकडून महार जागले दिढीनें बलुतें घेतात. शेतमाल तयार होऊन खळें लागलें, व धान्याची राशि पडूं लागली म्हणजे त्या सरईला '**खळवट**' '**रासमाथा**' '**सुगी**' किंवा '**हंगाम**' म्हणतात. ज्या प्रदेशांत जें खाण्याचें मुख्य धान्य असेल त्याचें बलुतें कुणब्यानें रासमाथ्याला द्यावयाचें असतें. कुणब्यानें जर तें पेरलें नाहीं तर तारतम्यानें त्याचा मोबदला त्यानें जें पेरलें असेल त्या धान्याच्या किंवा रोकड पैशाच्या रूपानें तो देतो. कुणब्याजवळून बलुत्याखेरीज बींबियाणें घेण्याची सर्व कारूनारूंची वहिवाट आहे. कारूनारूंना आपल्या जमिनी पेरण्यास कोणतीही अडचण येऊं नये, हा बीं पुरविण्याचा हेतु असावा. कामगार महार जागले मामूल शिरस्त्याप्रमाणें व्यक्तिशः बलुतें नेतातच, पण त्याखेरीज समस्त महार व समस्त जागले म्हणून तिसऱ्या किंवा धाकट्या ओळीचा हक्क मागण्याला सबंध महारवाडा व महार, मांग, भिल्ल, कोळी, रामोशी वगैरे ज्या जातीचे जागले असतील, तिचे सर्व पुरुष एकमेळानें शिवारांत जातात. महार जागले खळें मागण्याला एकट दुकट कधींही जात नाहींत. जमावानें गेले म्हणजे आळवणी, दाबादाब, कटकट व धमकी चालते आणि कुणबी गाय होतो. हक्कापेक्षां जास्त मागण्याची इच्छा झाली म्हणजे मोहबत पाडावी लागते. मोहबतीची मिळकत म्हणजे प्रतिष्ठित भिक्षा होय. मोहबतीपेक्षांही अधिक मागण्याची इच्छा झाली म्हणजे निलाजरेपणानें गरिबी गाऊन हात पसरला पाहिजे. भीक घालण्यास दाता नाखूष दिसला तर त्याची फाजील स्तुति, त्याला आशि-

र्वाद, शाप देणें वगैरे प्रकारचा लोंचटपणा करून कार्य साधलें पाहिजे. आणि इतक्यानें होणाऱ्या प्राप्तीनें जर वृप्ति झाली नाहीं तर पुढचा मार्ग म्हटला म्हणजे चोरी. सारांश हक्क, मोहबत, भीक, लोंचटपणा व चोरी हीं जपमाळेच्या मण्यांप्रमाणें एकामागून एक येतात. असो. गांवांत जें मुख्य धान्य पिकतें त्याचे शेंकडा ४ तें ६ महारांना व शेंकडा २ तें ४ जागल्यांना प्राप्त होतात. नांगरामागें महारांना शेर दोन शेर व जागल्यांना शेर अच्छेर बीं मिळतें; आणि जमीन असो वा नसो व ती ते करोत वा न करोत, कुणब्यांजवळून ते चोपून सालोसाल बीं घेतात. वर जीं मांगांचीं जातकामें सांगितलीं त्यांबद्दल मांगांना जागल्याच्या उत्पन्नाचा आठवा भाग स्वतंत्रपणें मिळतो. शिवाय शेत पेरण्यापूर्वीं मुहूर्तानें विडा सुपारी घालून बियानें मांगिणीची भरभक्कम ओटी भरावी लागते. जोंधळा उपटण्यापूर्वीं ' पाटा ' ( दहा तिफणी इतका भाग ) सोडतात. तेथें कोरभर भाकरी व एक तांब्या पाणी टाकून गळ्यांत पागोट्याचा वेढा घेऊन कुणबी पाया पडतो, त्याला ' सीतादेवी 'ची पूजा म्हणतात. ह्याप्रमाणें सोडलेल्या शेत-भागांतील पीक व पूजेची भाकर महार नेतात. हा झाला कसा तरी हक्क-भिकेचा पसा. येथून पुढें दंडेली, लोचटपणा व चोरी लागते.

धान्य उफणतांना ' उडती पाटी 'महार जागले घेतात. वेटाळणी किंवा सोंगणी झाल्यावर जीं कणसें खालीं पडतात, अथवा भुईमूग, रताळीं, बटाटे, मिरच्या, कांदे वगैरे काढून नेल्यावर जें कांहीं कोठें शिल्लक राहतें, त्याला ' सर्वा ' ह्मणतात. जिराईत पिकाच्या सर्व्याला जिराईत सर्वा व बागाईत पिकाच्या सर्व्याला बागाईत सर्वा ह्मणतात. महार, मांग, भिल्ल, रामोशी हे सर्वा हक्कानें काढून नेतात. सुडी रचतांना कुणबी उत्तम गुडाचें ' कोचुळें ' रचतात, त्यांतील मधला थर शेलका असतो. त्यावर सर्व महार गोळा होऊन पडतात, आणि कांहीं दिल्याशिवाय कुणब्याला हालूं देत नाहींत. कठण, मठण, तीळ, करडई, गहूं, हरभरा, कपाशी, भोपळे, बटाटे, कोबी, मेथी, कोथिंबीर, ऊंस, भुईमूग, रताळीं, घास,

कडवळ, आंबे, पेरू, डाळिंबे, बोरें, संत्रीं वगैरे कोणताही उदीम कुणबी करोत; त्याचीं वाणगी सर्व कारूनारू, अलबत्ये गलबत्ये धर्म म्हणून मागून नेतात; आणि त्यांना नाहीं म्हणण्याची सोय नसते. सारांश, पेरणीला शेतांत पाय ठेवल्यापासून तों शेतांतलें तण, झुडपें खांदून काढी-पर्यंत व बिंयांपासून तों थेट ' काशा ' ( गवताच्या मुळ्या ) पर्यंत शेतांत मागणारे उभेच. त्यांतले त्यांत रिकामटेकडे म्हणून महार–मांगांचें झट विशेष असतें. महार जागल्यांच्या जातींची संख्या सरासरी गांवच्या वस्तीच्या मानानें शेंकडा १०–१२ असते; म्हणजे कुणब्यांना शेंकडा १० वर लोक फुकट पोसावे लागतात. ही झाली महार जागल्यांच्या जातीची उघड उघड प्राप्ति. ह्याशिवाय ते कुणब्याच्या मालावर यथेच्छ आडून ताव मारतात तो वेगळाच. महार, मांग, भिल्ल, रामोशी वगैरे जातींचे पुरुष, स्त्रिया आणि मुलें गवत, सरपण, तरवड, बेलाशक कुणब्यांदेखत त्यांच्या शेतांतून काढतात, किंवा चोरतात आणि विकतात. मांगांचा डोळा केकताड अगर घायपातावर विशेष असतो. तें ते तसेंच किंवा चोरून नेतात व तुरळक विकत घेतात. केकताडाचीं चऱ्हाटें होतात व त्याचें कृत्रिम रेशीम बनतें, म्हणून त्याला भावही चांगला असतो. राखणदार नसला किंवा पहाटेस गुंगला म्हणजे ह्यांचें चांगलें बनतें. बाजारांत बहुतेक गवत, सरपण चोरीचें येतें. अहमदनगर जिल्ह्यांत राहुरी संगमनेरकडे संत्रीं, डाळिंबांचे बाग आहेत. त्यांतलीं फळें महार, मांग, भिल्ल, रामोशी चोरून नेतात, असा फार बोभाटा आहे. गवता-सरपणासाठीं येतांना हे लोक भलतीच कुपाटी काढून चोरवाट पाडून

१ पारनेर येथें १९१०–११ सालीं **पुजारी** आडनांवाच्या कुणब्याच्या शेतांत रताळ्यांना खांदणी लागली; तेव्हां १०–१५ महार एकदम संध्याकाळीं शेतावर आले, व प्रत्येकीं तीन चार शेर रताळीं घेऊन गेले. सदर सालीं पिकावरून हींव गेलें होतें. सन १९१२ सालीं कडबा २०–२५ रुपये शेंकडा विकत होता, आणि भर उन्हाळ्यांत १५–२० महारांनीं **औट्या**च्या शेतांतून रताळ्यांच्या पाल्याच्या मोटा व कडवळाचे भारे आपल्या जनावरांसाठीं आणिले.

ठेवतात, गवत उपटतांना पिकें तुडवितात, तेथें जें कांहीं खाण्यासारखें असेल त्यानें तोबरा भरतात, आणि डोळा चुकवून ओटींत कणसें, फळें कोंबतात. एखाद्या कुणबी रागें भरूं लागला तर हे लोक त्यालाच विचारतात कीं, बळीराजा, आम्ही तुमचे पायपोस! आम्हीं पोट कशावर भरावें? इतक्यावर तो उमजला नाहीं तर हे लोक 'बरें बरें, असें आहे कां?' वगैरे खुणेचे व माजोरे शब्द उच्चारतात, म्हणजे कुणबी दचकतो कीं चोरी करून, आग लावून, किंवा जनावरांना विषप्रयोग करून हे वचपा काढणार. मग त्यांनीं घेतलें असेल, तें त्यांना नेऊं देण्यास बिचारा मुकाट्यानें तयार होतो. कारण 'दुर्जनं प्रथमं वन्दे' असें वाडवडील म्हणत आले आहेत. शेतांत चरावयास झालें कीं, हे लोक चालले रात्रीं त्यांत आपलीं गुरें चारण्याला, कणसें आलीं कीं चालले तीं खुडण्याला, सुडी रचली कीं चालले ती फोडण्याला, आणि मळणी चालली कीं चालले रास उपसण्याला! कोंडवाड्यांतील जनावरांचें लिलांव बहुशा महार मांग घेतात, कारण तीं त्यांना फुकट चारावयास आणि नफ्यानें विकावयास फावतें. ज्या कुणब्याचें राखण जबरदस्त असतें त्याचा कसाबसा बचाव होतो. पण ज्याचें राखण कमी किंवा कुतंगळ, त्याचें शेत गतकुळीं असा प्रकार आहे. महार जागल्यांची वास्ति तुटक व घाण असल्यामुळें तेथें जाण्याला तदितर कसकसतात. त्यामुळें शेत-मालाची चोरी झांकणें, व तिची विल्हेवाट लावणें, त्यांना फारसें जड जात नाहीं. चोरलेलीं कणसें कुटून त्यांचें धान्य दुसऱ्या धान्यांत मिसळलें म्हणजे मुद्दा मोडतो. शेतमालाचा मुद्याचा चोर धरणें फार कठीण आहे, आणि धरला तरी चोरी शाबीत करणें त्याहून कठीण आहे. चावडी कचेरींत हेलपाटे घालण्याला कुणब्याला वेळ नसतो, व गाऱ्हाणें करणाराला लोक हलकट ठरवितात. त्यांतून कुणब्याचा पडला आडवा नाडा. दिवसां फिर्याद द्यावी, आणि रातोरात चोराचे आप्तांनीं पीक कापावें, अगर जाळावें किंवा दावण बसवावी, ही जरब केवढी असेल ह्याचा ज्याचा त्यानेंच विचार करावा.

गांवांत पेंव फोडलें म्हणजे पेंवगुड मागण्याला महार जागले जातात. सकाळ संध्याकाळ दोन्ही वेळ घरोघर वेसकरांना भाकरी मिळते. ह्याखेरीज झाडणार महार–महारणी दररोज भाकरी मागतात. साल बदलून नवे महार कामावर आले म्हणजे ते "भावईचे चेले दह्या दुधानें न्हाले। वर्षानुवर्षा पाऊस पाणी घेऊन आले" ॥ हें गाणें म्हणून घरोघर शेर मागतात. ते भाद्रपदांत पितरें मागतात, व आश्विनांत दसरा मागतात. कठीण दिवस म्हणून कुणब्यानें पितराला एखादद्दुसरा जातिबांधव सांगितला तरी दारापुढें महारांचें कडें पडतें, आणि बहुतेक भरती त्यांचीच करावी लागते. ह्यांखेरीज बारा सण, दिवस, व लग्नकार्य इत्यादि निमित्तानें जेव्हां जेव्हां गांवकऱ्यांच्या घरीं चार पानें टाकतात तेव्हां तेव्हां महार जागले व सर्व कारूनारू ह्यांना वाढणीं द्यावीं लागतात; आणि तो ऐपतदार असला तर लग्न, दिवस वगैरे प्रसंगीं सर्व कारूनारू पंक्तीचा ठाव म्हणजे जेवण मागतात. वरवर पाहणाराला असें वाटतें कीं, खेडवळ विशेषतः कुणबी लग्न दिवसाला उगीच जेवते गण गोळा करून बुडतो. पण आंतली गोम अशी आहे कीं, वऱ्हाडी व जातभाईपेक्षां कारूनारूंना जास्त अन्न जातें; आणि तें ते हक्कानें काढतात. त्यांना नाहीं म्हणून चालावयाचें नाहीं. कमी पडलें कीं नुकसान झालेंच समजा. म्हणून सर्वजण निमूटपणें उरावर धोंडा ठेऊन ह्या पेंढारांचीं पोटपुजा करतात. अन्न उकळण्याचे कामीं महार मांगांची सर्वांवर ताण असते.[1] महार जागल्यांशिवाय इतर कारूनारू बहुधा आपापल्या असाम्यांकडेच वाढणें किंवा जेवण मागतात. परंतु महार जागले व त्यांचे जातभाई हे सर्व मिळून प्रत्येक गांवकऱ्याच्या घरीं वाढणें मागण्यास जातात, व त्यांना शेर दोन शेर अन्न सहज लागतें. महार मांग व हलालखोर हे मुसलमानासुद्धां सर्व जातींचें उष्टें खातात,

---

१ ह्याचा अनुभव युरोपियन मिशनऱ्यांनाही आहे. संगमनेर येथें रोमन-कॅथॉलिक बिशपसाहेब आले, तेव्हां बोलावल्याच्या दिढीदुपटीनें महारमांग ख्रिस्ती गोळा झाले, आणि त्यांनीं फादर **वायझॅप** साहेबांना नवीन दळण घालावयास व चुली पेटवावयास लावलें, तेव्हां कशी तरी पंगत उठली !

त्यामुळें हरघडीं उष्ट्याचें नांव पुढें करून ते अन्न मागत सुटतात. दिवाळीला सर्व कारूनारू ओवाळणी मागतात. त्यावेळीं त्यांना चोळीचे खण व पैसे द्यावे लागतात. लग्नामध्यें वराचा शेला महाराला मिळतो. ग्रहणाचे वेळीं महार मांग धान्य, वस्त्र व पैसे मागतात. अमावास्या व मरेआईची पूजा मांगाकडे आहे. कोठें कोठें महारही हें काम करतात. मांगांना दर अमावास्येच्या दिवशीं 'सतका मतका' (उडिदांची डाळ, राळे अगर इतर धान्य, पीठ, मीठ, मिरच्या, तेल इत्यादि जिनसा) घरोघर मिळतो. आषाढांत व विशेषतः पटकी सुरू झाली म्हणजे हे मरेआईचे पुजारी दर मंगळवार शुक्रवार दौंडी देऊन घरोघरचा नैवेद्य मागवितात. नैवेद्याबरोबर नारळ, पैसा सुपारी, बांगड्या, खण वगैरे असतात. बहुतेक ठिकाणीं मरेआईसाठीं सवा मण किंवा अधिक भाताचा बळी काढतात, मांगिणीला हिरवें लुगडें चोळी बांगड्या देतात, आणि मिरवणुकीचे वेळीं खूप नारळ फोडतात व लिंबें कापतात. मरेआईचें उत्पन्न किती होत असावें ह्याचा खालील गोष्टीवरून अंदाज होईल. कर्जत जिल्हा नगर येथें सन १९१२ सालीं गांवकऱ्यांनीं महारांकडून मरेआईची पूजा करविली, आणि सुमारें २५० रु. वर्गणी करून बळी काढला. मांगांनीं एका मुसलमानाला शंभर सवाशें रुपये देऊन त्याच्या बायकोच्या अंगांत मरेआई आणविली, आणि तिजकडून असें वदविलें कीं, मला महाराची पूजा पावली नाहीं, मांगांची पाहिजे! ख्रिस्ती झालेले महार मांग सुद्धां तेवढ्या पुरते मरेआईचे भगत बनून आपली तुंबडी भरून घेतात!! प्रेताचें सरण ब्राह्मण्याबद्दल वतनदारांकडून महार प्रेतावरील वस्त्र, विसाव्याचे जागेचा पैसा व दिवसाचें जेवण घेतात; आणि इतरांपासून पांच आणे तें सवारुपया– प्लेग–पटकीचे दिवसांत दोन रुपयेपर्यंत–मजुरी घेतात. बलुत्यांतच पूर्वीं महार जनावरें ओढून नेत आणि त्यांची माती हाडकें घेऊन मिरासदारांना कातडें आणून देत. उपऱ्या जवळून ते दोन तें सहा पायली धान्य, अगर आठ आणे तें रुपया घेऊन त्यांनाही कातडें परत देत; अशी स्थिति असावी. जनावर ओढण्यासाठीं जें धान्य महारांना देतात त्याला 'घाटा'

किंवा 'हातधुलाई' म्हणतात, व हिरव्या सबंध कातड्याला 'आघोड' म्हणतात. आघोड परत आलें म्हणजे लोक तें ढोराला अगर चांभाराला देऊन त्याचे जोडे, चाबूक, नाडे वगैरे करून घेत. आतां महार सर्रास सर्वांजवळून दोन शेर तें तीन चार पायली पर्यंत घाटा घेतात, पण दांडा-मुडपा करून आघोड आपणच उपटून बसतात. कोठें कोठें देशमुख, पाटील ह्यांना मात्र ते अघोड देतात असें ऐकतों. महर्गतेवरील रिपोर्टांत मि० दत्त ह्यांनीं असें सिद्ध केलें आहे कीं, १८९० ते १९१२ पर्यंत कातड्याची किंमत सरासरी दुपटीनें वाढली आहे. हाडका कातड्यांना जशी किंमत चढली तसें महारांनीं आखडतें घेतलें, व ते चांगले पैसे करूं लागले. अशी लौकिक समजूत आहे कीं, महारांजवळ बेमालूम विषप्रयोगाचीं औषधें व त्यांचा उतारा आहे; त्यामुळें त्यांनीं जनावरांना केलेले विषप्रयोग सिद्ध करतां येत नाहींत, आणि विष घातलेल्या जनावरांची माती त्यांनीं खाल्ली तरी ती त्यांना बाधत नाहीं.

सन १८३९ चा आक्ट २० अन्वयें सरकारनें सर्वांना बाजार उकळ-ण्याची मनाई केली आहे. परंतु पाडेवार महार, जागले व ज्यांचीं कामें सरकारनें वजा केलीं आहेत, असे हवालदार, नाईकवाडी, पोतदार ह्यांचे वंशज, आणि फकीर, गोसावी, बैरागी व अठरापगड ब्राह्मणेतर भिक्षुक रोजच्या व आठवड्याच्या बाजारांत उकाळा, फसकी, शेव इ. उकळतात. गवत, कडबा, सरपण, भाजीपाला, फळफळावळ, तेल, धान्य, पानसुपारी, तंबाखू, विड्या, इत्यादि कांहींही बाजारांत आलें कीं त्यावर ही टोळ-धाड पडलीच. दुकानदार आळम टाळम करूं लागला तर हे लोक मालांत हात घालून तो उपसतात, आणि वेळेवर मारामारीही करतात. पाटील व हलके पोलीस ह्यांचा ओढा महारजागल्यांकडे असल्यामुळें तालुक्याच्या ठाण्यांत देखील त्यांची ही लूटमार बेलाशक चालते; आणि असा

१ पारनेरच्या आठवडे बाजारांत १९१३ चे फेब्रुआरी महिन्यांत **राय-तळयाच्या** एका कुणब्यानें उंसाची गाडी आणली, त्यांतले कांहीं ऊंस पाऊण

(पृष्ठ १०६ पहा.)

बळकट संशय येतो कीं फळफळावळ, ऊंस, शेंगा वगैरे उकाळ्यांतील कांहीं अंश ग्रामप्रभूंकडे जात असावा. ह्यांशिवाय ह्या सर्व लोकांचीं जनावरें बाजारावर मोकार सोडलेलीं असतात, व तीं बेधडक चारा–दाण्यांत तोंडें घालतात. कनिष्ठ स्थितींतले शेतकरी आपला माल खेड्याच्या बाजारांत आणतात, म्हणून वरील शोचनीय स्थिति बंद करण्यासाठीं तांतडीचे उपाय योजिले पाहिजेत. बाजारकऱ्यांना काय आणि एकंदर जनतेला काय, कायदेशीर दाद मागण्याचें किंवा आत्मसंरक्षणाचें अवसान नसतें, हें जसें कुणब्या–वाण्यांच्या भांडणांत दिवाणी कोर्टांत नजरेस येतें तसें फौजदारी कोर्टांतही येतें.

महार जागल्यांना किती किफायत आहे ह्याची अटकळ येण्यासाठीं एक दोन गोष्टी सांगतों. लाखेफळ तालुका शेवगांव जिल्हा अहमदनगर येथें महारांचा आणि गांवाचा लढा पडला. गांवचीं घरें १२५, लोकवस्ती सुमारें ८००, आणि महारांची लोकसंख्या सुमारें २०० असून काळींत सुमारें १०० नांगर चालत होते. लोक महारांना नांगरामागें चार पायल्या धान्य व रोजची भाकर देण्याला कबूल होते. महारांचें म्हणणें असें पडलें कीं, गांवाला आठ महार लागतात तर आम्हांला रोज दर घरची एक भाकर, सणावाराला सर्व महारवाड्याला वाढणें, पड्याची माती व कातडें, आणि शेतांत पिकेल त्याचा दहावा हिस्सा बलुतें याप्रमाणें मिळालें पाहिजे. शेरांत चार भाकरी होतात व एक वेळच लोक भाकरी घालतात, असें मानिलें तर महारांना सवाशें घरांच्या रोजच्या आठ पायल्या म्हणजे सालाच्या बारा खंडींच्या भाकरी होतात; आणि नांगरामागें चार पायल्यांप्रमाणें सालाचें पावणे दोन खंडी धान्य होतें:

---

( मागील पृष्ठावरून समाप्त. )

आणा व कांहीं एक आणा या दरांनीं गेले. त्यांतले उत्तम चार ऊंस महारांनीं, दोन जागल्यांनीं, व एक नाईकवाडीनें शेव म्हणून नेला. नाईकवाडीला कुणबी फुकट ऊंस देईना, तेव्हां त्यानें त्याच्या मुसकाडींत मारली. त्याच महिन्यांत **ढवळपुरी**च्या मारवाड्यानें ऊंस आणिले व त्यालाही वरीलप्रमाणें चट्टा बसला

म्हणजे ८०० वस्तीच्या गांव—महारांना दरसाल सुमारें ८५० रुपयांचें चौदा खंडी धान्य देण्याला गांव कबूल असतांही महार नाखूष. ह्या रकमेंत सणावाराचीं वाढणीं, ओंवाळणी, दानें, शेतांतलें गवत, सरपण, जनावरांची माती, कातडें वगैरे मिळविलें तर महारांची दोन तें तीन रुपये डोईपट्टी गांवावर बसते, असें भीत भीत म्हणावें लागतें; ह्याखेरीज चोरी चपाटी. दोन वागत्या पाटलांचा असा स्पष्ट अभिप्राय आहे कीं, जितका गांवचा वसूल तितक्या किंमतीचा हराजिनसी माल महार जागले उकळतात. चार आणे रोज देऊन सुद्धां ते शेतमजुरीला कां मिळत नाहींत ह्याचा उलगडा हा अभिप्राय प्रमाण मानला म्हणजे होतो. सन १९०५ सालीं महार—जागल्यांच्या वतनासंबंधानें चौकशी चालू होती तेव्हां ते स्वच्छ म्हणत कीं, आम्हांला माणसीं दहा रुपये दरमहा दिला तरी परवडणार नाहीं. टाकळीभान तालुका नेवासें येथील महारांना पांच वर्षे सास्पिंड केलें; तेव्हां पुनः कामावर रुजूं करून घेण्याच्या खटपटीसाठीं ते गांवकऱ्यांना हजार रुपये देण्याला तयार झाले असें सांगतात. सन १९१२ सालीं पारनेर तालुक्यांतील वडनेर बुद्रुक ह्या गांवीं निजामशाहींतील एक महार आला, आणि त्यानें एकाचे दोन रुपये चवथ्या दिवशीं देण्याचा धंदा सुरू केला. ह्या धंद्यांत सदर गांवच्या महारांनीं ६००—७०० रुपये घातले. असो. गांवच्या कामाच्या मानानें महार जागल्यांच्या संख्येंत नुसती छाटाछाट करून हा कुणब्याचे मागचा ससेमिरा सुटणार नाहीं. महार जागल्यांच्या पोटगींत सरकारनें जी रयतेशीं सांवड किंवा सरकत केली आहे, तीच मुळीं पायाशुद्ध नाहीं. समसमान बलाबल असलें तर खरीखरी पाती. कोणीकडे सर्व शक्तिमान् कसरी सरकार आणि कोणीकडे रानांत गांठलेला गैर—हिशेबी लंगोट्या? सरकारचें काम कसेंही होऊन निघतें. तें महार जागल्यांनीं केलें नाहीं तर पाटील-कुलकर्णी धाकानें अंगमोड किंवा पदरमोड करून त्याचा बोभाटा होऊं देत नाहींत. हें सामर्थ्य रानगड्यानें कोठून आणावें? राक्षस आणि ठेंगू ह्यांच्या संगतीप्रमाणें ही सांवड कुणब्याच्या जिवावरचीच आहे. तेव्हां

महार जागल्यांचे ऐनजिनसी हक्क व बलुतें बंद झालें पाहिजे व त्यांना रोख मुशाहिरा देण्याची तजवीज झाली पाहिजे. त्यांचें वतन इनाम खालसा करून त्यांतून त्यांचा पगार भागत नसल्यास लोकांनीं तत्प्रीत्यर्थ अल्पसा कर देण्याचें कबूल करावें. सबंध महारवाडा, मांगवण, कोळवण, रामोसवाडा, भिलाटी अंधेरांत पोसण्यापेक्षां नियमित संख्येचा उघड्या डोळ्यांनीं व मोकळ्या हातांनीं पगार देणें खात्रीनें फायदेशीर होईल. निमगांव तालुका शेवगांव जि. नगर येथें महारांचा व गांवचा बेबनाव झाल्यावर गांवानें पांच रुपये दरमहावर एक कोळी ठेऊन त्याजकडून गांवकीचें काम घेतलें, तेव्हां काम अति उत्तम होऊन एकंदर गांवची पुष्कळ बचत झाली. ह्या अनुभवाची शीक इतरांनीं घेतल्यास परिणामीं उभयपक्षीं कल्याण होईल.

टांकसाळ झाल्यापासून सोनाराची पोतदारी सुटली. तो आतां बलुत्यांत कुणब्यांचे व आलुत्या-बलुत्यांचे रुप्याचे किरकोळ व ठोसर डाग घडतो. उदाहरणार्थ-टांक, कान टोंचणें, आंगठ्या, कडीं, गोठ इ. कलाकुसरीच्या व श्रमाच्या दागिन्यांबद्दल तो मजुरी घेतो. कांहीं ठिकाणीं पाटीलकुळकर्णी त्याला गाड्या बैल धरणें, लोक बोलावणें वगैरे जागलिकीचीं कामें सांगतात; तेव्हां तो सरकारनें नेमलेल्या जागल्याप्रमाणें बलुतें वसूल करतो. एरवीं सोनाराला महार जागल्यांच्या दहावा हिस्सा बलुतें मिळतें. याखेरीज शेतांत असेल त्या उद्दिमाची जातां येतां वाणगी, सणावाराला वाढणें किंवा शिधा, दिवाळीची ओवाळणी, पोस्त वगैरे सर्व कारूनारूंना मिळतें; हें येथें एकदां सांगून ठेविलें म्हणजे दर कारूनारूच्या हकीकतींत सदरहु मिळकतीचा पुनरुच्चार करण्याचें प्रयोजन नाहीं.

सुतारकामासाठीं कुणब्यांना सुताराला लांकूड पुरवावें लागतें, आणि त्याच्या हाताखालीं गडी द्यावा लागतो. बहुतेक काम तो आपल्या घरीं ' सुतार पिढ्या 'वर किंवा ' नेटा 'वर करतो. मोटेचें वडवान बसविणें वगैरे सारखें काम तो जरूरीप्रमाणें शेतांत जाऊन करतो. मजुरी न घेतां बलुत्यांत खालीं लिहिलेलीं कुणबिकीचीं व कारभावांचीं कामें तो करतो. नांगर, हाळस, मोघड, फराट, वावडी, पाभर, कुळव, कोळपें,

शिवळटी, रुमणें, दांताळें, जूं, वडवान, मोटेचे सुळे, डुबे, मोगरी, फावडी, मेखा, दांडे, खुंटे, मुठी, लोहार व सोनार ह्यांच्या ऐरणीचें खोड, घन व हातोड्यांचे दांडे; चांभाराची फरांडी ( ज्यावर कातडें कापतात तें चापट लांकूड ), कुंभाराच्या चाकाचें तळ, आंवा घडण्याचे फळे; परटाची मोगरी; व सर्व आलुत्याबलुत्यांच्या मेखा, दांडे वगैरे. नवीन नांगर, पाभर, तिफण किंवा गाडा भरणें झाल्यास तो मजुरी घेतो. नांगर दोन तीन व पाभर तिफण पांच सहा वर्षें टिकतात. बाकीच्या आऊतकाठीची डागडुजी नेहमीं करावी लागते. नवीन मोघड करतात त्या सालीं सुताराला चार शेर व एरवीं आच्छेर तें तीन शेर पर्यंत बीं कुणबी देतात, आणि रासमाथ्याला शेंकडा २ प्रमाणें बलुतें देतात. सुतार कामासाठीं कुणबी व इतर लोक जें लांकूड आणतात त्याच्या ढलप्या सुतारच ठेवतो आणि विकतो. जळण महाग झाल्यामुळें त्यांत त्याला चांगला नफा मिळतो.

लोहारकामासाठीं लोहाराला लोखंड व सरपण, कोळसे, गोवऱ्या, हीं पदरचीं पुरवावीं लागतात; आणि त्याच्या हाताखालीं गडी द्यावा लागतो. लोहारकाम बहुतेक त्याच्या भट्टीवर चालतें. तो बलुत्यामध्यें खालीं

---

१ साधारणपणें लांकूड देऊन सुतारकामांची रोख मजुरी पडते ती अशी—

| किंमत | सनंग | किती वर्षें टिकतें. |
|---|---|---|
| रु. १ | नांगर | ३।४ |
| १ | वखर | ५ |
| १ | पाभर | ५ |
| ०८ | कोळपें मोठें | २ |
| ०६ | कोळपें लहान | २ |
| ०४ | आऊताची जूसर | ३ |

बलुतदार सुतार दोन बैलांच्या आऊतामागें दरसाल सुमारें ३०८ रुपयांचें नुसतें धान्य घेतो, याशिवाय वरकड किफायत, असें कुणबी सांगतात.

लिहिलेलीं कामें करतो[1]—नांगराचा फाळ व वसु, कुळवाचें वसु, पाभरीचें फारोळें, कोळप्यांच्या गोल्या, मोटेचें कडें, कण्याच्या आऱ्या, लहान कुऱ्हाड, कुदळ, खुरपें, विळा, उलथणें, विळी, जात्याचे खुंटे, विड्या, इत्यादि; सुताराचें वांकस, किंकरें, सामते; सोनाराची ऐरण, सांडस,

---

१ लोखंड देऊन लोहारकामाची मजुरी साधारणतः खालीं लिहिल्या-प्रमाणें पडते.

| सनंग | किती वर्षें टिकतें | नवीन करण्याची मजुरी | शेवटणावळ |
|---|---|---|---|
| कुसा | ५ | σ८ | σ२ |
| फांस | ३ | σ८ | σ३ |
| मोठें कोळपें | २ | σ४ | σ१σ६ |
| लहान कोळपें | | σ३ | σ१ |
| विळा | | σ३ | σσ६ |
| कुदळ | २।३ | σ८ | σσ६ |
| कुऱ्हाड | २।३ | σ८ | σσ६ |
| फावडें | | σ८ | σσ६ |
| विळे, खुरपें | | σ१ | σσ३ |

मौजे चापडगांव तालुके शेवगांव जि· नगर येथील रा· रा· राणू माळी ह्यांनीं असें सांगितलें कीं, मीं पूर्वीं लोहाराला ५०० गुड देत होतों; अलीकडे तें बंद करून दीड दोन रुपयांत लोहाराकडून सालभर काम घेतों. १०० गुडाला कमींत कमी एक मण धान्य निघतें, यावरून हिशेब करावा.

प्रसिद्ध रणभूमि खर्डें येथील घिसाड्यांनीं माहिती दिली ती अशीः मालकानें लोखंड कोळसे वगैरे दिल्यास—

फाळ σ८ तें σ१२, पास σ४, तिफणीचें फारोळें σ४, कुदळ σ४.

मालकानें लोखंड व कोळसे न दिल्यास उक्तेः फाळ १σ२ तें १σ४, फारोळें σ१०, कोळप्याच्या गोलया σ१०, पोलादीं खुरपें σ२, लोखंडीं खुरपें σσ६, विळी σ६, विळा σ२, उचटणें σ१, पळी σσ६ तें σ१, झारे σ१ तें σ२.

चिमटे, हातोडे नवे करणें व जुन्यांना तोंडें घालणें; चांभाराच्या आऱ्या, राप्या; कुंभाराची कुदळ, खोरें, खुरपें; मुलान्याच्या सुऱ्या; आणि सर्व वस्तींचें वरील प्रकारचें नवें काम, व जुन्याची शेवटणी वगैरे प्रकारची डागडुजी; कुळवाचा फांस, गाडीचा आंख, धांव वगैरेबद्दल तो रोख मजुरी घेतो. दरवर्षीं लोखंडाचा घांस दिला तर फाळ पांच सहा वर्षें टिकतो. कुऱ्हाड, खुरपीं वगैरे वर्ष सहा महिन्यांनीं शेवटावीं लागतात. लोहाराला अच्छेर तें दीडशेर बीं व रासमाथ्याला शेंकडा पावणेदोन प्रमाणें बलुतें कुणबी देतात.

चांभार बलुत्यामध्यें कामें करतो तीं येणें प्रमाणें:—मोट शिवणें, तिला ठिगळ लावणें, गोफणीला टवळें लावणें, जुना जोडा, आसूड सांधणें; सारांश गोठभर वाधी लागेल इतकें कुणब्यांचें व आलुत्याबलुत्यांचें काम करणें. नवीन जोडा, आसूड, मोट वगैरेंबद्दल रोख पैसे पडतात. चांभाराला कुणबी दोन शेर बीं व शेंकडा सवा दोन बलुतें देतात.

कुंभार घागरी, दुधाणें, ताकाचा डेरा, सुगडें, वेळण्या, पंथ्या, चिटकी ( कोरड्यासाची ) वगैरे बलुत्यांत देतो; व रांजण, कोथळी वगैरे मोठ्या जिनसा रोखीनें विकतो. कुणबी कुंभाराला शेर अच्छेर बीं व शेंकडा सवा बलुतें देतात. न्हाव्यांला लहानथोर दर डोकीमागें दोन तें चार पायल्या बलुतें व हजामतीचे दिवशीं एक भाकरी असें मिळतें. ते करगोटा घालणाऱ्याला हिशेबांत धरतात. कुणब्याची हजामत महिन्या–तीनवारां होते, आणि खेड्यांत हजामतीला पाव आणा अर्धा आणा पडतो. ह्या हिशेबानें फार तर आठ दहा आणे होतात. चौल, शेंडी राखणें, वगैरे प्रसंगीं न्हाव्यांना खण, शिधा, ओटी व कांहीं रोकड अशी जास्त किफायत होते. कांहीं ठिकाणीं वरीलप्रमाणें धान्य न देतां उत्पन्नाचें शेंकडा पावणेदोन बलुतें देतात. परीट लग्नकार्य, सोयर, सुतक वगैरे प्रसंगीं गांवकऱ्यांचें धुणें धुतो. तो लग्नांत नवरानवरी ह्यांच्यावर चांदवा धरतो, व पायघड्या घालतो. गांवांत सधन व मराठमोळ्यांच्या घरांचें धुणें परटाकडे असतें, त्याबद्दल त्याला रोज भाकर देतात. परटाला शेर अच्छेर बीं व न्हाव्याच्या तिसरा

त्हिस्सा बलुतें मिळतें. परीट आणि कुंभार ह्यांची कुणब्याला मोठी वर्दळ लागते. 'कुंभारतळें,' 'गाढवलोळी' अशीं जमिनींचीं नांवें गांवोगांव ऐकूं येतात; व त्या जमिनी बहुधा गांवानजिक असतात. पूर्वी ह्या जमिनी कुंभार, परीट यांस इनाम असाव्यात व त्यांत गाढवें सुटत असावींत. आतां त्या सर्व वहित झाल्या आहेत, आणि कुंभार, परीट तर बाराही महिने आपलीं गाढवें मोकळीं सोडतात. तीं गांवकऱ्यांच्या गवताची व पिकांची धुळधाण करतात.

गुरव देवपूजा, देवळाची झाडलोट व दिवा बत्ती करतो; आणि सणावाराच्या दिवशीं कांहीं ठिकाणीं घर पाहून २ तें १० पत्रावळी देतो, सरकारी झाडांशिवाय शिवारांत पान राहिलें नाहीं, म्हणून पत्रावळीला पानें मिळत नाहींत; अशी सबब सांगून बहुतेक ठिकाणीं पत्रावळी देण्याचें त्यांनीं सोडून दिलें आहे. ते कथाकीर्तनाला बोलावणें करतात; व मृदंग वाजवितात, त्याबद्दल त्यांना आरतीची ओंवाळणी मिळते. मृदंग वाजविला नाहीं तरी गांवगुरव आरतीचे पैसे सोडीत नाहींत. रोकड पैसे व कांहीं हक्क घेऊन गुरव वाजंत्रीपणा करतात. देवपरत्वें देवपूजा गुरवाकडून निघून वाघ्या, भुत्या, भराडी, गोंधळी, जोगी, गोसावी, बैरागी, महार, मांग, व फकीर ह्यांच्याकडे गेली. ज्या मानानें ज्या देवाचा नवसाला पावण्याचा लौकिक त्या मानानें त्याच्या पुजाऱ्याला कुणब्यांकडून पेंढी काडी मिळते. कोठें महादेवाच्या गुरवाला किंवा जंगमाला जास्त तर कोठें खंडोबाच्या वाघ्याला जास्त; कोठें बहिरोबाच्या किंवा देवीच्या भगताला जास्त तर कोठें गोसाव्या बैराग्याला, मानभावाला किंवा तक्यांतल्या फकीराला जास्त; ह्याप्रमाणें गांवोगांव वैचित्र्य दिसून येतें. गुरव व त्यासारखे इतर ग्रामदेवतांचे पुजारी ह्यांना कुणब्यांकडून उत्पन्नाच्या शेंकडा एकच्या आंतबाहेर पेंढी मिळते. खेरीज नैवेद्य, देवापुढील हमेषचें उत्पन्न, यात्रांचें उत्पन्न, व नवस इत्यादि किफायत होते. पंचांग सांगणें, लग्न लावणें, अंत्यविधि चालविणें, श्राद्ध, पक्ष, देवदेव, वगैरे विधि, संस्कार व तिथि-पर्वणी इत्यादि प्रसंगीं ग्रामजोशी उपाध्येपणा

करतो. कांहीं ठिकाणीं त्याच्याकडे ग्रामदेवतेची पूजा-अर्चा असते. ज्योतिषाचे प्रश्न पाहणें, गांवकऱ्यांचीं पत्रें लिहिणें, ब्राह्मणेतरांना ब्राह्मण घालणें झाल्यास स्वैंपाक करणें वगैरे कामेंही तो करतो. ग्रामजोशी बहुधा ब्राह्मण असतो. कांहीं जाती ब्राह्मणाला लग्नादि संस्काराला बोलवीत नाहींत. वड्डर, कैकाडी, कोल्हाटी, कुंचेवाले वगैरे जातींत लग्नें जातपंच लावतात. जिल्हा नगर तालुका आकोलें येथील ब्राह्मणवाडे नांवाच्या गांवांत माहारांचीं लग्नें महार-भाट लावतात. ग्रामजोशाला कुणब्यांकडून सरासरीं उत्पन्नाच्या शेंकडा एकच्या आंत बाहेर पेंढी मिळते; शिवाय पंचांगाचें धान्य, व नैमित्तिकाचा शिधा, दक्षिणा मिळते. त्याच्याकडे कुलकर्ण नसलें तर पेंढी वगैरे कमी मिळते. मुलान्याचें काम बकरें लावणें हें होय. त्यानें फात्या न दिला तर तें मुरदाड राहतें, म्हणजे तें हलाल (शुद्ध)होत नाहीं; व ह्या कामासाठीं तो अच्छेर मांसाची शेरणी व दोन बैलांचे नांगरामागें तीन पायल्या धान्य घेतो. दर मांसाहारी घरीं वर्षांतून फार तर तीन चार वेळां बकरें पडण्याचा प्रसंग येतो. मुलान्याला खळ्यावर सुमारें शेंकडा एक तें पावणे दोन बलुतें मिळतें. बकरें मारण्याबद्दल उपऱ्याकडून तो एक आणा घेतो. गांवांत फकीर नसला तर गांवचा ताबूत मुलाना करतो. कोळी पखालीनें पाणी भरतात, व भांडीं घांसतात. मराठमोळ्याच्या घरीं हीं कामें ते दररोज करतात, व त्यांबद्दल त्यांना भाकरी मिळते. शिवाय त्यांना शेंकडा एकच्या आंत बलुतें मिळतें.

गोंधळी, भराडी, मुरळ्या, वाघे हे लग्न-कार्यांत गोंधळ किंवा जागरण घालतात, व देवाच्या उत्सवांत आपापलीं कामें करतात. कलावंतीण उत्सवांत, यात्रांत नृत्य-गायन करते. भाट, ठाकूर, लग्नांत बाण्या म्हणतात. गुजराती मारवाडी भाट मुऱ्हाळकी करतात व ऐवज पोंचवितात. तांबोळी सणावाराला पांच दहा पानांचा विडा घरोघर देतो. हाळकरी हाळ भरतो. वऱ्हाडांत गारपगार पाऊस सांगतात. मद्रासेकडे पाट साफ ठेवणारे आलुत्ये आहेत. भोई, डोलीवाले, शिंपी, तेली, माळी, कासार, बुरूड, जिनगर, शिकलकर, बेलदार, गवंडी, पिंजारी, नावाडी,

हलालखोर आपापलीं जातकामें करतात. वाघे, मुरळ्या, गोंधळी, जोगतिणी, भगत, पोतराज, मानभाव, फकीर वगैरेंच्या अंगांत वारें येतें. लिंगायतांचे धर्मसंस्कार जंगम करतात. मुसलमानांचे धर्मसंस्कार काजी, मुजावर, मुलाना, फकीर वगैरे करतात. फकीर मुजावर मशिदींत, दर्ग्यांत दिवाबत्ती व झाडलोट करतात. पुष्कळ हिंदू पिरांना व ताबुतांना भजत असल्यामुळें महंमदी उपाध्यायाची गरज लागते. ह्या व इतर नारूंना त्यांच्या स्थानिक महत्त्वाप्रमाणें कमी जास्त उत्पन्न मिळतें, तें सरासरीं शेंकडा. ·२५ तें ·८ असतें.

वरील यादींपैकीं सर्व कारूनारू सर्व गांवांत आहेत, आणि ते नसल्यानें गांवचें कांहीं काम खुंटून राहिलें आहे असें नाहीं. तथापि ते जेथें आहेत त्या गांवांत व त्याच्या आसपास पुरातन[1] धाऱ्याप्रमाणें ते आपले हक्क

---

१ कारू-नारूंचा रट्टा कसा चालतो हें गुऱ्हाळ घरच्या खर्चावरून लक्षांत येईल. भट, न्हावी, सुतार, चांभार, लोहार, महार, मांग हे पांच ऊंस, पांच पेरीं, शेरभर गूळ, आणि दर तीन दिवसांनीं घागरभर रस नेतात. शिवाय देवाला पांच शेर गूळ आणि जो गांवचा परगांवचा व कोणत्याही जातीचा इसम येईल त्याला पोटभर रस, कढईंतील गूळ, काकवी व ऊंस असें द्यावें लागतें, असें एका कुणब्यानें सांगितलें. पिंपळगांव पिसा तालुके श्रीगोंदें येथील रा·रा. कृष्णाजी व श्रीपतराव पाटील यांनीं माहिती सांगितली तीः—सुतारानें चरक, लोहारानें दोन विळे, चांभारानें आठ वाध्या व चरक हांकण्याचें थोपटणें, व कुंभारानें मडकीं करून द्यावींत; आणि महारानें चुलवण्यासाठीं सरपणाचे भारे आणावेत. सुतारास व कुंभारास पहिल्या दिवशीं २५ ऊंस, पुढें दररोज पांच ऊंस, आणि दर आठवड्यास एक ढेप व शेरणीबद्दल २ शेर गूळ द्यावा लागतो. चांभाराला दररोज २॥ ऊंस, आठ दिवसाला शेरणी २ शेर गूळ, व पंधरा दिवसांला एक ढेप द्यावी लागते. लोहारास आठवड्याची शेरणी व शेवटीं एक ढेप द्यावी लागते. महाराला दोन ढेपा व शेवटचें आधण; गुरवाला दररोज अच्छेर गूळ; आणि ब्राह्मण, रामोशी, मांग वगैरेंना आठ दिवसांनीं शेरणी द्यावी लागते. आधणावरील मळई कोठें महार तर कोठें मांग घेतात. ह्याखेरीज गुऱ्हाळ घरीं जो येईल त्याला ऊंस, रस, गूळ, काकवी द्यावी लागते. कोणालाही विन्मुख लावतां कामा नये, कारण कोणी नाखूष झाला तर अदावतीनें अचाट नुकसान होण्याची भीति असते.

उकळतात. गांवांत जे सर्व प्रकारचे भिक्षेकरी असतात, त्यांनाही नित्य नियमानें कोणाला पीठ, कोणाला भाकर वगैरे भिक्षा वाढून गांवकरी पोसतात. गांव जसा सुखी असेल, किंवा जसा ज्यांचा धागा पोंचेल तशी भिक्षेकऱ्यांची वस्ती वाढते. त्यांच्या प्रकारांचा विचार विस्तारानें येथें न करतां **फिरस्त्यांच्या** प्रकरणांत करूं, कारण स्थाईक व फिरत्या भिक्षेकऱ्यांचे पोट भरण्याचे मार्ग बहुतेक सारखेच असतात.

# फिरस्ते.

बहुशः सुगीच्या संधानांत व तुरळक इतर दिवसांत गांवगन्ना जे बिछायती ( बिछायत घरांत नसते, ती ओटीवर असतेः म्हणून बिछायती म्हणजे बाहेरून–पर ठिकाणाहून आलेला ) येतात त्यांत कांहीं वतनदार व कांहीं उपलाणी असतात. येथें वतनदार याचा अर्थ इतकाच कीं, हे फिरस्ते नियमित काळीं नियमित रहाळांतील गांवीं येतात, व तेथें आपला माल विकून, काम करून, अगर भिक्षा मागून कमाई करतात. अशा प्रकारें उघाडीच्या दिवसांत हे अनेक गांवें घेतात, आणि पावसाळा ते स्थाईक झाले असतील त्या गांवीं किंवा आपले रहाळांत कोठें तरी काढतात. जे फिरस्ते नेमलेल्या गांवीं वहिवाटीप्रमाणें न येतां वाटेल तेथें भटकतात, त्यांना आपण उपलाणी म्हणूं. घिसाडी ऊर्फ पांचाळ, बेलदार, वड्डर, कैकाडी, वंजारी, लमाण, नेमाडांतील मेवाती, वैदू, गोंड, मांग-गारोडी, गोपाळ, कोल्हाटी, हरदास, दरवेशी, बंदरवाले (मुसलमान), गारोडी, माकडवाले ऊर्फ कुंचेवाले, कंजारी, नंदीबैलवाले ऊर्फ तिरमल, चित्रकथी, फांसपारधी, बहुरूपी, रायनंद, भोप्ये, भगत, भुत्ये, आराधी, वाघे, मुरळ्या, जोगती, हिजडे, जोगतिणी, कातकाडीणी ( हाडकांच्या माळा घालणाऱ्या नवलाया ), भराडी, वासुदेव, पांगूळ, गुरुबाळसंतोष, राऊळ, मेढिंगे ऊर्फ ठोके जोशी, कुडमुडे जोशी, सुप हलव्या, पोतराज, कानफाटे, उदासी, अघोरी, खरे खोटे आंधळे पांगळे रक्तपित्ये वगैरे विकल लोक, नाथपंथी, वारकरी, कबीरपंथी, संन्याशी, तीर्थयात्रा करणारे नाना संप्रदायांचे गोसावी, बैरागी, जती, साधु, जातिजातींचे गुरु व मागते, मानभाव, नानकशाही, फकीर, शिद्दी, इराणी, बलुची, अफगाणी इत्यादि अनेक प्रकारचे उदरनिमित्त बहुकृत वेष लोक खळीं मागण्याला व इतर वेळीं खेड्यांवर फेऱ्या घालीत असतात. ह्यांची दिनचर्या वरवर पाहिली तर असा भास होतो कीं, त्यांपैकीं कित्येकांना कांहीं तरी कला–

कुसरीचा अगर मनोरंजनाचा दर्शनी धंदा असतो, व कांहीं निवळ भिक्षार्थी असतात. परंतु बाहेरचा बुरखा जरा ओढला तर अशी खात्री होईल कीं, बहुतेकांची मदार भिक्षेवर आणि भिक्षेच्या आडून फसवेगिरी, दगलबाजी, चोरीचपाटी, ह्यांवर व कांहींची व्यभिचारावर देखील असते. वतनदार व उपलाणी फिरस्ते नुसती भीक म्हणून शेंकडा दोन तें चार शेत-माल हडसून खडसून नेतात. चोरीचपाटी ह्याखेरीज. फिरस्त्यांमधील वरिष्ठ जातींचे भिक्षुक व साधु हिंदु असल्यास मठांत किंवा देवळांत व मुसलमान असल्यास मशिदींत, दरग्यांत उतरतात; आणि दोन्ही धर्मांचे लोक सरास चावडी धर्मशाळांत उतरतात. गुन्हेगार जाती साधु किंवा फकिराच्या वेषानें गुन्हे करण्यास बाहेर पडतात, तेव्हां त्या ओसाड देवळांत, मठांत, मशिदींत अगर तक्यांत, उतरतात; कांकीं त्यांचीं कृष्ण-कारस्थानें कोणाच्या नजरेस येऊं नयेत. बाकीच्या भटकणाऱ्या जाती आपापलीं जाति-विशिष्ट पालें देतात. पालावरून जात ओळखतां येते. बहुतेक आपापलीं पालें गांवाच्या आंत बाहेर शेत दोन शेत दूर ठोकतात, व जमल्यास मुख्य गांवाजवळ न उतरतां गांवाच्या एखाद्या वाडीजवळ पालें लावतात. फांस-पारध्यांना दिवा पाहण्याची अनेगा आहे म्हणून त्यांचीं पालें लोकवस्तीपासून फार दूर असतात, व त्यांत दिवा म्हणून कधीं दिसावयाचा नाहीं. पिकाची, धान्याची, जनावराची चोरी पचेल अशी चोरट्या जातींच्या पालांची ठेवण असते.

**घिसाड्यांचीं** दोन तें दहा बिऱ्हाडें मुक्कामाला येतात. तीं बहुधा गांवाजवळ बारदानाच्या पालांतून उतरतात. दर बिऱ्हाडाला दोन तें दहा गाढवें आणि एक दोन बिऱ्हाडें मिळून एखादी म्हैस असते. त्यांच्या जवळ तट्टें, बकरीं, कोंबड्या, व मोठाले कुत्रे असतात. नांगराचा फाळ, कुऱ्हाडी, कुदळी, वसु, खुरपीं, ऐरण, आंख, धांवा, सुळे, पळ्या, विळे, नाचकंडे, शिवळांचा खुळखुळा, सुकत्या, वडारी-फावडे वगैरे लोखंड-काम हे करतात. त्यांच्या बायका त्यांना लोहारकाम करूं लागतात, व पळे, विळे, नाचकंडे वगैरे जिनसा बाजारांत व घरोघर विकावयास नेतात.

**बेलदार** दहापांच बिऱ्हाडें मिळून धर्मशाळेंत किंवा पोत्यांच्या पालांनीं गांवाजवळ उतरतात. दर बिऱ्हाडाला पांच तें पंधरा शेळ्या, कोंबड्या, गाढवें, कुत्रीं, असतात. ते विहिरी, घरें, पार, वगैरेचें दगडकाम करतात व जातीं, उखळें, पाटे, वरवंटे, चौरंग वगैरे विकतात. बायका व पुरुष जात्यांना टांकी लावतात. घिसाडी, बेलदार भीक मागत नाहींत. **वड्डर**— पांच पंधरा बिऱ्हाडें एक मेळानें गवती पालांत गांवानजीक उतरतात. दर बिऱ्हाडाला दोन तें चार गाढवें, शिवाय शेळ्या, बोकड, कोंबडीं, कुत्रीं असतात. एका गांवीं गणती केली तीं—पालें १४, लहान मोठीं माणसें ६०, गाढवें ३०, शेळ्या बोकड १५, शिवाय कुत्रीं. वड्डर बांधणी घालणें, विहिरी खणणें, मात-काम वगैरे मक्त्यानें करतात; जातीं, उखळ, पाटे, वरवंटे वगैरे विकतात, व त्यांना टांकी देतात. माल विकणें व टांकी देणें हीं कामें बहुधा बायका करतात. ह्यांच्या बायका, पोरें गांवांत भाकरी, व शेतांत धान्य मागतात. एंजिनियरकडील मक्तेदार वड्डारांचीं बायका-पोरें सुद्धां गांवांत भीक मागतांना दृष्टीस पडतात. उभें पीक व मेंढरें चोरणें, पेंव फोडणें, घरफोडी वगैरे गुन्हे वड्डरांच्या कांहीं जाती करतात. ह्यांचीं डुकरें गांवोगांव पिकांचा धुव्वा उडवितात. **कैकाडी** गांवाबाहेर उघड्या पटांगणांत झाडाच्या सावलीला उतरतात. त्यांचीं चार पांच किंवा अधिक बिऱ्हाडें असतात. दर बिऱ्हाडाला दोन तीन गाढवें आणि शेळया, कोंबड्या, कुत्रीं असतात. ते पिटकुल, करंजी, तरवड, वगैरेंचे फोंक काढून त्यांच्या पाट्या, कणगी, कोंबड्यांचे डाले किंवा झांप करतात, आणि विकतात. ही जात भीक मागणारी व चोरटी आहे. भीक मागतांना ते घराचीं कुलपें काढून चोरी करतात. ज्या घरांत थोडीं माणसें असतील त्याच्या मागच्या दारीं कांहीं कैकाडणी बसतात, व कांहीं जणी पुढच्या दारीं भांडून एकमेकांना रक्त निघेपर्यंत मारतात. घरांतील माणसें तंटा तोडण्याला दाराबाहेर गेलीं म्हणजे मागच्या दारीं बसलेल्या कैकाडणी आंत शिरून हातीं लागेल तें घेऊन पसार होतात. पिकें, धान्य, शेळ्या, मेंढ्या, कोंबड्या चोरण्यांत त्यांचा हातखंडा

आहे. कुंचेवाले ऊर्फ माकडवाले ही कैकाड्यांची पोटजात आहे. ते गांवाबाहेर सुरड नांवाच्या गवताच्या पालांत उतरतात. त्यांचीं दहा बारा बिऱ्हाडें एकमेळानें असतात, व त्यांबरोबर माकडें, गाढवें, बकरीं, कोंबड्या, कुत्रीं असतात. ते माकडांचा खेळ करतात व साळी, कोष्टी, धनगर, मोमीन वगैरेंच्या कुंच्या बांधतात. ह्या कुंच्या ते गवताच्या मुळ्यांच्या करतात; व त्या सव्वा तें दीड रुपयाला विकतात. त्यांच्या बायका बायकांना गोंधतात, शिंदीचे खुळखुळे विकतात, व सुपें, टोपलीं फोकाट्यांनीं सांधितात. बायका, पुरुष, पोरें गांवांत तुकडे व शेतांत धान्य मागतात. एका गांवीं कुंचीवाल्यांचीं ४ पालें उतरलीं होतीं; त्यांत माणसें २३, गाढवें २२, कुत्रीं ५, माकडें ५, बोकड २, व एक कोंबड्याचा झांप होता. **कंजारी** ही सांनसी नांवाच्या दरोडखोर जातीची एक पोटजात आहे, व ती गांवाबाहेर पालांतून उतरते. ते साळी वगैरेंच्या कुंच्या बांधतात; शिंकीं, हातळ्या, जोतीं–जुंपण्या, पिछाड्या, मोऱ्हक्या वगैरे करतात; आणि कानांतला मळ काढतात. त्यांच्या बायका टाळ्या पिटून अचकटविचकट हावभाव करून उखाणे म्हणतात, आणि ऐकणाराला अगदीं शरमून टाकून भीक उकळतात. **लमाण, वंजारी** हे पूर्वीं बैलांचे तांडे घेऊन मीठ व सरपण ह्यांची ने-आण करीत. आतांही कांहींजण बैलांचें भाडें करतात, व जनावरें राखोळीला घेतात. त्यांच्याजवळ कुत्रे फार नामांकित असतात. ते गांवाजवळ मैदानांत उतरतात आणि त्यांच्या तांड्यांत १०० – २०० बैल व ५० – ६० माणसें असतात. ते बैल, शेळ्या, मेंढ्या व उभीं पिकें ह्यांची चोरी करतात. **वैदू** गांवापासून एक दोन शेतें दूर उतरतात. त्यांचीं दहा बारा बिऱ्हाडें जमावानें फिरत असतात. त्यांच्याजवळ गाढवें, शेळ्या, कोंबड्या, व पुष्कळ शिकारीं कुत्रीं असतात. ते ससे, तरस, घोरपडी, सर्प, मगर धरतात. कोणाच्या घरीं साप निघाला तर शेरभर दाणे घेऊन ते तो धरतात. त्या वेळीं ते पुंगी वाजवीत असतात. तापीकांठीं मगरांना त्यांचा इतका दरारा आहे कीं, वैदूचा शब्द कानीं पडतांच वाळवंटांत असलेले मगर

तडक पाण्यांत पळून जातात. पुरुष व बायका वनस्पतीचीं औषधें, भस्में, रांगोळी, सुया, दाभण विकतात. पुरुष शस्त्रक्रिया करतात, व तुंबड्या लावतात. पुरुष, बायका, पोरें, गांवांमध्यें भाकरी व कपडे आणि शेतांत धान्य मागतात. सर्व भटकणाऱ्या जातींत ही जात फार साळसूद आहे, व हिच्या बायकांची पातिव्रत्याबद्दल फार ख्याति आहे. वर्षा दोन वर्षांनीं पन्नास तें शंभर गोंड लोक वनस्पतींचीं औषधें, नकली सालमसिश्री, सफेत मुसळी, वगैरे विकावयास एकमेळानें येतात. त्यांच्याजवळ ३०।४० म्हशी, १०।१२ तट्टें राहतात. ते गांवाजवळ पालें देतात आणि माणसा-जनावरांच्या पोटासाठीं शिवार उकळतात. **भराडी, गोंधळी, मुरळ्या, वाघे,** ह्यांचीं दहापांच बिऱ्हाडें, पोत्याच्या पालांत गांवाबाहेर उतरतात. त्यांच्याजवळ तट्टें, गाई, बैल, म्हशी, टोणगे, कोंबड्या, बकरीं असतात; व हीं जनावरें ते विकतात. खंडोबा, बहिरोबा, देवी वगैरे देवांचीं गाणीं, पोवाडे व लावण्या ते गातात, त्यावेळीं मंडळी जमून त्यांना पैसा दोन पैसे देते. ह्यांपैकीं कांहीं बैठकीचें गाणें, व तमाशा करतात. हे गांवांत व शिवारांत भीक मागतात. भराड्यांच्या बायका गोदड्या शिवतात व गोंधतात. **भुत्ये** नवरात्राच्या सुमारास येऊन घरोघर तेल, पैसे व कपडे मागतात. त्यांला बहुधा दर घरीं एक पैसा मिळतो. **आराधी** वर्षभर भीक मागत फिरतात. **जोगतिणी** देवीच्या नांवानें भीक मागतात. हिंदू हिजड्यांना **जोगती** म्हणतात. ते फार करून कुंभाराच्या घरीं उतरतात. ते टाळ्या पिटून अभद्र बोलतात, बायकी चाळे करतात, आणि देवीच्या नांवावर परडी फिरवून भीक मागतात. ते बहुधा दर घरीं एक आणा घेतात. मुसलमान हिजड्यांच्या गुरूला ‘ **मुंढ्या** ’ म्हणतात. तो मुसलमान असतो. अलमगीरचा जनाना हिजड्यांनीं राखला, म्हणून त्यानें हिजड्यांना व मुंढ्यांना वतन करून दिलें, असें हे लोक सांगतात. हिंदू–मुसलमान हिजडे आपली कमाई मुंढ्याला देतात. **पोतराज** महार किंवा मांग असतो. तो शेंदूर फांसून लहंगा नेसून मरे आईचा देव्हारा घेऊन घरोघर फिरतो, स्वतःचे अंगावर शेंदराचा गोटा लावलेल्या आसुडानें कडाके

ओढतो, आणि सूप अर्धसूप धान्य, पैसे व कपडे गोळा करतो. **तिरमल** ऊर्फ **नंदीबैलवाले**, **मेढिंगे** ऊर्फ **ठोकेजोशी**, **कुडमुडेजोशी**, **वासुदेव**, **पांगूळ**, हे गांवाबाहेर गोदड्याच्या किंवा पोत्याच्या पालांत उतरतात. त्यांचीं दहापांच बिऱ्हाडें मेळानें फिरतात. त्यांजवळ म्हशी, बैल, बकरें, तट्टें, कुत्रीं, असतात. तिरमल नंदीबैल शिकवून त्याच्याकडून होरा वदवितात. त्यावेळीं ते गुबगुबी व घड्याळ वाजवितात. ते धान्य, वस्त्र, पैसे मागतात. त्यांस दर घरचा १ पैसा मिळतो. त्यांच्या बायका गोदड्या शिवतात व पोत, सुई, दाभण विकतात. एका गांवीं तिरमलांचा तळ येणेंप्रमाणें होता: माणसें ३०, नंदीबैल एक, तट्टें ७, टोणगे २, म्हशी ४, बैल १०, शेळया ५, कुत्रीं ८, शिवाय कोंबड्या. मेढिंगे ऊर्फ ठोकेजोशी सकाळीं भस्म, गंध लावून डोक्यावर पागोट्याची ढाल ठेवून लफ्फेदार रेशीमकांठी धोतर नेसतात, आणि हातांत पंचांग घेऊन कुणब्यांना शुभाशुभ ग्रह, होरा ठोका सांगण्याला शेतोशेतीं जातात. त्यांच्या बायका सुई, पोत वगैरे विकतात. ते गायी, म्हशी, तट्टें, विकून हजारों रुपयांचा व्यापार करून राहिले आहेत. कुडमुडेजोशी, गुरुबाळसंतोष, वासुदेव, पांगूळ रामप्रहरीं पाऊड गाऊन आयाबायांना व लेकरांना आशिर्वाद देतात. त्यांच्या पाऊडांत यात्रांच्या ठिकाणच्या देवांचीं नांवें व क्वचित् वडिलांचीं नांवें असतात. त्यांच्या बायका ‘ वाकळ ’ ( गोदडी ) शिवतात, व घोंगड्या तुणतात. कुडमुडेजोशी कुडमुडें वाजवितो. वासुदेव टाळ, चिपळ्या, व पावा वाजवितो, आणि त्याच्या डोक्याला मोरपिसांची टोपी असते; त्याला दर घरीं पैसा दोन पैसे मिळतात. **राऊळ** कोठें कोष्ट्यांच्या फण्या भरतात, पण बहुधा पहाटेस भला मोठा त्रिशूळ घेऊन एखादा दोहरा म्हणत भीक मागतात. **दरवेशी** मुसलमान असतात, ते वाघ आस्वलाचे खेळ करून सुगीच्या दिवसांत खळीं मागतात. त्यांना बागवाले ( वाघवाले ) असेंही म्हणतात. **मदारी** गारोडी मुसलमान असतात व ते सापाचा आणि नजरबंदीचा खेळ करतात. मुसलमान **बंदरवाले**, वानर, माकडें, व बोकड ह्यांचे खेळ करतात. **गोपाळ**,

**डोंबारी**, कसरतीचा खेळ करतात. त्यांच्याजवळ म्हशी असतात आणि ते त्यांचें दूधतूप विकतात. गांवकऱ्यांच्या म्हशी राखोळीला घेऊन ते अखेर गुंगारा देतात. **कोल्हाटी** कसरतीचा खेळ, नाचतमाशा करतात. त्यांच्या नायकिणी कसब करतात.कोल्हाट्याचीं पालें गांवांवर आलीं म्हणजे उपदंशाचा प्रसार होतो. आपणाजवळ उपदंशाचीं व पुष्टतेचीं रामबाण औषधें आहेत, अशी बढाई कोल्हाटिणी मारतात, व लौकिक समजूतही अशीच आहे. खानदेशांत कोल्हाट्याप्रमाणें ' उघडच्या मांडीचें ' ( राजरोष ) कसब करणारी **हरदास** नांवाची जात आहे. **राथनंद, बहुरूपी, भवय्ये** ( गुजराती ) हे नानाप्रकारचीं सोंगें आणून पैसे, धान्य व वस्त्रें मिळवितात. ह्यांचा बेडा मोठासा नसतो. **चित्रकथी** मोठ्या जमावानें फिरतात. एका गांवीं त्यांचीं ३० पालें उतरलीं; त्यांत माणसें १२७, घोडीं ५, म्हशी ७०, व १७ शेळ्या होत्या. हे म्हशीची हेड करतात, व दूधतूप विकतात. जातीचा एखादा इसम सिता, बभ्रुवाहन वगैरेंचीं चित्रें काढतो व चित्रपट लोकांना दाखवितो; आणि बायका काशाच्या थाळ्यावर मेण व काडी लावून परोपरीचीं गाणीं म्हणतात. तरुण स्त्रिया शेतकऱ्याची थट्टामस्करी करतात, व कसबही करतात; त्यांना ' **मैना** ' म्हणतात. पुरुष व स्त्रिया गांवांत भाकरी, वस्त्र व शेतांत धान्य, पेंढी मागतात. पिकाची चोरी करण्यांत ही जात अट्टल आहे. **मांगगारोड्यांची** टोळी सर्वांत दांडगी असते. एके गांवीं त्यांचा परिवार येणेंप्रमाणें आढळून आलाः- माणसें ११९, म्हशी २०, हेले ४, गाय१, बैल २, घोडे २, बकरीं ६, शिवाय कोंबड्या, कुत्रीं. हे गांवाबाहेर पालांत उतरतात, म्हशी विकतात व भादरतात, नजरबंदीचा गांवगुंडी खेळ ढोल वाजवून करतात, आणि भीकही मागतात. हे जबरदस्त चोर व कांगावखोर असतात; धान्य, कापूस, शेळ्या, मेंढ्या, म्हशी, कोंबड्या, चोरतात; आणि उभ्या पिकांत आपलीं जनावरें चारतात. हे थोडासा विसार देऊन भाकड म्हशी फळविण्याचा बहाणा करून घेतात, व त्यांना दूरच्या बाजारांत विकून पैसे गट्ट करतात. गांवकरी ह्यांच्या

तांड्यांत जाण्याला धजत नाहींत. त्यांत कोणी गेलें तर पुरुष वर्दळीला येतात, व बायका एकच गिल्ला करून सोडतात, आणि वेळेला सपशेल नागव्या होतात. कधीं कधीं त्या स्वतःला किंवा पोराला आपल्या हातानें दुखापत करून घेतात, अगर पोराची तंगडी धरून त्याला गरगर फिरवितात व आपटूं लागतात. **फांसपारध्यांचा** जथा फार जंगी असतो. त्यांच्या तळावर कधीं कधीं माणसें १०० पर्यंत असतात; शिवाय गाई, म्हशी, कोंबड्या, कुत्रीं. ते भीक मागतात, बजरबट्टू व जंगलच्या वनस्पतींचीं औषधें विकतात, पांखरें धरतात, आणि हरीण, डुक्कर, ससे, ह्यांची शिकार करतात. त्यांच्या बायका जात्याला टांकी लावतात. ते आपलीं गुरें उभ्या पिकांत चारतात, व पेवांतील धान्य, गुरें, शेळ्या, मेंढ्या, व उभें पीक ह्यांची चोरी करतात, आणि जमिनीमध्यें लहान भेग असेल ती खोदून तळाशीं मोठी खांच करून तिच्यामध्यें चोरीचें धान्य घालून तोंड बंद करतात. खानदेशांत सातपुड्यांतील जंगलांत प्रतिवर्षी नेमाडाकडील **मेवाती** नांवाचे मुसलमान लोक हजारों गाईम्हशी व घोडे चारण्यास आणतात. ते जंगलाची फी भरतात, परंतु आसपासच्या गांवांच्या शेतांना त्यांचा अतिशय उपसर्ग लागतो. शेतांत राखणदार असला तरी पाण्यावर जातांना किंवा या गांवाहून त्या गांवाला मुक्काम हालवितांना ते आपल्या गुरांना शेतांत घुसण्याची इशारत देतात. मग राखण नसल्यावर रात्रीं बेरात्रीं ते आपलीं जनावरें शेतांत घालतात हें सांगणें नकोच. त्यांचीं जनावरें इतकीं तरबेज झालेलीं असतात कीं, त्यांना परकी माणसांचा वास येतांच तीं चौखार निघतात, आणि कांहीं केल्या हातीं लागत नाहींत. पहाडांत वाघाची भीति असते, म्हणून शेतांत रात्रीं राखण बहुधा नसते. त्यामुळें ह्या हेड्यांचें आयतेंच बनतें. चार सहा वर्षांनीं बायकापोरें मिळून शेंपन्नास **इराणी** किंवा **बलुची, पठाण** लोकांची टोळधाड रेलवेजवळच्या खेड्यांनीं आणि क्वचित् आडरस्त्याच्या खेड्यांनींही बोकळते. घोडे, चाकू, कात्री, सुऱ्या, कपडा, जुने बूट, सोन्यारुप्यांची नाणीं, जवाहीर वगैरे विकण्याच्या मिषानें ते फिरतात.

हिंदुस्थानावरील मुसलमानांच्या स्वाऱ्यांमुळें त्यांचा असा दरारा बसला आहे कीं, ' घरच्या भिणें घेतलें रान वाटेंत भेटला मुसलमान. ' ही म्हण महाराष्ट्रांत बायकापोरांच्या तोंडात भिजत आहे. हे लोक लालबुंद, उंचे पुरे, भलेभक्कम आणि कजाग असतात; त्यामुळें ते जातात त्या गांवांत दिवसाढवळ्या जबरदस्तीनें शिधा, चारा, लुटतात, व बिगारीच्या गाड्या काढतात. त्यांच्या टोळीबरोबर पोलीस असतें. पण त्याची तारांबळ उडून आला पेंड कसा तरी पुढें वाटेला लावण्याविषयीं कासाविशी चालते.

चालूं वहिवाटीप्रमाणें भटकणाऱ्या लोकांना दर गांवीं तीन दिवस राहतां येतें. गांवच्या पाटलाची किंवा एखाद्या भरदार कुणब्याची अगर स्थानिक गोसाव्या फकिराची ओळख असते, अशा गांवीं ते तळ टाकतात, व तेथून आसपासचीं गांवें घेतात. मुक्कामाच्या गांवाला ते फारसा धक्का लावीत नाहींत, आणि गांव खूष राहील असा प्रयत्न करतात. त्याच गांवीं तेंच भिकार फिरून फिरून उतरूं लागलें म्हणजे असें समजावें कीं गांवापासून तों नजीकचे पोलीसठाण्यापर्यंत त्यांनीं वळण बांधिलें. भिकार उतरलें म्हणजे बिऱ्हाडें म्हाताऱ्याकोताऱ्यांच्या व जनावरें पोरासोरांच्या दिमतीला लावतात. जरूर तितक्या बायका सरपण व चारा गोळा करण्याला शेताशेतांनीं हिंडतात, आणि उमेदवार पुरुष व बायका काळी-पांढरी मागण्याला निघतात. मुलें गायरानांनीं किंवा राखण कमी अशा शेतांच्या कडांनीं किंवा बांधांनीं जनावरें लावतात, आणि आपण रमत बसतात, अगर शेताचा लांगालुंगा गोळा करण्याला जातात. त्यांच्या दुर्लक्ष्यामुळें गुरें शेतांत घुसतात. आणि कधीं कधीं तर तीं स्वतःच त्यांना शेतांत घालतात, गुरेंही ओढाळ व खायखाय करीत असावयाचीं, त्यांनी शेतांत घुसावयाचें, शेतकऱ्यानें हैक हैक करावयाचें, आणि त्यांनीं तसाच चरण्याचा रट्टा लावावयाचा किंवा मुसंडी देऊन निघावयाचें, हा त्यांचा रोजचा परिपाठ. फिरस्त्यांचीं गुरें बहुधा हातीं लागत नाहींत. यदाकदाचित् जर तीं धरलीं

तर राखणदाराला शेत मोकळें टाकून गांवांत कोंडवाड्यापर्यंत यावें लागतें. पाटील भेटला आणि गुरें ताब्यांत घेण्याला महार चावडीवर असला तर बरें, आणि जर कां दोघांपैकी एकाची गांठ पडली नाहीं तर तिष्ठत बसावें लागतें. इतकी फुरसत शेतकऱ्यांला कोठून असणार ? आणि असली तरी नंगेसे खुद्दा बेजार. भिकाऱ्यांशीं अदावत करून घरादाराचा उन्हाळा होण्याची भोति असते. शिवाय भिकार जाती पोरांपासून तों म्हाताऱ्यांपर्यंत लोंचट, आर्जवी, किंवा तंबी देणाऱ्या असतात. मुळीं गुरांमागचीं पोरेंच दादा बाबा करून जनावरें सोडून न्यावयाचीं. त्यांची डाळ शिजली नाहीं तर तळावरील बायका, पुरुष, कुणब्याभोंवतीं घों घों जमतात व हातापायां पडतात. त्यांच्याही पुढें कुणब्यानें आपला हेका सोडला नाहीं, तर ते गांवच्या शिष्टांकडे जातात, आणि उलट ते कुणब्यालाच हलकट ठरवून त्याला जनावरें सोडून देण्याची गळ घालतात. कारूनारूंची व अठरा-पगड भिकारांचीं जनावरें बाराहो महिने शेतें खात असतांना शेतकरी त्यांना कोंडवाड्यांत घालतात असें कां आढळून येत नाहीं, ह्यांतलें इंगित हें आहे. ज्या बायका गवतासाठीं किंवा सरपणासाठीं रान घेतात, त्या बहुधा राखणदाराचा डोळा चुकवून शेतांत घुसतात. चोरपावलाचा त्यांना बालाभ्यास असतो. त्या नसेल तेथून वाट पाडतात, व कांहीं कुपाटी काढली असल्यास ती बुजवीत नाहींत; कारण रात्रीं चोरी करण्याला ती आड-वाट उपयोगीं पडते. शेतांत आल्यावर त्या तें वाटेल तसें तुडवितात; पिकें मोडतात; बांध, पाट, आळीं, ढांसळतात; गवत वेंचतांना भाजी, पाला, धान्य, फळें, ओटींत भरतात; आणि तेथल्या तेथें खाण्यासारखें असेल तें शेळीसारखें बकाबका झपझप खातात. शेताच्या मालकाची नजर गेली आणि तो लांबून ओरडला, तरी त्यांचें हात-तोंड चालूंच राहतें. जवळ येऊन तो फळें, भाजी, कणसें, परत घेऊं लागला तर त्या त्याची करुणा भाकतात, आणि नच जुळलें तर गळा काढून कपाळाला स्वतःच दगड मारून घेऊन रक्त काढतात, आणि कुभांड रचतात कीं चार ठोंबांसाठीं निष्ठुर कुणबी जीव घ्यावयाला उठला.

पापी कुणबी आंगाला झटून अब्रू घेऊं पाहतो, असाही आळ कित्येक जणी घालतात. अशा स्थितींत ‘ भीक नको कुत्रें आटोप ’ असें कुणब्याला होतें. प्रसंग पाहून महार, मांग, भिल्ल, ह्यांच्या बायकाही शेतमाल चोरतांना असल्या युक्त्या अंगिकारितात. फिरस्त्यांच्या कांहीं जातींत पुरुष व बायका मिळून शेत मागावयास जातात, आणि कांहीं जातींमध्यें बायका-पुरुष वेगवेगळाले जातात. हे लोक शेतांत निरनिराळ्या वाटांनीं एकदम घुसतात, आणि कणसें काढण्याचा तडाका लावतात. कुणबी अरे अरे करतो, इकडे एकाला किंवा एकीला घालवावयाला जातो, तों तिकडे दहापंधरा इसमांचीं कणसें खुडण्याची एकच गर्दी उसळते. त्यानें आरडाओरड केली, म्हणजे सर्वजण त्याला वेढतात आणि बोलबोलून गोंधळून टाकतात. मांग–गारोडी, कैकाडी, चित्रकथी, फांसपारधी, इत्यादि चोरट्या जाती शेत उकळण्यांत फार बाक्या आहेत. तळाचा नाईक भलें थोरलें मुंडासें चढवून बरोबर मैना घेतो, आणि ‘ पाटील रामराम पाटील रामराम ’ करीत शेतकऱ्याच्या पुढें जातो. इतर बायका पुरुष चोहों बाजूंनीं शेतांत घुसून कणसें तोडूं लागतात. कुणबी शेतावर नजर टाकतो तों जिकडे तिकडे कणसें खुडण्याची एकच झिंबड त्याला दिसून येते, व तो रागें भरूं लागतो. परंतु ‘ मोठा दैवाचा बळीराजा धर्माचा वांटा दे ’ इत्यादि गुळचट भाषणें करून नाईक त्याला हरभऱ्याचे झाडावर चढावितो व खुलवितो; आणि मैना कोठें गळ्यांत हात घालून, तर कोठें दाढीला हात लावून पोवाडे, इष्किबाज गाणीं व उखाणे म्हणून त्याची थट्टा सुरूं करते. तेव्हां अर्थात् त्याची नजर शेतावरून गरंगळते. एवढ्या अवधींत सर्व टोळी दोन तीन पायल्यांना झोका देते; खेरीज नाईकाची भिक्षा व मैनेची ओवाळणी. कोल्हाटी–हरदासांच्या नायकिणी आडपडदा न ठेवतां थट्टा करतात, हें सांगणें नकोच. कंजारणीही टाळ्या पिटून अचकट विचकट उखाणे म्हणत म्हणत कुणब्याला अंगस्पर्श करतात. मांगगारोडी, फांसपारधी ह्यांच्या बायका आणि साधारपणें बहुतेक भिकार जातींच्या बायका शेत मागतांना करवेल तितकें कुणब्याचें

मन आकर्षण करतात. अशा रीतीनें बिचारा रानचा गडी सुंभ होतो आणि भिकाराला उघड्या डोळ्यांनीं शेत लुटूं देतो. हा झाला उघड उघड रोजगार. ह्याखेरीज जमेल तेथें रात्रींतून पीक काढून नेण्याची अगर दावण बसविण्याची दहशत घालून खळें मागण्याला फिरतें भिकार कमी करीत नाही. 'कुनबी सरीखा दाता नहीं । पन मारे बिगर देता नहीं ॥' हा मंत्र कुणब्याला लुबाडणाऱ्या सर्व जातींच्या बायकापोरांनिशीं तोंडपाठ आहे; आणि त्याप्रमाणें त्याचा अंमलही जारी आहे. ह्याप्रमाणें

---

१नंदी ढवळा महादेव झाला ईश्वर स्वारी । बीं भरून पेरलें एका भूमिकेच्या उदरीं ॥ गण्या वर्षला मेघराजा पिकल्या धुंचरी । पांचा कणसांसाठीं महादेव करून गेला चोरी ॥ फिरून घेतलीं पांच कणसें भेंडे उडविले चारी । महादेवाचा गळा बांधिला एका वेळावरी ॥ सोड बळीराया तुझें भाग्य आहे थोरी । सोडून दिलें बळीनें महादेव गेला गिरजाजवळी ॥ काय सांगूं गिरजाराणी भगत मारू केला । अमृता शिपाई घोडा साजवंत केला ॥ फिरविलें मुंडासें हातभर बिलबला तुरा । धावूं घातलीं वावरें बळी सांपडला बरा ॥ आव रे कुणबी हुरडा लेव रे बारीक । धांवत गेला बळी हुरडा मोडी निर्वाणीचा ॥ आपण खातो गिरजा देतो महादेव मौज पाहतो । गेला सारा दोरा दिवाणे केलें हवालदारू । अवकळी बळीराज संगे दिला हावलदारू ॥ लाललाल धटी बुवाची सवारंग पट्टी । मुलखीचे दरबारीं बुवाजी सांगत असे गोष्टी ॥ मुलखींचा आला बुवाजी धराया नी नेला । आंधव गंधव राजा स्वर्गींचा झाला ॥ अंकळी टंकळी राजा निर्वाणीची ढाळी । असा पवाडा गाते तुझ्या धर्माची साळी ॥

देशी गांवांत खळीं मगांतांना भिकार जाती कुणब्याला बहुधा वरील पोवाडा गातात. मानवाचें सत्व पाहण्यासाठीं देव वाटेल तें रूप धारण करतो, व दान देणाराला स्वर्ग प्राप्त होतो; ही भिक्षेकऱ्यांच्या पथ्यावरची कल्पना ह्यांत मुख्य असून, गांव--मुकादमानीत सारावसुलीमध्यें कुणब्याला होत असलेल्या त्रासाचें वर्णन आहे.

दिवसा पेंढीदाणा गोळा करतांना रात्रीं कोणत्या शेतांत बिनबोभाट गुरें चारतां येतील, कोणत्या शेतांतील पीक, लांकूड, ढोरें, मेंढ्या, कोंबड्या, नाडे उपटतां येतील हेंही हे लोक टेहाळून ठेवतात, आणि त्याप्रमाणें रात्रीं काम उरकतात.

झुंझरकां राखणदाराला डोळा लागला म्हणजे चोरपावलानें शेतांत शिरून आपल्या गोण्यांत किंवा घोंगड्यांत धान्य अगर कणसें भरण्याची अनेक भिकार जातींची वहिवाट आहे. कांहीं मध्यरात्रीला अगर पहिल्या रात्रीला म्हणजे कुणबी जेवणखाण करतो अशा वेळेला डल्ला मारतात. हे लोक चोरलेलीं कणसें लागलींच कुटतात व खातात, किंवा त्यांचें धान्य दुसऱ्या धान्यांत कालवतात; म्हणजे चोरी ओळखण्याची व अंगीं लावण्याची अडचण पडते. गुराखी दोनप्रहरीं लवंडला असतां ढोरवाड्यांतून किंवा मैदानांत चरणाऱ्या कळपांतून वंजारी, मांगगारोडी, चित्रकथी, पारधी व इतर ढोरें पाळणाऱ्या भटकणाऱ्या भिकार जातींचे लोक आणि स्थाईक चोरटे गुरेंढोरें लांबावितात. ते आपलीं गुरें गांवच्या गुरांबरोबर चरण्याला सोडतात, आणि आपल्या गुरांबरोबर गांवचीं गुरेंही हांकून नेतात. रात्रीं रस्त्यानें गाडी चालली असतां तिचा एक बैल सोडून एकजण जुंवाला खांदा देतो, आणि सोडलेला बैल आपल्या साथीदाराच्या हवालीं करतो; व तो लांब गेला म्हणजे आपण जूं सोडून पसार होतो. गाडी वांकडी तिकडी चालून गाडीवाला जागा होतो, तोंपर्यंत सोडलेला बैल कोठल्या कोठें नेलेला असतो. मेंढक्यानें पाठ फिरविली कीं मांगगारोडी, कैकाडी, कळपांतून एकीकडे चरत असलेल्या बकऱ्याची किंवा मेंढराची हिसक्यासरशीं मुंडी मुरगळतात, व त्याला झुडपांत किंवा खांचेंत टाकून झुटकतात; आणि मेंढक्या दृष्टीआड झाला म्हणजे तेथें परत येऊन तें बकरें अगर मेंढरूं घेऊन जातात. रात्रीच्या वेळीं वंजारी मेंढ्यांच्या कळपांत शिरून त्यांना बिचकावतात, आणि त्या धांदलींत मेंढरें घेऊन पसार होतात. मेंढक्या आडवा झाला तर ते त्याला चोपतात. बेरड लोक हातांत वाघनख घालून वाघाचा किंवा लांडग्याचा आविर्भाव आणून कळपांत शिर-

तात, आणि भेदरलेलीं मेंढरें बकरीं चोरतात. भील, रामोशी, मांग वगैरेंची शेळ्यामेंढ्या चोरण्याची रीत अशी आहे—एक इसम मेंढवाड्याजवळ तडक जातो व बसतो; आणि बाकीचे १००।१५० कदमांवर राहतात. नंतर तो कडेचें मेंढरूं उचलतो व उजवा हात त्याच्या मागच्या पायांमध्यें आणि डावा हात पुढच्या पायांमध्यें घालून त्याची मान अशी दाबून धरतो कीं त्या मेंढराला 'ब्या' म्हणून करतां येत नाहीं. अशा रीतीनें आरडाओरड होईपर्यंत मेंढरें नेऊन तीं आपल्या साथीदारांच्या हवालीं करतो. चोरलेल्या शेळ्यामेंढ्यांनीं ओरडूं नये म्हणून मांग, रामोशी, कैकाडी व कातोडी त्यांच्या जिभेला मोठा कांटा टोंचतात. चोरलेल्या जनवरांचीं शिंगें खुडून, त्यांच्या कानांचा आकार बदलून, अगर त्यांना डागण्या देऊन हे लोक त्यांचें स्वरूप असें बदलतात कीं, तीं ओळखतां येऊं नयेत. कैकाडी, वड्डर, कुंचेवाले, कोल्हाटी वगैरे गाढवगोते ( ज्या जाती गाढवांवर बसतात, त्या एकमेकांना एकगोत्री चुलतभाऊ समजतात; असल्या सर्व जातींना गाढवगोते म्हणतात. ) कुंभार-परटांचीं गाढवें चोरतात. हे लोक चोरलेलीं जनावरें लांब बाजाराला नेऊन स्वस्त भावानें फुंकतात, किंवा मारून खातात. कधीं कधीं ते त्यांना आपल्या सामलातींतल्या खाटकांना अगर त्यांच्या मार्फत विकतात. रोज लागणाऱ्या जिनसा विकत घेण्यासाठीं सर्व भटक्ये वाण्यांना आढीच्या दिढी भावानें धान्य देतात. सर्व भिकार जाती मनस्वी कैफ करतात. उद्यांची पर्वा नसल्यामुळें ते तलफेपायीं कलाल वगैरेंना फार स्वस्त दरानें धान्य घालतात. भटकणाऱ्या भिकाऱ्यांच्या जमातींच्या वळणांतले कुणबी, वाणी, सावकार ठिकठिकाणीं आहेत. त्यांच्याजवळ ते आपलें धान्य सांठवितात, आणि कार्यप्रसंगीं किंवा आषाढश्रावणांत गरज लागेल त्याप्रमाणें त्यांच्याजवळून चंदी आणतात. ह्यांना टांच बसते ती आषाढ आणि श्रावण महिन्यांत. त्या वेळेला खळीं उलगडलेलीं असतात आणि रानांत कांहीं गवसत नाहीं, तेव्हां ह्यांना सांठविलेलें धान्य उपसण्याची पाळी येते; म्हणून आषाढ-श्रावणाला हे लोक ' **मेहुणा** ' म्हणतात. मेहुण्यामेहुण्यांची मस्करी आबालवृद्धांस

माहीत आहे. जों जों समाज रानवट तों तों मस्करी जास्त. तेव्हां भिकार जाती सागतात कीं, मेहुणा आला म्हणजे तो जसा दोन चार गचांड्या देऊन लोळवितो, आणि खाण्यापिण्यापायीं खर्चांत घालतो, त्याप्रमाणें आषाढ श्रावण दोन चार गचांड्या देऊन खर्चाची तसदी लावतो. भिकार जाती गांवांत भीक मागतात ती अशी कीं, गांवकऱ्यांना जातिपरत्वें व्यवसायपरत्वें आळवून गाणीं ह्मणून, कोठें वायकोपोरांना खुलवून तर कोठें कट कट नको असें करून, हे लोक आपली झोळी भरतात. भिक्षा मागतांना जर कांहीं चीजवस्त हाताला लागली तर ते ती लांबवितात, आणि ज्या जातींचा चोरी हाच जात-धंदा त्या तर भीक मागतांना हटकून चोरी करावयाच्या. भिकाऱ्यांच्या पालांभोंवतीं झारेकरी व कनिष्ठ प्रतीचे जव्हेरी खड्यागुंड्यासाठीं नेहमीं घिरट्या घालीत असतात. त्यांच्या पर्यटनांत त्यांना कोठें कांहीं कोठें कांहीं सांपडतें, आणि ते चोऱ्याही करतात. त्यांना असला माल उजागरा विकण्याची पंचाईत असते, आणि खरी किंमतही माहीत नसते. त्यामुळें सोनार, झारेकरी, वाणी, जुनापुराणा जर खडेगोटे घेणारे फेरीवाले इत्यादि लोक त्यांच्याजवळून हलक्या किंमतीनें माल घेऊन चांगला लाट मारतात. कोणत्याही गांवीं मुक्काम घालण्यासाठीं व तेथें तो तीन दिवस टिकविण्यासाठीं सर्व भिकाऱ्यांना पाटील-कुळकर्णी व हलके पोलीस ह्यांची मनधरणी करावी लागते. भिकार म्हणजे ह्या लोकांच्या बिनबोभाट उत्पन्नाची एक बाजू आहे. त्यामुळें कुणब्यांना कितीही त्रास झाला व वर्दळ लागली तरी गप्प बसावें लागतें. भिकार जातींची किफायत किती आहे ह्याची कल्पना पुढील गोष्टींवरून करतां येईल. पुण्याकडील खेड तालुक्यांतले ठोकेजोशी सावकारी करतात. भटकणाऱ्या भिकाऱ्यांमध्यें

---

१ पारनेर तालुक्यांत पांचसहा वर्षांपूर्वीं कांहीं गोपाळांवर खुनाची तोहमत होती. तेव्हां त्यांनीं सुमारें हजार रुपये खर्च केला व चांगले चांगले सावकार त्यांना जामीन राहिले. १९१० सालीं पारनेरच्या मामलेदारांनीं शेतचोरीबद्दल सात मांगगारोड्यांना प्रत्येकीं शभर रुपये दंड केला. त्यांतले ६०० रुपये तात्काळ आले आणि बाकी आठचार दिवसांत आले. साक्षीपुराव्याचा व वकिलांचा खर्च वेगळा.

बायकापोरांनिशीं दारू–तंबाखूचें व्यसन असतें, अफू–गांजा सेवन करणारे आणि जुगार खेळणारे त्यांत पुष्कळ असतात, आणि ह्यांपैकीं एकही शोक पैशावांचून होत नाहीं. दर एक भुत्याला दीक्षा देतांना भोप्याला १००रुपयांपर्यंत मिळकत होते. पोतराज करतांना भांग, गांजा, अफू, दारू वगैरे जितके म्हणून मादक पदार्थ असतील तितके पूजेला आणावे लागतात; व गुरुदक्षिणा, जेवणावळ मिळून सुमारें ५० रुपये खर्च येतो. पोतराजाचे धरित्रीपासून तों कलालापर्यंत १२ नमस्कार आहेत; आणि त्याला प्रत्येक कलालाचे दुकानीं यथेच्छ दारू झोडण्याचा व दक्षिणा मागण्याचा हक्क आहे. एक वृद्ध पोतराज असें सांगत होता कीं, मुंबईस मनास वाटेल तितकी दारू मिळून पांच सात रुपयांखालीं रोज जात नाहीं. कुंचेवाल्यांच्या लग्नांत मुलीच्या बापाला कमींत कमी पन्नास रुपये द्यावे लागतात. चित्रकथ्यांच्या लग्नाला दोनशें रुपयांचे वर खर्च येतो. फांसपारध्यांत १०० रुपय.चे खालीं लग्न होत नाहीं, आणि १२५ रुपयेपर्यंत पंच दंड चोपतात. कोल्हाट्यांत लग्नाला ६०० — ७०० रुपये लागतात.

चोरी, ठकबाजी करण्याच्या कामीं गुन्हेगार–जातींना गोसावी, बैरागी, साधू, फकीर, वगैरेंचा वेष आतिशय उपयोगीं पडतो. ह्यां-प्रमाणें नटून कोणी आला तर त्याच्या खाण्यापिण्याची चंगळ चालून त्याला घरें धुंडाळण्यास व वाटेल तेथें जाण्यास मज्जाव होत नाहीं. पुष्कळ गुन्हेगार जाती दुकानदारीचा आव घालून घरें हेरून ठेवतात व फोडतात. भामटे हे वारकरी, गोसावी, बैरागी, फकीर, यात्रेकरू वगैरेंचीं अनेक सोंगे आणून उचलेगिरी करतात. बौरी (बावरी) जातीचे घरफोडे व दरोडेखोर अत्तरें व धातुपौष्टिक औषधें विकीत फिरतात. त्यांच्याबरोबर गाढवें, गाई, म्हशी, तट्टें असतात. समागमें बायकापोरें असल्यास ते गोसाव्याचा आणि सडेपणीं बैराग्याचा डौल घालतात. कांहीं खाकी साधू ( हे अंगाला भस्म चार्चेतात, लंगोटी नेसतात आणि धुनी लावून बसतात. ) होतात. कांहींजण कृत्रिम गंगाजलाच्या ( पाण्यांत गोपी-

चंदन कालविलें म्हणजे तें भागीरथीच्या पाण्यासारखें दिसतें. ) कावडी घेऊन हिंडतात. खोटीं नाणीं पाडणारे व चालविणारे मारवाड अथवा गुजरात बौरी भाटाच्या, गिरी गोसाव्याच्या किंवा कबीरपंथी फकिराच्या थाटानें फेरीला निघतात, आणि वाण्या–दोहरे न अडखळतां म्हणतात. फकिराची ऐट आणून विजापुराकडील छप्परबंद नांवाचे मुसलमान लोक खोटीं नाणीं पाडतात व चालवितात. औधींये लोक बैरागी किंवा ब्राह्मण यात्रेकरू बनतात आणि चोऱ्या करतात. उजळे मीने (मीयाने) लोक संजोगी साधूंची अक्कड लावून भगवा फेटा घालतात, किंवा कधीं कधीं ज्योतिषी बनतात आणि चोऱ्या घरफोड्या करतात.

नाशिक, पंढरपूर, तुळजापूर, वगैरे क्षेत्रांच्या रस्त्यांवरील गांवांना सर्व पंथांच्या व धर्मांच्या खऱ्या–खोट्या सांधूंची बेहद्द तोषीस लागते. नवीन क्षेत्रें, नवीन साधू व नवीन पंथ निर्माण करण्यांत हिंदूंची बरोबरी करणारा एकही धर्म सबंध पृथ्वींत नाहीं. 'जितने कंकर उतने शंकर' 'कवडीस कवी आणि गोवरीस गोसावी.' प्रवाससौकर्य आणि काठीला सोनें उघडें बांधून जाण्याइतकी शांतता असल्यावर क्षेत्रांच्या वृद्धीला आणि यात्रेकरूंच्या पायपिटीला ताळतंत्र कोठलें राहणार ? ह्यामुळें सध्यां गांवोगांव नेहमीं विकल, भिकारी, व साधू वस्तीला आलेले दृष्टीस पडतात. **आंधळ्यापांगळ्यांची** माळ बरीच मोठी असते, आणि त्यांना किफायतही पुष्कळ होते. आंधळे पांगळे अत्यंत सांसारिक व व्यसनी असून बहुधा दोन पैसे बाळगून असतात, कारण त्यांना दान करण्याची, धर्मप्रवृत्तीपेक्षां, फॅशन ऊर्फ नवप्रिय चाल अलीकडे झपाट्यानें वाढत आहे. बायकापोरांचा संसार तर ते थाटानें करतातच; पण कैफही सडकून करतात. निरुद्योगी आंधळ्यापांगळ्यांच्या माळेचा उपसर्ग खेड्यांना हमेषा लागतो. त्यांचप्रमाणें **वारकऱ्यांच्या** दिंड्या–पालख्यांच्या वाटेवरल्या गांवांना त्याप्रीत्यर्थ नेहमीं बराच खर्च येतो.

१ एका गांजाच्या खटल्यांत एका वारकरी आंधळ्याला २० रुपये दंड सुनावतांच पांच सात मिनिटांत त्याच्या बायकोनें बिऱ्हाडावरून पैसे आणून भरले.

पूर्वापार रूढीप्रमाणें १००-२०० तें हजारों वारकऱ्यांना लोक भक्तिभावानें भाजीभाकरी पुरवितात. ह्यांखेरीज दिंडींतले वारकरी वस्त्रप्रावरण, जोडे, घोंगड्या, छऱ्या, पैसे वगैरे उकळीत चालतात तें वेगळें. **कानफाटे** किनरीवर गोपीचंदाचीं गाणीं म्हणतात व पीठ पैसे मागतात. भैरवदीक्षेचे गोसावी संध्याकाळीं आलक्ष पुकारीत पीठ मागतात. **गोसावी–बैरागी** घरोघर पीठ कपडा आणि गांजा तंबाखूला किंवा यात्रेला अगर एखाद्या मंदिराला पैसे मागतात. ते कधीं कधीं त्रागा करूनही पैसे काढतात. **अघोरी** राखेचा बोकणा तोंडांत भरून मेल्यासारखा पडतो तिळाची पेंड कुजविली म्हणजे तिची विष्टेसारखी घाण येते. याप्रमाणें नकली विष्टा खाण्याची भीति घालून अघोरी पैसे उकळतो. **नानकशाही, कबीरपंथी** पैसे मागत गांवोगांव हिंडतात. **फकीर, शिद्दी** भाकरी, पीठ, कपडा व पैसा मागतात. फिरस्त्या बैराग्यांपेक्षांही फकिरांचें वर्तन आततायीपणाचें व रंगेलपणाचें असतें. **रफई फकीर** गुरुजानें भोंसकून घेण्याची किंवा मानेंतून '**सुलतानी**' (सळई) घालण्याची जरब देऊन पैसे काढतात. मानभावांच्या झुंडीच्या झुंडी धान्य व पैसे गोळा करतात. 'बाहेरून काय मानभावीपणा दाखवितो, मानभावाप्रमाणें त्याचें मत कांहीं केल्या

---

१ सन १८०८ सालीं पैठणच्यानजीक दहा बारा गांवांत सुमारें २० फकिरांची टोळी पांच रुपये व घोडा पाहिजे म्हणून सवाल घालीत फिरत होती. त्यांना एका गांवानें पंधरा वीस रुपये करून दिले. त्यांत कुलकर्ण्यानें रुपया व पाटलानें आठ आणे दिले. कारण विचारतां गांवकऱ्यांनीं असें सांगितलें कीं, "फकिर दारांतून हलेना. तो फिरस्ता पडला. आगबिग लावली तर त्याचें घेतां काय!"

२ सन १९०८ सालच्या आरंभीं शेवगांव तालुक्यांतील खामपिंप्री गांवीं दोन प्रहरीं कांहीं मानभाव आले, आणि सांगूं लागले कीं, पन्नास मूर्ती गांवावरून रुपाशीं चालल्या आहेत. गांवानें साडेचारमण धान्य त्यांना करून दिलें, त्याचे त्यांनीं त्याच वेळीं गांवच्या वाण्याजवळ ढिल्या भावानें टक्के केले आणि रोकड पैसे घेऊन ते चालते झाले.

कळावयाचें नाहीं; ' इत्यादि वाक्प्रचार लोकांमध्यें ह्या वर्गासंबंधानें वसत असलेली, खरी म्हणा खोटी म्हणा, साशंक भीति दर्शवितात.

गोसावी, बैरागी, वाघे, मुरळ्या, हिजडे, मानभाव, फकीर, वगैरे देवाचें नांव पुढें करून भीक मागणारे लोक—मग ते फिरस्ते असोत किंवा स्थाईक असोत-हा नुसता निरुपयोगीच नव्हे तर समाजघातक वर्ग आहे. ब्राह्मणापासून तों सर्व वर्गांच्या व सर्व जातींच्या लोकांना ह्या वर्गांत शिरतां येतें. विष्णूचा पेला प्याला म्हणजे बैरागी होतो, शिवाचा पेला प्याला म्हणजे गोसावी, पिराचा प्याला ह्मणजे फकीर होतो इत्यादि. ह्यांनीं संसार नांवाला सोडलेला असतो. त्यांपैकीं बहुतेक संसारिकांपेक्षांही लालुची, लफंगे, तामसी व दुर्व्यसनी असतात; आणि लोकही विशेषतः मारवाडी, गुजराती, उदमी व पाटील त्यांना इच्छाभोजन, भांग, गांजा, अफू देण्यांत पुण्य मानतात. कोणी आईबापांवर तर कोणी बायकामुलांवर रूसून साधू फकीर होतो, कोणाला आधिव्याधीमुळें प्रपंच नकोसा होतो तर कोणाला पोटाची ददात, यातायात नको असते. ह्या वर्गाची खाण्यापिण्याची मौज, निष्काळजीचें बिनदगदगीचें आयुष्य, कोणाच्याही कह्यांत वागणें नलगे अशी स्वच्छंदी प्रवृत्ति, लोकांकडून मिळणारा सन्मान, आत्मोद्धाराचें मृगजळ, आणि लांडग्या कोल्ह्यांनीं व मुंडणाऱ्यांनीं ह्या जीवनवृत्तीसंबंधानें भरलेलें खासें नामी छत इत्यादींना भुलून पुष्कळ मुलगे, मुली, गफलतीनें गोसावी, बैरागी, वाघे, मुरळ्या, भोप्ये, आराधी, जोगतिणी, भाविणी, मानभाव, फकीर वगैरे होतात. मुलें होत नसलीं किंवा होऊन तीं वांचत नसलीं अशा स्त्रीपुरुषांना हे लोक अंगारा, प्रसाद, व आशिर्वाद देतात; आणि सांगतात कीं, पहिलें किंवा अमुक एक फळ देवाला वाहा म्हणजे तुझें पोट पिकेल, व वस्तीवाडी वाढेल. गरजवंताला अक्कल नसते. लोक बिचारे कबूल करतात, आणि जुनी लंगोटी देण्यास मागेंपुढें करणारे पोटचा गोळा तटकन् तोडून गोसावी, बैरागी, वाघ्या, भोप्या, जोगतिणी, मुरळी, फकीर, मानभाव ऊर्फ भवाळ इत्यादींच्या पदरांत टाकतात ! अशी एक समजूत आहे कीं, संकल्पाप्रमाणें मूल वाहिलें

नाहीं तर तें नपुंसक होतें आणि वंशखंड होतो. जन्मचे जन्म जातात तरी मोठमोठ्या पंडितांला धर्माचा सुगावा लागत नाहीं, परंतु आमच्यांत ज्याप्रमाणें बाहुलाबाहुलींचीं लग्नें होतात तशी लोकांच्या अज्ञानाचा व धर्मभोळेपणाचा फायदा घेऊन पाळण्यांत चिल्यापिल्यांना धर्मदीक्षा किंवा पंथदीक्षा देण्यांत येते. असे मुंडलेले लोक पुढें कुसंगतीनें दुराचारी होतात, आणि मुरळ्या, भाविणी ह्यांना तर पोटासाठीं कसब करणें प्राप्त होतें. परंतु अप्रबुद्धपणीं गुरूचे चेल्यावर जुलूम वंजन असतें; व त्याला मायेंत घेण्यासाठीं खाणें–पिणें, लेणें वगैरे हरएक बाबतींत चेल्याचे असे लाड चालतात, कीं कोणी पोटच्या पोराचें इतकें कोड पुरवीत नसेल. मानभावांच्या मेळ्यांतले कड्यातोड्यांनीं मढविलेले गोजिरवाणे ‘ बाळबोवा ’ पाहिले म्हणजे वरील विधानाची सत्यता पटेल.

आईबापांचें पोट पिकण्यासाठीं त्यांनीं आमच्या जन्माचें मातेरें केलें अशी कबुली जेजुरीस भर खंडोबाचे देवळांत किती तरी मुरळ्या समजूं लागल्यावर देतात. हजार साधूंत नऊशेंनव्याण्णव ज्ञानशून्य, व्यसनी, कोपिष्ठ व लालची असतात, आणि त्यांच्या दुर्वासवृत्तीला भिऊन लोक त्यांना पोस-

---

१ एका मराठ्याच्या मुलाला लहानपणींच त्याच्या आईबापांनीं गांवच्या भवाळाच्या ओटींत घातलें, आणि तो त्याच्या घरीं दळण, कांडण, शेणकुर, स्वैंपाकपाणी करीत होता. सोळा सत्रा वर्षांचा झाला तरी त्याला धड बाळबोधही वाचतां येत नव्हतें. त्याला एकानें म्हटलें कीं, इतकें काम केलें तर तुला १०० रुपये साल कोठेंही मिळेल. तो म्हणाला, ‘ बुवा बरा जाऊं देईल ! दुष्काळांत मुलीसह मानभावीण झालेल्या व पुढें मेळा सोडलेल्या एका बाईनें आपली आठ दहा वर्षांची केशवपन केलेली मुलगी मेळावाल्यांकडून परत मागितली. पण बुवा तिचें ऐकेनात.म्हणून तिच्याबरोबर गांवकरी मेळ्याचे मुक्कामाच्या जागीं गेले, तों मुलीनें उत्तर दिलें कीं,‘आई मला जारकर्माला नेते, मी मेळा सोडून येत नाहीं. ’ असले डावपेंच धर्मांतरांत नेहमीं आढळतात, व हीच अवस्था सर्व प्रकारच्या धर्मदीक्षा व पंथदीक्षा दिलेल्या मुलामुलींची पर्यायानें असते, हें चाणाक्ष वाचकाला फोडून सांगणें नको.

तात. अभ्यास करून करूनही मनाची एकाग्रता होत नाहीं, तर ज्यांचा सर्व काळ भटकण्यांत, शिधा कपडा पैसा उकळण्यांत, व निशाबाजींत जातो, त्यांनीं 'आमचा काळ आम्ही परमार्थाकडे वेंचतों, तुम्ही जसा पोटाचा तसा आम्ही देवाचा उद्योग करतों, सर्वांनींच रोजगार करावा तर देवाची चाकरी कोणीं बजवावी?' इत्यादि बकावें, आणि लोकांनींही तें खरें मानावें; ह्यापेक्षां आमच्या विचारमूढतेचा खंबीर पुरावा दुसरा कोणताही असूं शकणार नाहीं. बहुतेक साधु निवळ खाणेंपिणें, गप्पागोष्टी, हुक्कापाणी ह्यांत काळ घालवितात. थोडेसे तुळसीदासाचें रामायण झुकत झुकत वाचतात किंवा ५ – ५० अभंग, दोहरे, पदें ह्यांची पोपटपंची करतात; आणि फारच छेडलें तर एकादा दुसरा एकादें ठराविक धर्मविषयक कोडें किंवा कूटप्रश्न अज्ञ जनांचे तोंडावर फेंकतो, व त्याचें ठराविक पद्धतीनें निराकरण करतो, आणि त्यांकडून वाहवा मिळवितो. असल्या बऱ्हाणी साधूंना दान करून त्यांच्यामार्फत स्वर्गांत दाद लावून घेण्याचा यत्न करणें म्हणजे वंध्यापुत्राची अपेक्षा करणें नव्हे काय? गोसावी, बैरागी, फकीर गांवांत आले कीं गांवचे चंगीभंगी आपली बैठक बुवाजी किंवा साईजी-जवळ घालतात, आणि त्यांचें प्रस्थ वाढवून आपणही चैन करतात. ह्या वर्गांतले साधू पहिल्यानें गांवच्या अल्पवयी पण चैनी मुलांना गांठून त्यांना अमलाची चट लावतात, आणि तत्प्रीत्यर्थ त्यांकडून घरचें धान्य, वस्त्रें, किंवा पैसा ह्यांच्या लहानसान चोऱ्या करवितात. ह्यांच्या प्रसादानें गांजा-अफूचें व्यसन लागून पुढें चोर किंवा कफल्लक झालेल्या व कधीं कधीं प्राणासही मुकलेल्या तरुणांचीं उदाहरणें मागाल तितकीं खेड्यांतून दाखवितां येतील. ह्याप्रमाणें गांवांवर चरतां चरतां हे लोक जर एकाद्या गांवीं स्थायिक झाले कीं ते गांवकऱ्यांच्या उतरंडी उतरूं लागतात. ह्यांच्या धुनीजवळ गांवगुंड पडलेले असावयाचे, आणि मग 'कुऱ्याचा पाय मांजरावर आणि मांजराचा पाय कुऱ्यावर' असे धंदे चालतात. अनेक ठिकाणच्या तरुण स्त्रिया-विशेषतः विधवा-डबोल्यासह ह्या लोकांनीं काढून नेल्या आहेत, आणि ज्या घरांत मुंगीला

रीघ नव्हती, तेथें मोठालीं भगदाडें पाडलीं, व मानधनांच्या तोंडाला काळें फांसलें. आगगाडी नव्हती तेव्हां साधू लोक पायीं प्रवास यात्रा करून ठिकठिकाणची माहिती व ज्ञान मिळवीत; आणि त्यांच्या औषधपाण्याचा व जडीबुट्टीचा लोकांना उपयोग होत असे असें म्हणतात. आतां हे लोक आगगाडीनें इकडून तिकडे जातात, व त्यांना देशाचार पाहण्यास व वनस्पतींचें ज्ञान मिळविण्यास कांहींसुद्धां संधि सांपडत नाहीं. तरी आपले लोक अजून समजतात कीं, साधूंना किंवा त्यांच्या घरभऱ्या चेल्यांना पुष्कळ कळतें. कांहीं साधूंना अल्पस्वल्प शास्त्रीय क्रिया माहीत असतात. उदाहरणार्थ, कागदावर तुरटीनें गाईचें किंवा चेटकीचें चित्र काढलें तर तें एरवीं दिसत नाहीं, कागद पाण्यांत बुचकळला म्हणजे तें दिसतें व साधूचा बोलबाला होतो. झाडें, धान्याच्या सुड्या व चाऱ्याच्या गंजा जाळण्याच्याही युक्त्या आहेत, आणि अरिष्ट–प्रतीति आली म्हणजे लोकांना खरेंच वाटतें कीं, साधूचा शाप भोंवला. असल्या कृती शिकून आपलें ढोंग मातविण्यापलीकडे किंवा साधूंचे कपडे पांघरून गुन्हे करण्यापलीकडे बहुतेक आयतखाऊंस उद्योगच राहिला नाहीं, असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. ह्यांच्याच नांवानें **तुकोबाराय** हळहळतात कीं "बुडतसें जन देखवेना डोळा। म्हणूनी कनवळा येत असे ॥"

गांवोगांव भटकणाऱ्या भिकाराचे ढोबळ मानानें तीन वर्ग पडतील. जोशी, वासुदेव, पांगूळ, भराडी, वाघे, तिरमल वगैरेसारखे भिक्षुक; चित्रकथी, मांगगारोडी, पारधी, माकडवाले, कैकाडी, वगैरे सारखे चोर भिक्षुक; आणि वारकरी, विकल ( आंधळेपांगळे, रोगी वगैरे ), गोसावी, बैरागी, मानभाव, फकीर वगैरे प्रतिष्ठित भिक्षुक. अनेक प्रकारचे गुन्हेगार लोक आपल्या सोयीप्रमाणें उपरोक्त तिन्ही वर्गांचीं सोंगें घेऊन आपला कार्यभाग साधितात, आणि भिक्षेंत ऊर्फ धर्मांत प्रपंच भागला नाहीं म्हणजे तिन्ही वर्गांतील लोक कमीआधिक मानानें लांडीलबाडी व चोरीचपाटी करतात. पहिल्या वर्गांतील लोकांचीं जीं काय प्राचीन गाणीं, कथा, पोवाडे, होरे, ठोंके, बाण्या असतील, त्यांचा संग्रह करून

प्रसिद्ध केला, तर सामाजिक व धार्मिक इतिहासावर आणि रूढिबद्ध लोकाचारावर बराच प्रकाश पडेल, असें तज्ज्ञ श्रोत्यांचें मत झाल्यावांचून राहणार नाहीं. स्टेडसारख्या पंडितांनीं पाळण्यांतल्या मुलांचीं कवनें व गोष्टी निरंतर संग्राह्य म्हणून संपादन केल्या आहेत. पुष्कळ कवनांतील कथाप्रसंग अनेकरसपरिपूर्ण आहेत. परंतु तेवढ्यासाठीं तीं घोकून ठेवणारांच्या पोषणाचा सामाजिक खर्च अतोनात होतो असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. त्यांच्या पाठांतराचा संग्रह व प्रकाशन झालें म्हणजे मग त्यांच्या धंद्यांत तर बिलकुल हंशील राहणार नाहीं वेद प्रसिद्ध झाले आहेत म्हणून वेदपठण करणाऱ्या ब्राह्मणाला दक्षिणा देणें अनवश्यक आहे अशी झालेली लोकप्रवृत्ति पुढें ढकलली म्हणजे वारकरी, कबीरपंथी, गोंधळी वगैरे प्रसिद्ध ग्रंथांतील अभंग, पदें, लावण्या पोवाडे म्हणणारांचें काम उरलें नाहीं असें होतें. भराडी, वासुदेव, गोसावी, बैरागी, पांगुळ, कानफाटे वगैरेंचीं कवनें व कथा प्रसिद्ध करण्यास सार्वजनिक वर्गणी केली, तर पुढील पिढीचा बराच खर्च वांचून ह्या भिक्षुकांना परवडेल तो उत्पादक धंदा करण्याचा रस्ता खुला करून दिल्याचें महत्कार्य होईल. अनेक महाराष्ट्रीय संस्थानिकांसमोर ह्या लोकांची, निदान तमासगीर बहुरूपी वगैरेंची दरसाल हजरी होत असते; व त्यांना इनाम, वर्षासनें, शिरपाव वगैरे बिदागी देण्यांत येते. त्यांनीं जर ह्या पद्धतीला व्यवस्थित स्वरूप दिलें, आणि इंग्रज सरकाराच्या पुराणवस्तुसंशोधन खात्याप्रमाणें उपरोक्त वर्गांतील यच्चयावत् लोकांच्या सांप्रदायिक विद्येचा संग्रह करण्याचें एखादें खातें काढलें तर आपल्या देशबांधवांवर त्यांचे अनंत उपकार होतील ह्यांत संशय नाहीं. तरी संस्थानिकांनींहि सहानुभूतीनें ह्या विनंतीचा विचार करावा. दुसऱ्या वर्गाचा म्हणजे चोरट्या भिकाराचा कोणालाच उपयोग नसून उलटा उपद्रव आहे. प्रतिष्ठित भिक्षुक बहुतेक यात्रेकरू म्हणून वावरतात. साधू–फकिरांच्या सर्व पंथांमध्यें जरी घरभरे आहेत, तरी वारकरी शिवायकरून बाकीच्यांमध्यें फार करून सडे लोकांचा भरणा विशेष असतो. कांहीं तरी उद्योग करून दोन पैसे सांचवून

ह्यांनीं खुशाल यात्रा, वाऱ्या व देवदेव करावा. मजुरीचे दर गेल्या पंचवीस वर्षांत दुपटीवर चढले आहेत. धष्टपुष्ट आंधळ्यांना सुद्धां डोळसपांगळ्यांची मदत घेऊन चार पांच पायल्या दळण दळण्यास हरकत कोणती? आपापल्या बकुफाप्रमाणें ज्या त्या भीकमाग्यानें धंदा केला तर मजुरांची संख्या वाढून मजुरीचे दरही सैलावतील. अमुक तिथीला अमक्या यात्रेला गेलें पाहिजे अशी निकड दाखवून भाड्याचे पैसे मागणारे ह्या वर्गांत पुष्कळ असतात. पण ते असा विचार करीत नाहींत कीं, आपण रिकामटेकडे असतांना दोन तेथें चार महिने पायीं प्रवास करून तिथि कां गांठूं नये? भिक्षुक येथून तेथून अर्कट व स्वार्थी ही खूणगांठ हृदयाशीं बांधून त्यांना पुरे कसाला लावण्याचा सर्व जातींच्या, पंथांच्या व संप्रदायांच्या लोकांनीं निर्भिडपणाचा निश्चय केला पाहिजे, आणि या कामांत कोणी कोणाला गळ घालूं नये. पुष्कळ वेळां असें होतें कीं, गांवकरी एकमेकांच्या भिडेला गुंततात आणि अवघेही बुडतात. भवाळ पाटलानें माळकरी कुळकर्ण्याला म्हणावें कीं आम्ही तुमच्या दिंडीची संभावना केली तेव्हां तुम्ही मानभावाचे मेळ्याला मदत करा, आणि दोघांनाही मुसलमान मुलान्यानें म्हणावें कीं, आम्ही तुमच्या लोकांच्या साधूंना वर्गणी देतों, तर तुम्हीही आमच्या फकिराचा सवाल खालीं जाऊं देऊं नका. ज्यांच्या गुणांची खात्री पटली असेल अशा—मग तो कोणीही असो—व्यक्तिविशेषाच्या भजनीं तुम्ही खुशाल लागा. कोणी लोकोपयोगी धर्मसंस्थेचा जीर्णोद्धार करीत असेल तर मनाची खात्री करून घ्या आणि त्याला यथाशक्ति साह्य करा. पण पिढीजाद भिक्षुकी किंवा पंथ किंवा सांप्रदाय या भपक्याला भुलून आपलें नांव वाढविण्यासाठीं कोणीं स्वतः बुडूं नये, व इतरांनाही बुडवूं नये. वारकऱ्यांना लोक फारसे भीत नाहींत; पण गोसावी, बैरागी, फकीर, मानभाव ह्यांची लोकांना भीति वाटते. त्यांच्या त्राग्यांना लोक चळचळा कांपतात; याशिवाय हे लोक म्हैस उडवतील, झाडें, फळें जाळतील, विहिरीचें पाणी पळवतील किंवा आग लावतील, असें ह्या साधूंचें लोकांना भय राहतें. असें

सांगतात कीं, निजामशाहींत भिकार ठरत नाहीं. गांवकरी व अधिकारी त्यांना झोडून पिटाळून लावतात. मोकळ्या पायाच्या इंग्रजींत तसें होणें शक्य नसल्यानें एकंदर आयतखाऊंचा प्रश्न सोडविणें कठीण आहे, व तो आमच्या लोकांच्या मायाळूपणानें अधिकच कठीण झाला आहे. प्रत्येकानें काम करावें आणि पोटाला मिळवावें. असें जो करीत नाहीं व मला पोटाला नाहीं म्हणून भीक मागण्याला येतो, त्याला भीक घालूं नये. तो उपाशीं मरत असला तर त्याला काम करण्यास सांगावें, पण फुकट पोटाला देऊं नये. तसेंच पैसा गांठीं असल्याशिवाय कोणालाही भटकतां येऊं नये. अशी तजवीज झाली पाहिजे आणि हें काम लोकांचें आहे, ह्यांत व्यक्तिस्वातंत्र्याच्या आड येण्यासारखें कांहीं नाहीं. वाटेल त्यानें वाटेल त्या साधूला किंवा साधूंच्या मेळ्याला वाटेल तेथें न्यावें आणि त्यांचा खर्च सोसावा. ज्या भिक्षुकांजवळ वाटखर्ची नसेल त्यांना आमंत्रणाशिवाय गांवोगांव भटकतां येऊं नये, आणि ते गांवीं आल्यास त्यांना तेथें भिक्षा मिळूं नये व मागतां येऊं नये. आमंत्रित भिक्षुकांची बरदास्त आमंत्रण देणारांनीं करावी, इतरांस त्यांची तोषीस लागूं देऊं नये. असें झालें म्हणजे आमंत्रण देणारे अंथरूण पाहून पाय पसरतील. असले कांहीं सिद्धांत लोकांच्या मनांत बिंबल्याशिवाय आणि तदनुसार वागण्याचा त्यांनीं निर्धार केल्याशिवाय भिकाऱ्यांची व गुन्हेगारांची संख्या आणि देशाचें दारिद्र्य हटणार नाहीं. निमंत्रण नसलेल्या साधूंच्या फिरतीवर पोलीसनें लक्ष ठेवावें आणि लोकांना त्रास होईल अशा रितीनें कोणालाही भीक मागूं देऊं नये. मुंबई डिस्ट्रिक्ट पोलीस आक्ट (१८९० चा अंक ४) कलम ६१ रकम (एस्) नुसती कायद्यांत धूळ खात पडली आहे. तिचा जर गांवांत, यात्रांत व आठवडे बाजारांत अंमल केला तर पुष्कळ साधू आणि पंगू दुसरा धंदा पाहतील. जो कोणी त्रासदायक रीतीनें भीक मागतो अथवा भीक मिळविण्यासाठीं रस्त्यांत किंवा रस्त्याजवळ रोग किंवा व्यंग किंवा किळसवाणी जखम दाखवितो त्याला पन्नास रुपयेपर्यंत दंड सदर कायद्याच्या सदर कलमांत सांगितला आहे. तसेंच अठरा वर्षांचे आंतील पुरुषाला

किंवा स्त्रीला आजन्म ब्रह्मचर्य–वृत्तीची दीक्षा देऊं नये, आणि बारा वर्षांच्या आंत कोणालाही चेला बनवूं नये अशी कायद्याची अटक सरकारनें घातली, तर पुष्कळच काम होईल. गुन्हेगारजातींचा गुन्हे करण्याचा धंदा सुटावा म्हणून हिंदुस्थान सरकारनें गुन्हेगार जातींचा कायदा ( इ० स० १९११ चा तिसरा ) पास केला आहे; आणि मुंबई सरकारनें तो सात आठ जिल्ह्यांत १०–११ जातींना लागू केला आहे. गुन्हेगार जातींतील इसमांचीं नांवें नोंदून त्यांनीं नेमल्या प्रदेशांत स्थाईक झालें पाहिजे, ठरविलेल्या हद्दीबाहेर भटकूं नये; ६ तें १८ वर्षांच्या वयापर्यंतचीं मुलें शाळेंत घातलीं पाहिजेत, वगैरे निर्बंध सदर कायद्याअन्वयें सरकारला करतां येतात. हा कायदा यशस्वी करण्यास लोकांनीं सरकारला मदत केली तर बहार होईल. गांवकऱ्यांनीं व गांवकामगारांनीं मनांत वागविलें असतें, तर सर्व आयतखाऊंचा बंदोबस्त मागेंच झाला असता. पीनल कोड सर्वांना पुरून उरलें आहे. खेरीज पोलीस आक्ट, कोंडवाड्याचा आक्ट वगैरे त्याचीं पिलें आहेतच. मागणारानें शेतांत किंवा घरांत पाऊल ठेवलें कीं अन्यायाची आगळीक होते; रोप तुडविलें कीं अपक्रिया आणि खुडलें कीं चोरी होते. दुसऱ्याच्या मालांत गुरें चारलीं तर पिनल कोडची अपक्रिया होऊन शिवाय कोंडवाड्याचे आक्टाप्रमाणेंही गुन्हा होतो. सर्व भटके गदळ राहतात आणि मुक्कामाच्या गांवांत व आसपास अति घाण करतात. अगोदरच खेड्यांत स्वच्छता कमी आणि त्यांत फिरस्ते उतरले म्हणजे गांवापासून अर्धा–पाव मैल नाक धरल्याशिवाय चालतां येत नाहीं. घाणीचे खटले करूनही त्यांचा प्रवास अडचणीचा व खर्चाचा करतां येईल, व सार्वजनिक खजिन्यांत थोडी फार भर पडेल. तेव्हां जरूर तें कायद्याचें साह्य घेऊन सर्वांनींच ही सार्वजनिक पीडा घालविण्यास झटलें पाहिजे.

# दुकानदारी.

पूर्वीच्या अमदानींत राजे लोक कलासंपन्न लोकांना राजधानींत खुषीनें किंवा जबरदस्तीनें नेत, त्यामुळें कौशल्याचीं कामें राजधान्यांत विशेष नजरेस पडत. राजधान्यांप्रमाणें मोठाल्या यात्रांच्या ठिकाणींही लोक पुष्कळ जमत आणि तेथें मालाची देवघेव फार चाले व अजूनही चालते. आपल्या जग–विख्यात कवींनीं आपलीं नाटकें यात्राप्रसंगांनीं प्रथम लोकांपुढें मांडलीं ही गोष्ट सर्वश्रुत आहे. इंग्रजी अमलापासून मनु पालटला, आणि हुन्नरी लोकांना राजधानींत जाऊन राहण्याची तसदी नाहीं. ज्याचें, जेथें पोट भरेल तेथें त्यानें खुशाल जावें आणि सुखानें नांदावें, अशी सर्वांस मुभा आहे. हिचा परिणाम असा झाला आहे कीं, व्यापाराच्या सोयीमुळें जीं शहरें पुढें आलीं आहेत, त्यांत हुन्नरी लोक राजधान्यांपेक्षां-ही अधिक राहतात, आणि मोठ्या यात्रांपेक्षां देखील तेथें माल अधिक उठतो. जरी पूर्वींपेक्षां प्रवासाचीं साधनें व वित्ताची सुरक्षितता वाढली आहे तरी खेड्यांत उद्मी व कसबी लोकांची वस्ती जुजबी, गिऱ्हाईक कमी, व चढाओढ पूज्य अशी स्थिति असल्यामुळें त्यांमध्यें दुकानदारी यथातथाच आहे. म्हणून खेड्याचें गिऱ्हाईक रोजच्या बाजारा-साठीं आसपासच्या पेठेंत किंवा शहरांत जातें, यात्रांच्या दिवसांत यात्रांला लोटतें, आणि थांबण्याला सवड नसल्यास गांवच्या उद्म्यां-वरही गरज भागवून नेतें. ह्यांशिवाय हाळीपाळी करणारे किरकोळ दुकान-दार आपला माल खेड्यांनीं नेऊन विकतात. खेड्यांत नाण्याची हलकीशी गरज भागते. मोठी गरज वारण्यासारखे सराफ खेड्यांत दुर्मिळ. ते कसब्यांत, पेठेंत किंवा शहरांत राहतात, आणि तेथून आपल्या वळणांतल्या गांवांना कर्ज पुरवितात. ह्याप्रमाणें खेड्यांतली दुकान-दारी जागेवर, यात्रांत व आसपासच्या कसब्यांत, पेठेंत किंवा शहरांत चालते. शेतीचा हंगाम सोडून बाकी वर्षभर मंदीच असते. नाहीं म्हणावयाला

लग्नसराईंत किंवा सणावारांला खेड्यांतल्या लोकांची दुकानांवर बरीच गर्दी नजरेस पडते.

सालउधारी आणि दामदुकाळ हीं खेड्यांतील दुकानदारीचीं प्रधान अंगें आहेत. खेड्यांत कमकसर सर्व वस्ती कुणबी आणि त्याकडून शेतमाल पावणारे ह्यांची असते. रोख पदरमोड करणारांची वस्ती इतकी जुजबी असते कीं, ती जमेंत धरण्यासारखी नाहीं. कुणबी व त्यावर जीव धरून राहणारे कारूनारू आणि फिरस्ते ह्यांचा हात उभ्या सालांत एकदां म्हणजे खळवटीला काय तो चालतो. खासगी नोकरींत महिन्यापेक्षां साल बांधून देण्याचा जास्त देशरिवाज आहे. खेड्यांत महिनेदार नोकर फार कमी. तथापि मजुरीचे दर वाढल्यापासून आतांशा मात्र रोजंदार होण्याकडे मजुरांची जास्त प्रवृत्ति दिसून येते, आणि ती विशेषतः शेतकऱ्यांना नडते. पूर्वींच्या राज्यांत इनामदार, वतनदार ह्यांच्या नेमणुका वर्षांतून एकदांच खर्चीं पडत, आणि इंग्रजींत सुद्धां त्या सालांतून एकदांच खर्चीं घालतात. मात्र २५ रुपयांवरील पाटीलकुलकर्ण्यांची पोटगी सहामाही आदा होते. ह्याचा परिणाम असा झाला आहे कीं, वर्षभर वाण्यानें वाणसौदा, चाट्यानें कापड, सावकारानें खावटी किंवा पैसा पुरवावा आणि गांवकऱ्यांनीं सालअखेर खातें चुकवावें, असा धारा जो पडून गेला तो अजूनही चालू आहे. स्वराज्यांतील नेमणुकांचा बहुतेक भाग ऐनजिनसी मिळत असल्यामुळें, आणि कुणबी, कारूनारू, व फिरस्ते ह्यांचें नाणें बोलून चालून दाणे असल्यामुळें ह्या उधारीची बहुतेक फेड ऐनजिनसी होत असे, व अजूनही तशीच होते. सबब नाण्याची उलथापालथ आमच्याकडे कमी होऊन दाम—दुष्काळ सुरू झाला. तो इतका कीं, स्वराज्यांत जो कमाविसदार हिशेबी येण्यापेक्षां जास्त वसूल पाठवी, त्याला दरबार शेंकडा दोन टक्के मनोती व सालीना बारा टक्के व्याज मजुरा देई. धर्मकृत्यांत सुद्धां अनेक धान्यें, हळद, खारका, नारळ, सुपारी, फळें, वस्त्र, जोडा, काठी, गाईपासून हत्तीपर्यंत जनावरें वगैरेंच्या दानाचें प्रमाण

हिरण्यापेक्षां फार अधिक आहे. रोकड नाण्याची किंमत कोठल्या कोठें जाऊन बसली हें चार आण्यांत गोप्रदान होतें-म्हणजे प्राचीन काळीं रोख पावलीपेक्षां गाय मिळणें सोपें होतें-ह्या एका गोष्टीवरून सिद्ध होतें. मोठ्या शास्त्रीपंडितांच्या घरांत वेळेला शालजोड्या निघत, व इनामदारांच्या घरांत सोनें जडजवाहीर निघे; पण रोजच्या व्यवहारापुरती सुद्धां रोकड निघण्याची मारामार पडे. शेतमाल झाला किंवा कोणताही विकण्याजोगा जिन्नस हातीं आला, तर तो विकून त्याची रोकड करून ठेवूं आणि रोखीनें प्रपंच चालवूं असें कोणींही मनांत वागविलें नाहीं. अर्थात् रोकड ही एक अनावर शक्ति होऊन बसली, आणि ज्याचेजवळ रोकड त्याला नुसता मनमानेल तितका नफा मिळूं लागला इतकेंच नव्हे तर त्याचा गांवावर मोठा अंमल गाजूं लागला. सरकारला तर लोक मायबाप समजतातच. पण त्याच्या खालोखाल दुकानदारांनाही मायबाप समजूं लागले; आणि त्याची अशी दृढ भावना झाली कीं धान्य झाल्यावर सरकारनें किंवा दुकानदारांनीं त्यांतून हवें तितकें न्यावें, मात्र आमचा प्रपंच खंडूं देऊं नये, आणि आम्हांला उपाशीं मरण्याची पाळी आणूं नये. अशा रीतीनें दुकानदार आणि गिऱ्हाईक ह्यांमध्यें सेव्य-सेवक भाव निर्माण झाला. सावकारांशीं भांडतांना पुष्कळ कुणबी त्याला विचारतात कीं, 'शेत पिकलें नाहीं, तुला दाणे मागितले तेव्हां तूं चिमुट-भर तरी दाणे दिलेस का ? आणि आतां आला तीन टोल्यांचें चिठोरें ( रोखा ) घेऊन पैसा मागावयाला किंवा फिर्याद करावयाला !' दुष्काळांत दुकानदार गल्लाचारा परगांवीं विक्रीला रवाना करूं लागले म्हणजे गांवकरी त्यांना आडवे होतात, आणि म्हणतात कीं, 'आम्हांला उपाशीं मारतां काय ?' उधारी आणि नाण्यांचा अभाव ह्यांमुळें खेड्यांतले दुकानदार अत्यंत स्वार्थी व काढू, आणि गिऱ्हाईक आशाळू व परावलंबी होऊन 'देरे वाण्या आणि खारे प्राण्या' अशी सामान्य दैनावस्था फार दिवसांपासून प्राप्त झाली आहे.

मृगसाल हें कुणबिकीचें साल होय. बरसात लागली म्हणजे शेतीचा

हंगाम सुरू होतो. सुसमृद्ध शेतकऱ्यांनासुद्धां ज्येष्ठ, आषाढ, श्रावण हे महिने विवंचनेंत जातात. कुणब्यांमध्यें "**आखाडी**" हा दुष्काळाला प्रतिशब्द आहे. 'सोळा वर्षांपूर्वी पहिली आखाडी पडली तेव्हां मी खडीवर गेलों' असें गांवढेकरी बोलतात. ह्यावरून आषाढाचा महिना कुणब्यांना नेहमीं जाचत असावा, असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. जवळ दाणा चारा व रगदार बैल असले तर बरें, नाहीं तर सर्वच चिंता. ह्यावेळीं कुणबी बहुधा खावटीसाठीं वाढीनें धान्य आणतात, आणि दुकानदार जुनें किडलें धान्य त्यांच्या माथीं मारून रासमाथ्याला एकदाणीं नवें धान्य दिढीनें क्वचित् दुणीनें परत घेतात. ज्यांच्याजवळ वैरण व बैल नसतात, ते कमींत कमी दोहोत्रा व्याजानें कर्ज काढून बैल-वैरण घेतात. कर्ज मिळण्याइतकी पत नसली किंवा कर्ज न काढतां निभण्यासारखें असलें तर ते दुसऱ्या कणब्यांशीं 'खांदोडी' करतात. त्यायोगानें त्यांला बैल उसनवार मिळून त्याबद्दल बैलांच्या मालकाला धान्य, पैसे किंवा आपले बैल परत उसनवार द्यावे लागतात. अशा रीतीनें कित्येक कुणबी जमिनींना पाळी—गोपाळी घालतात. खांदोड करण्याला ऐपत नसली तर ते "**इरजिकी**" नें पाळी घालतात, पेरतात व काढणी—मळणी करतात. पाळी, पेर, काढणी, मळणीला जे कुणबी मदत येतात त्यांना सकाळीं न्याहारी, दुपारीं जेवण, व संध्याकाळचें मोठें जेवण द्यावें लागतें. अशा प्रकारच्या कामाला व त्याच्या ह्या अन्नमय मोबदल्याला इरजिक म्हणतात. महार, मांग वगैरे इरजिकीला बोलावीत नाहींत, कारण ते आपल्याबरोबर आपलीं मुलेंमाणसें जेवणाला आणतात आणि अन्नही मागून व चोरून नेतात, त्यामुळें निपूर येण्याची भीति असते. इरजिकेचे वेळीं मांग डफ वाजवीत रहातो, आणि कामकरी "शाबासरे वाघा भलारे दादा" हें कडवें उच्च स्वरानें गातात. असो. जमीन तयार झाल्यावर दुसरी काळजी बिंयाची. जातिवंत बीं धरून ठेवणारे कुणबी बहुतेक नामशेष झाले आहेत. तरी असेही थोडे आढळतात कीं, जे अर्धपोटीं राहतील पण बीं जतन करतील. असल्या कुणब्यांचा निर्वाह सर्वस्वीं शेतीवर असतो व

ते शेत टाकून उद्योगधंद्यासाठीं गांव सोडून दुसरीकडे जात नाहींत. बऱ्याच शेतकऱ्यांना बीं विकत आणावें लागतें. ते तें कुणब्यांजवळून अगर वाण्यांजवळून आणतात. कुणब्यांजवळचें बीं असलें तर तें एकदाणीं तरी मिळतें. वाण्याजवळचें बीं भेसळीचें असतें. बीं अर्थातच धान्यापेक्षां दुप्पट तिप्पट क्वचित् चौप्पटही महाग मिळतें. बीं रोखीनें किंवा दुणीनें विकतात. पीक तयार होतें न होतें तोंच पट्टीचा हप्ता येऊन धडकतो, आणि व्यापारीही आपलें देणें वसूल करण्यासाठीं व धान्याचा सट्टा करण्यासाठीं टपलेले असतात. अनेक युरोपियन व्यापारीमंडळेंसुद्धां शेतकऱ्यांना आगाऊ पैसे देऊन कपाशी-गळितासारखें अमुकच पीक करावयाला लावतात, व उभीं पिकें खंडून घेतात. शेतकरी नडलेले व निरक्षर असतात. त्यांना बाजारभाव माहीत नसतो. वजनामापांची गुंतागुंत उकलणें त्यांच्याच काय पण शिकल्यासंवरल्यांच्याही आवांक्याबाहेर असतें. शिवाय ज्यांना माल विकावयाचा, त्यांचा विसार त्यांनीं घेतलेला असतो किंवा त्यांच्याशीं वर्षभर देवघेव करावयाची असते. व्यापारी व त्यांचे दलाल नोकर अति स्वार्थी, व्यवहारदक्ष, व रंग दिसेल त्याप्रमाणें वागण्यांत तरबेज असल्यामुळें नुसत्या भावांत शेतकऱ्यांचा कमींत कमी शेंकडा २५ तोटा होतो. ह्याखेरीज हिशेबांत, वजनामापांत, वर्तोळ्यांत, व्याजांत, कसरींत, मनोतींत, भोळ्यांत आणि नोकरदलालांच्या बहालीबक्षिशींत कुणबी पुष्कळ खराबीला येतो तें वेगळेंच. मूळ ठिकाणावर हे खेडवळ वजनामापांत चकतातच; परंतु जेव्हां मोठ्या व्यापारी कंपन्या रेल्वेवर माल चढविण्याची बोली त्यांशीं करतात, तेव्हां त्यांच्या फसवणुकीला व नागवणुकीला पारावार नसतो. कारण त्यांला रेल्वेच्या कांट्यावरील वजन कळत नसतें, आणि स्टेशनावर हुंडेकऱ्यापासून तों बहुतेक सर्व रेल्वेनोकर एकाचे एक असतात. रेल्वेवर कशी हुल्लड चालते याचें एक उदाहरण पुरे होईल. तें असें:-कार्तिक महिन्यापासून शेवंतीच्या फुलांचा बहर असतो. त्यांना पुणें-मुंबईस चांगला भाव येतो, म्हणून धोंड मनमाड रेल्वेच्या शेजारच्या गांवांच्या मळ्यांत लोक

शेवंती लावूं लागले. कांहींना स्टेशनच्या फसकींत इतका चट्टा बसूं लागला कीं, अखेर त्यांना ती मोडावी लागली. साऱ्याच्या हप्त्यांच्या वेळीं व त्यांचे मागून होणाऱ्या रासमाथ्यावर धान्य स्वस्त मिळतें; आणि एकदां कां दाणा वाण्याच्या घरीं गेला म्हणजे तो सोयीवार मिळत नाहीं, हा अनुभव आबालवृद्धांस आहे. धान्य वाण्याच्या घरीं थांबतें तर कदाचित् आतांइतकें महाग झालें नसतें. हंगामावर गांवचा शेतमाल ( दाणा, चारा, भाजीपाला ) शहर पहातो, आणि टंचाईचे वेळीं तोच पुनः शहरांतून खेड्यांत आणावा लागतो; ह्यामुळें व्यापाऱ्यांचा नफा व वहातूक ह्यांचा दुहेरी बोजा हातावर पोट असणाऱ्या गांवढेकऱ्यांवर पडतो. पूर्वीं जेथला माल तेथेंच ठरे, व लोकांच्या गरजा साध्या व अल्प असत; तेव्हां खेड्यांत पोटापाण्याची ददात म्हणून कशी ती ठाऊक नव्हती. १८९६ चे दुष्काळापूर्वीं दाणा चारा, तेल, तूप, गूळ वगैरे जिनसा खेड्यांत स्वस्त्या आणि शहरांत महाग मिळत. तें गाडें आतां फिरलें व ह्या जिनसा खेड्यांतल्या गिऱ्हाइकाला सदैव महाग मिळतात, असा खडतर अनुभव येऊं लागला आहे; आणि खेड्यांतली राहणी शहरांपेक्षां गैरसोयीचीच नव्हे तर महागही होऊन बसली आहे.

ही झाली शेतमालाची ठोक विल्हेवाट. शेतमाल हें बहुतेक सर्व गांवढेकऱ्यांचें व विशेषतः कुणब्यांचें मुख्य नाणें असतें. म्हणून घे पदरांत शेतमाल, आणि आण लागेल ती जिन्नस, असा बाराही मास त्यांचा व्यवहार चालतो. कुणब्यांचें राहणें गांवांत फारसें पडत नसल्यामुळें बाजार बहुधा कुणबिणी करतात, आणि ह्या कामांत कुणबिणीचें अनुकरण तिच्या ब्राह्मणेतर भगिनींनीं केलें आहे. अनेक वेळां असें दिसून येतें कीं, कारभाऱ्याला नेसावयाला धोतर घ्यावयाचें असतें, पण दुकानांत त्याच्यापेक्षां कारभारीणच हडसून खडसून बोलते. वरिष्ठ म्हणविणाऱ्या जातींत बायकांना दारचें वारें माहीत नसल्यामुळें वैधव्यदशेंत जशी त्यांची बुडवणूक होते आणि मध्यस्थांची पोळी पिकते, तशी मागासलेल्या जातींच्या बायकांची स्थिति होत नाहीं. पूर्वींचीं समाजबंधनें तुटलेल्या

हल्लींच्या काळांत बायका जाणत्या असणें किती अवश्य आहे, हें मागासलेल्या जातींच्या उदाहरणावरून कोणाच्याही लक्षांत येईल. असो. शेतें उभीं आहेत तेव्हांपासून तों खळें उलगडीपर्यंत गांवीं दुकानें असलीं, तरी हाळकऱ्यांची सारखी पायपीट चाललेली असते. ते बहुधा वाणसौदा, तेल, मीठ, कुंकू, दाराशिणा, बांगड्या, पोत, सुईदोरा, मिठाई, कापड, शिवलेले कपडे, भांडींकुंडीं घेऊन गांवोगांव फिरतात. हाळकरी बहुधा मारवाडी, लिंगायत, तेली, शिंपी, कासार, कोमटी, मुसलमान वगैरे जातींचे असतात. शेतांत किंवा गांवांत धान्य घालून बायका त्यांजवळून माल खरेदी करतात, आणि धान्याच्या व विकत घेतलेल्या मालाच्या भावांच्या त्यांच्या अज्ञानामुळें, चोरमाप-चोरकाट्यामुळें, हाळकरी चांगलाच ताव मारतात. गांवच्या दुकानांतही तोच धंदा चालतो. पुष्कळ वेळां असें पाहण्यांत येतें कीं, गिऱ्हाईक पदरांत अंदाजानें धान्य आणतें, उदमी तें आपल्या मापानें मोजतो आणि हिशेबापेक्षां अदपाव-पावशेरापर्यंतही वर धान्य भरलें, तर तो तें तसेंच घेतो; किंवा त्याबद्दल एखादी खारीक, सुपारी, खोबऱ्याची वाटी अगर एकदोन विड्यांची तंबाखू देतो. डांगाणांत पहावें तों खुशाल मापी अच्छेर हिरड्यांना अच्छेर नागली घेऊन गिऱ्हाईक आपल्या घरीं जातें. रानपसारा आहे तोंच घिसाडी, पाथरट, कंजारी, कैकाडी, वगैरे भटकणाऱ्या हुन्नरी जाति आपापला माल खपवितात. ह्या जाति बारा गांवचें पाणी प्यालेल्या असल्यामुळें त्या कुणब्यांना चांगलेंच फांदाडतात, व त्या वाटसरू असल्यामुळें त्यांना माल काढण्याला दम नसतो. आयतखाऊ जातींना शेतमाल फुकट अनायासानें मिळतो. त्या तो अवाचे सवा स्वस्त देतात; आणि तोच जर चोरून आणलेला असला तर मग दुकानदाराचें, दुणावलेंच समजा. दुकानदार किंवा हाळकरी मागेल त्या भावानें तो त्याला ह्या सर्व लोकांकडून मिळतो, आणि हा पडीचा भाव कुणब्यांना जाचतो.

गांवोगांव आठवडाबाजार भरत असतात, आणि त्यांत बराच माल उठतो. आठवडाबाजारांत हाळकरी आणि आसपासच्या गांवचे व्यापारी

व शेतकरी दुकानें मांडतात. त्यामुळें थोडीशी चढाओढ व पडताळा पाहण्याला जागा असते, आणि एरवींपेक्षां माल व भावही बरा असतो. तरी पण तो विशेष चांगला असतो किंवा वजनेंमापें खरीं असतांत असें बहुधा घडत नाहीं. गिऱ्हाईक आसपासच्या खेड्यांहून येतें. त्याच्या अज्ञानाचा व धांदलीचा घेववेल तितका फायदा घेण्यास दुकानदार कमी करीत नाहींत. बाजाराकडे मुकाट्यानें थोडा वेळ टक लावली तर असें दिसून येईल कीं, "धिटाई खाई मिठाई आणि गरीब खाई लाथा," हा न्याय जसा आमच्या एकंदर व्यवहारास लागू पडतो, तसा बाजारच्या दुकानदार–गिऱ्हाइकांनाही लागू पडतो. कुणबी रानगडी पडल्यामुळें चौचाल नसतो, व त्याला मागते पुष्कळ असल्यामुळें त्याचा स्वभाव भिडस्त बनतो. तो स्वतःचा माल बाजारांत मांडतो, तेव्हां त्याच्याशीं गिऱ्हाईक धिटाई करतें, व इतरांइतके दाम त्याचे पदरांत पडत नाहींत. म्हणून पुष्कळदां असें होतें कीं, कुणबी बाजारांत दुकान न लावतां आपला माल घाउकीनें दुसऱ्याला घालतात, आणि तो त्याच बाजारांत त्यांच्या देखत त्यावर जास्त नफा मिळवितो. विड्याचीं पानें, भुईमुगाच्या शेंगा, ऊंस, खरबुजें, टरबुजें, फळफळावळ, वगैरेसारखा "माकडमेवा" मालक स्वतः विकण्यास धजत नाहीं. असला माल खेडवळाजवळ पाहिला कीं संभावित दिसणारे लोक सुद्धां त्याच्या भोंवतीं गराडा घालून त्याला भांबावून सोडतात, आणि गडबडींत कित्येकजण किंमत न देतां तो घेऊन निसटतात. बरें, एकाद्याला पकडलें तर त्याचे मागें जातां येत नाहीं; कारण मागें दुकान कोणीं संभाळावें, ह्याची अडचण पडते. ह्यामुळें कुणबी तो तांबोळी बागवान ह्यांना विकतो. अहमदनगर येथें

---

१ वऱ्हाडांतील मलकापूर गांवीं आठवडाबाजारांत माकडमेवा खेडवळांजवळून अडवून घेऊन स्वतः विकण्याला कांहीं लोक, विशेषतः मुसलमान, असे सोकलेले दिसले कीं, एखाद्या खेडवळानें दुकान लावलें तर गर्दी करून माल लुटण्यापर्यंत त्यांची मजल जाते.

वळूघोड्यांना घास शेतकरी स्वतः पुरवीत नाहींत, तो ते वाणी व मुसलमान अडत्यांमार्फत विकतात, आणि अडत्यांना विशेष तकलीफ न पडतां शेंकडा ४० – ५० अडत मिळते, अशा मतलबाचा पत्रव्यवहार **शेतकरी** मासिक पुस्तकांत प्रसिद्ध झाला आहे. आठवडाबाजारांत महार-जागले, फकीर, गोसावी, बैरागी, वाघे, मुरळ्या, हिजडे वगैरेंची बेहद्द लूट चालते, आणि तिचा मारा कुणबी दुकानदारांवर जबर पडतो. ह्यांशीं कटकट घालीत बसावें, तर गर्दी पाहून गिऱ्हाईक दुसरीकडे जातें, आपला माल पडून राहतो, परत घरीं अगर गांवीं जाण्याला उशीर होतो, आणि गांवची सोबत निघून जाते; इत्यादि विचार दुकानदारांच्या मनांत येतात. जितका दुकानदार दुर्बल व दिवाभीत तितका त्याला त्रास व तोटा अधिक. बाजारांतल्या दुकानांना प्रशस्त जागा वांटून दिल्या, दोन दुकानांमध्यें जरूर तितकी मोकळी जागा राहिली, आयतखाऊ व आडदांड लोकांवर सक्त नजर ठेवली, आणि हक्क म्हणन बाजार उकळणें महार–जागले व भिकारांना बंद केलें, तर थोडक्या काळांत कुणबी दुकानदार बनेल; आणि शेतमालाचे भाव तेजीचे असून ज्या रास्त नफ्याला आज तो आंचवतो तो त्याला मिळेल. आठवडाबाजार व यात्रा भरविण्यासंबंधानें मुंबईसरकारानें सन १८६२ सालचा आक्ट ४ पास केला आहे. त्याअन्वयें नवीन यात्रा किंवा बाजार भरविण्यास जिल्हा मॅजिस्ट्रेची परवानगी लागते. अपल्या सोयीसाठीं व व्यापारवृद्धीसाठीं लोकांनीं आपले जरुरीप्रमाणें नवीन बाजार भरविण्यास हरकत नाहीं.

गांवढेकऱ्यांचा बराच बाजार व करमणूक गांवोगांव भरणाऱ्या यात्रांत होते. पावसाळा संपला म्हणजे यात्रांचा हंगाम सुरू होतो. आपल्या गांवीं नवीन बाजार भरविणें झाल्यास, गांवचे लोक वर्गणी जमा करून आसपासच्या सर्व प्रकारच्या दुकानदारांना चिठ्ठ्या पाठवितात, आणि त्यांना शिधा, चारा देऊन वर पागोटींही बांधतात. बाजार दर आठवड्यास भरणारा असल्यामुळें दुकानदारांचा पाहुणचार थोडक्याच मुदतींत बंद होतो. पण ही गोष्ट यात्रांना लागू पडत नाहीं. अमुक एका

देवाच्या किंवा सत्पुरुषाच्या उत्सवानिमित्त यात्रा असली आणि देवालयाचा अधिपति ऐपतदार असला, तर यात्रेला जे दुकानदार येतात त्यांना त्याला शिधा दाणाचारा पोंचवावा लागतो, जेवावयास बोलवावें लागतें, आणि त्यांचा कांहीं मान ठरलेला असला तर त्याप्रमाणें नारळ, धोतरजोडा, पागोटें किंवा रोकड देऊन त्यांची मानसंभावना करावी लागते: आणि जे वारकरी, गोसावी, बैरागी, साधू, फकीर विकल वगैरे भिक्षुक येतात त्यांचाही ह्याप्रमाणें समाचार घेऊन खेरीज दक्षिणा, तंबाखू, गांजा, अफू, द्यावी लागते; व हे संतही कैफ हक्कानें धर्म म्हणून मागतात. यात्रेचें आधिपत्य सबंध गांवाकडे असलें, तर गांवकरी आपापसांत वर्गणी करून वरील खर्च भागवितात. ह्याप्रमाणें वहिवाट वर्षानुवर्ष चालू आहे. गांवाकडे आधिपत्य आहे अशाच यात्रांची संख्या फार असल्यामुळें, आणि गांवकऱ्यांच्या पाहुणचाराबद्दल त्यांना परस्थांपेक्षां दुकानदार ढळत्या भावानें माल देत नसल्यामुळें, पुष्कळ गांवांना पोकळ मोठेपणाशिवाय दुसरा तादृश फायदा नसून यात्रांमुळें बराच चट्टा मात्र लागतो. पूर्वीच्या स्वस्ताईच्या व बिगर-अबकारी काळांत यात्रांसंबंधानें दाणाचारा उपसून देणें, व तलफा पुरविणें फारसें जाणवलें नाहीं; परंतु आतां तें सर्वांना जड जातें. शिवाय पूर्वी व्यापार संकुचित आणि प्रवास धोक्याचा व अडचणीचा असल्यामुळें यात्रेच्या दुकानदारांप्रीत्यर्थ गांवाला जो खर्च येई त्यांत जागच्या जागीं माल मिळाला हा एक फायदाच झाला असें लोकांना वाटे पूर्वी यात्रा म्हणजे कलाकुसरीच्या मालाचें किंवा कलावान् लोकांच्या कौशल्याचें प्रदर्शन असे. आतां ह्या गोष्टी यात्रांपेक्षां किती तरी व्यवस्थितपणानें फार झालें तर १० – २० कोसांच्या आंतील कसब्यांत किंवा शहरांत पाहण्यास मिळतात. व्यापार वाढल्यामुळें आतां गांवोगांव दुकानें झालीं आहेत; आणि सडका, पोलीस वगैरे व्यवस्था झाल्यामुळें वाटेल तेथून माल आणणें कठीण नाहीं. तेव्हां यात्रेच्या दुकानदारांच्या बोळवणीचें ओझें गांवानें उचलण्याचें कारण आज घटकेला उरलें नाहीं; आणि भिक्षुकी संत-विकलांचें पोट व निशाबाजी चालविणें म्हणजे शुद्ध

अजागळपणा आहे. त्यांतले त्यांत कानगोष्ट अशी आहे कीं, यात्रेची वर्गणी गोळा करणारे इसम बहुधा गांवचे पुंड असतात. आपसांतलें खासगी वांकडें उगविण्याला आणि लोकांच्या पैशावर हौस पुरविण्याला यात्रा ही संधि चांगली असते. वर्गणी देण्याला आढेवेढे घेणें म्हणजे चारचौघांत मानखंडणा करून घेणें असें लोकांना वाटतें. म्हणून ज्याला माणूसबळ व द्रव्यबळ कमी अशा लोकांना, विशेषतः बायाबापड्यांना, आपल्या ऐपतीबाहेर यात्रेची वर्गणी द्यावी लागते, आणि पुढाईत पुंड व त्यांच्या पुठ्यांतील मंडळी अजिबात कोरी राहते, किंवा अल्पस्वल्प वर्गणीवर सुटते. जमलेल्या वर्गणींत हे उजळ ठक मौज मारतात, आणि बचत तोंडांत टाकतात. त्यामुळें हे गावकऱ्यांना चढ देतात, आणि नव्यानव्या यात्रा भरवितात. काढ हुडकून जुनें देवीचें किंवा खंडोबा-बहिरोबाचें देऊळ, किंवा दरगा, अगर मशीद; अथवा एखाद्या बुवाची समाधि किंवा फकिराचें थडगें; किंवा बसीव आणन एखादा नवा साधु आणि भरीव यात्रा; व उकळ वर्गणी, हा ह्यांचा रोजगार. कोठें बसा कलभंडाशीं झगडत, असा विचार करून भिडस्त गांवकरी भिण्याभावें किंवा भक्तिभावें यात्रा भरविण्याला होकार भरतात. ह्याचा परिणाम असा झाला आहे कीं, घाटावरील गांवांत यात्राच यात्रा बोकाळल्या आहेत.

आठवडाबाजारांपेक्षां यात्रांमध्यें लांबलांबचे दुकानदार येतात, आणि ते टाकाऊ, भेसळीचा माल आणतात, व कसरीचीं वजनें, मापें वापरतात. आठवडाबाजारांतले दुकानदार व गिऱ्हाईक ह्यांची ओळख असल्यामुळें एका बाजाराला फसविल्यास दुसऱ्या बाजाराला ती गोष्ट गिऱ्हाईकाला दुकानदारांच्या आंगीं लावतां येते. यात्रांमध्यें तशी स्थिति नसते. यात्रा करणाऱ्या दुकानदारांत हलकटांची संख्या अधिक असते. इमानेंइतबारें सालभर मेहनत करणें ज्यांना आवडत नाहीं, असे लफंगे लोक कांहीं तरी वेडावांकडा माल, मिठाई, कपडे, यात्रांत विकून आपली सालचंदी काढतात. दंडेल, ठोकेभाई व आसमंतांतील हक्कदार यात्रांत फार लोटतात. बिचारा कुणबी म्हणेल कीं, मी आपला माल

यात्रांत विकावयाला काढीन तर सोय नसते. कां नसते ह्याचीं कारणें मागें आलीं आहेत. आठवडाबाजारांपेक्षां यात्रांत चोरटे, भामटे पुष्कळ जास्त येतात; आणि त्यांत बायकापोरांची गर्दी अधिक असल्यामुळें त्यांच्या हातचलाखीस वाव अधिक सांपडतो. उचलेगिरींतलें प्राथमिक शिक्षण मिळण्याला आडवळणी गांवांतल्या यात्रेसारखी शाळा क्वचितच आढळेल. पुष्कळ यात्रांतून अनेक तऱ्हेचा जुगारही चालू असतो. खऱ्याखोट्या भिकाऱ्यांची सर्व यात्रांत झिंबड असते, आणि त्यांचा उपसर्ग दुकानदारांना व गिऱ्हाइकांना फार लागतो. ते उघडपणें याचना व त्रागा आणि लपून छपून चोऱ्या करतात. लोक जिकडे तिकडे पांगलेले व बावरलेले असल्यामुळें चोरीचा पत्ता बहुधा लागत नाहीं. व्याधिग्रस्त, मुरळ्या, कोल्हाटणी, हरदासिणी यात्रांतून रोग व आचरटपणा यांचा प्रसार करतात. नाच, तमाशे चालू असल्यामुळें स्थानिक अधिकाऱ्यांना यात्रांतील अनिष्ट प्रकारांकडे लक्ष देण्यास फुरसत मिळत नाहीं ! गांव—कामगार व हलक्या दर्जाचे पोलीस ह्यांना यात्रा म्हणजे केवळ हक्काच्या करमणुकीचीं स्थानें होत, असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं ! देवदर्शन, नवस फेडणें, करमणूक, आपापसांतल्या भेटी वगैरे कामांमुळें यात्रेकरूंची धांदलपट्टी चालते, आणि बहुतेक बोलून चालून मजेखातर आलेले असतात. वरील कारणांस्तव खेड्यांतले लोक यात्रांमधील सौद्यांत अतिशय ठकतात, व त्यांच्या चोऱ्याही पुष्कळ होतात. गांवोगांव आणि त्यांतही एकाच मित्तीला अनेक गांवीं यात्रा असल्यामुळें यात्रांचा नीट बंदोबस्त करण्यास पोलीसला अडचण पडते, व देखरेखीसाठीं पुरेसे अंमलदार पाठवितां येत नाहीं. वर वर्णन केलेल्या अनिष्ट प्रकारांसाठीं यात्रा जितक्या कमी होतील, तितकें बरें असें वाटतें. फार तर तालुक्याप्रत एकाद्या मध्यवर्ती मोठ्या गांवीं यात्रा भरवावी, आणि तेथें दुकानदार, मल्ल व खेळये जमावेत; म्हणजे विक्रीच्या मालावर भरपूर देखरेख राहील, दुकानदारांच्या लबाडीला आळा पडेल, स्वतंत्र यात्रा भरविण्याचा गांवचा खर्च वांचेल, आणि चढाओढीनें गुणाची

पारख नीट होऊन, गुणी जनांना बक्षिसेंही खेड्यांपेक्षां अधिक देण्याला सवड सांपडेल. गुणोत्कर्षासाठीं सबंध तालुक्यानें वर्गणी करून शेतकाम, गुरेंढोरें, तालुक्यांत होणारीं कौशल्याचीं कामें ह्यांच्या प्रदर्शनाची अशा यात्रेला जोड दिली तर सिव्हिल व्हेटर्नरी ( गुरांचें वैद्यक ), शेतकी, पतपेढ्या, ह्यांसारखीं लोकोपयोगी खातीं लोकांना जरूर तें ज्ञान देण्यासाठीं तेथें विद्वान् व अनुभवशीर लोक पाठवितील, आणि यात्रेचे आद्य हेतु उत्कृष्ट रीतीनें सफळ होतील.

दिवाळी-शिमग्यांसारखे सण आणि लग्नादिवसांसारखीं कार्यें इत्यादि प्रसंगांचा बाजार करण्याला खेड्यांतले लोक बहुधा आपल्या गांवच्या किंवा आसपासच्या पेठेच्या मोठ्या दुकानीं जातात. त्यांचा सर्व व्यवहार उधारीचा असतो, व दुकानदारांना आपल्या बाक्या येण्याला पुष्कळ वाट पहावी लागते. पावसानें लागोपाठ टाळा दिला तर सर्व बाकी वसूल होणें दुरापास्त होतें, इतकेंच नव्हे तर कधीं कधीं तिची आशाही सोडावी लागते. तेव्हां गांवढेकऱ्यांना स्वस्त दरानें माल मिळणें एकीकडेच राहिलें, पण आत्मसंरक्षणासाठीं दुकानदार वेळेवर मालाच्या किंमतीच्या दुपटीच्याही रकमा नांवें मांडून ठेवतात. घी नो पैसा आणि पैशानु घी, हा अनुभव खेड्यांत सर्वत्र आहे. माल मिळतो तोंपर्यंत आपल्या खात्याची स्थिति काय आहे ह्याचा विचार करणारे लोक खेड्यांतील लिहितां वाचतां येणाऱ्यांमध्यें देखील विरळा. मग निरक्षरांचें नांव कशाला ? त्यांनीं आठवण ठेविली तरी एक लिखा आणि दस बका, अशी अवस्था होऊन शेटजीच्या वहीपुढें गप्प बसावें लागतें. शेटजींचा एकच मंत्र ‘ नीट आठवण कर. हें लिहिलें तें खोटें का? दाखीव कोणालाही वही ’. असल्या बोलाचालींत दुकानांत जमलेले लोक गिऱ्हाइकालाच फजीत करतात. खात्यांत वाटेल त्या रकमा व भाव घुसडण्यांत आणि दिलेला वसूल तोंडांत टाकण्यांत दुकानदाराचें इमानच काय त्याच्या लेखणीच्या आड येईल तेवढें. दुकानदार शेंकडा पंचवीसच्या कमी नफ्यानें माल मुळांत विकीत नाहींत, आणि त्यावर हें हिशेबाचें भोळें असतें. ह्याचा

परिणाम असा घडून येतो कीं, गांवढेकऱ्यांचें खातें पिढ्यानुपिढ्या बेबाक होत नाहीं. मोठे दुकानदार किरकोळ दुकानदारांप्रमाणें अधीर होत नाहींत, आणि गिऱ्हाइकांची नड जाणून ती वेळेवर भागवितात. ह्यामुळें गिऱ्हाइकावर त्यांची छाप चांगली असते. एकंदरींत हिंग बोजवार विकणाऱ्यांपेक्षां भरण्याचे दुकानदार गिऱ्हाइकांशीं वागण्यांत जरी प्रतिष्ठित असले तरी सचोटीनें वागून गिऱ्हाइकाचा फायदा करावा अशी भावना त्यांमध्यें क्वचित् आढळून येते.

तांब्याशिवाय चांदी नाद धरीत नाहीं, तशी खोट्याशिवाय दुकानदारी चालत नाहीं अशी आमच्या वैश्यांची जुनाट समजूत आहे. म्हणून आमचे दुकानदार गिऱ्हाइकांच्या डोळ्यांत धूळ टाकण्याला फार दिवसांपासून वहिवाटीनें बांधले गेले आहेत!! बनिया मिंतर बेसा सती। बगळा भगत कागा जती। ही उक्ति प्राचीन काळापासून लोकांच्या तोंडीं आहे. तरी पण सरडाची धांव अति झाली तर कुंपणापर्यंत असते. स्वराज्यांत कसब्यांचें व व्यापाऱ्यांचें दळणवळण दूरदेशीं बेताबाताचें असल्यामुळें बहुतेक व्यापार स्थानिक असे; आणि हुन्नरी, व्यापारी व गिऱ्हाईक हे एकमेकांची ओळख व मोहबत धरीत. त्या भोळ्या काळांत खऱ्याखोट्याची भीति व अब्रूची चाड लोक अधिक बाळगीत. एकदां कां कानफाट्या नांव पडलें म्हणजे गिऱ्हाईक लागणार नाहीं, व उपाशीं मरण्याची पाळी येणार; निदान चहूंकडे नाचक्की होणार, हें हुन्नरी व दुकानदार जाणून होते; आणि देशांतरीं माल नेण्याचीं साधनें नसल्यामुळें हुन्नरी व व्यापारी लोकांना गिऱ्हाइकी जतन करणें भाग पडे. खोट्याचें बेमालूम खरें करून दाखविणारे, व नाना प्रकारच्या मिश्रणांची संपादणूक शक्य करणारे शास्त्रीय शोध आमच्या कसबी लोकांना ठाऊक नसल्यामुळें त्यांना मोठीशी व भानगडीची भेसळ किंवा लबाडी पचविण्याची आक्रमशक्ति नव्हती. फारतर खोबऱ्याच्या तेलांत थोडेंसें करडीचें तेल, करडीच्या तेलांत थोडेंसें शेंगादाण्याचें तेल मिसळणें; गांवच्याच चार दोन राशींचे गहूं, जोंधळे कालविणें; केशरांत

करड फूल घालणें, डिंकाला हिंगाचें पाणी देणें, नागवेलीच्या शेंगा पिंपळी म्हणून, बाळहिरडे सुरवर हिरडे म्हणून, काकवी मध म्हणून विकणें; वगैरे साधलें म्हणजे ते तृप्त असत. त्यांचें तांबें पितळ तेव्हांच बाहेर पडे. ह्या सर्व कारणांस्तव बाजारांत तकलादी जिन्नस, खोटा कुपथ्यकर व डौली माल क्वचित् येत होता; आणि बहुतेक किंमतीही पिढ्यानुपिढ्या कायम सारख्या होऊन बसल्या होत्या. धान्य स्वस्त, लोकांच्या गरजा अल्प, व दुकानदारही थोडे, म्हणून मालाचा उठाव बेताबातानें होई; आणि बाजारांत नाणें फारसें खेळत नसे. परंतु पाश्चात्य व्यापाराला हिंदीस्तान मोकळें झाल्यापासून ही स्थिति पालटली. एकछत्री राज्य, आगगाडी व तार ह्यांनीं व्यापाराला वेग दिला, व त्याचें स्थानिक स्वरूप जाऊन तो जगत्संचारी झाला; आणि माल व नाणें ह्यांची उलथापालथ वाढली. शेतमालाची विल्हेवाट वरचेवर लागते, आणि तो खेड्याच्या किरकोळ गिऱ्हाइकाला महाग मिळतो, इतकेंच नव्हे तर त्यांतला नामांकित माल जागेवरच्या गिऱ्हाइकाला मिळत देखील नाहीं. ज्याला शहरांत गिऱ्हाईक फार असा चांगला दाणा, चारा, फळफळावळ व शाकभाजी शहरांत जाते; आणि बटाटे पिकतात त्या गांवच्या लोकांना ते हवे असले म्हणजे ते परत शहरांतून आणण्याची पाळी येऊं लागली आहे. अशा रीतीनें शहरांत जो माल टाकाऊ ठरतो तो खेड्यांच्या पदरांत बांधला जातो. शहरच्या बेढंग्यांप्रमाणें तो परततांना जातां येतां वाटेवरच्या सर्व व्यापाऱ्यांचा नफा, भेसळ, लुच्चेगिरी यांसह खेड्यांत उतरतो. ह्यांमुळें तो नुसता महागच पडतो असें नाहीं, तर अनोळखी देशी परदेशी व्यापाऱ्यांना आपल्या हातचलाखीच्या आणि आधुनिक पाश्चात्य शोधांच्या व युक्त्यांच्या साहाय्यानें तो जितका बेगडी करतां येऊन गिऱ्हाइकाला लुबाडतां येईल तितका खोटा व भपकेदार बनून खेड्यांच्या दुकानांत घुसतो. ह्यामुळें खेड्यांत कुजकें कापड, किडका कमकस दाणाचारा, नासका भाजीपाला, राखेवजा साखर, पुनः पुनः पाणी शिंपलेला खजूर, विरी गेलेला चहा, खोट मसाला, साबण,

घाणेरडें तूप, दांतवण, धडधडीत घासलेट मिसळलेलें गोडें तेल वगैरे धूमधडाका खपत आहे. घासलेट स्वस्तें म्हणून गांवढेकरी तें वापरतात, परंतु तें अत्यंत कनिष्ठ प्रतीचें असतें. साफ धूर घालविणारे दिवे घेण्याची बहुतेकांना ऐपत नसते. सबब लोक उघड्या चिमण्या वापरतात, व घासलेटचा धूर सर्वांच्या घशांत भरतो. तालुक्याच्या पेठांत सुद्धां, राकेलचें मिश्रण नाहीं असें खोबरेल मिळत नाहीं. शहरचे व्यापारी बटलरांजवळून उकळलेला चहा घेऊन तो वाळवून पूट देऊन विकतात, हें सर्वश्रुत आहे. नानाशास्त्रकलासंपन्न युरोपियन व्यापारी वाटेल ती मिसळ सफाईनें करतात, आणि मालाचें हिडीस स्वरूप झांकण्याच्या युक्त्या योजतात. त्यापुढें देशी माल आंधळा दाखवितो. द्रव्यलोभानें अमेरिकन व्यापारी वाईट मांसांचे डबे निवळ भपक्यावर खपवीत, असा बोभाटा होऊन त्याबद्दल युरोपियन लोक चिडल्याचें पुष्कळांच्या वाचनांत असेलच. 'खेडें तेथून वेडें'. अगोदर त्यांना ज्ञान कमी आणि एकजुटीनें वागण्याची धमक त्याहून कमी. ज्यांना गांवच्या दुकानदारांच्या वस्तादगिरीला तोंड देतां येत नाहीं, ते युरोप–अमेरिकेच्या द्रव्यलोभानें निर्माण केलेला खोटा माल खपविण्याच्या युक्त्यांपासून आपला बचाव काय करणार ? गोरे लोक उपजत व्यापारी व स्वावलंबी असल्यामुळें युरोपअमेरिकेचा खोटा माल त्यांमध्यें खपत नाहीं. शहरांत लोक छट, दुकानें मुबलक, व बाजारावर देखरेखही बरीच असते. खेड्यांत सर्व कांहीं ह्याच्या उलट. तीं बिचारी व्यापारी चढाओढीच्या भोंवऱ्यांत सांपडून पुरे गोते खात आहेत, आणि जगांतल्या सर्व सोद्या व्यापाऱ्यांच्या भक्ष्यस्थानीं पडलीं आहेत. हाळकऱ्यापासून तों पेठकऱ्यापर्यंत सर्व उदमी उघडाउघड खोटा, अपायकारक, व वाईट माल खेड्यांच्या लोकांना पाजीत आहेत. अशा स्थितींत खेड्याचे लोक पैशानें व शरिरानें खराबीस आले, तर त्यांत नवल काय ? घासलेटमिश्रित

---

१ हॅरोडस स्टोअर्सनें एक रुपया चौदा आण्याला हिरव्या रंगाच्या दोन फण्या मिस एडिथ हिल्टन नांवाच्या नटीला विकल्या. त्यांचा रंग उतरून तिच्या केंसाला काळे डाग पडले. त्याबद्दल वेस्ट लंडन कौंटी कोर्टनें तिला ११२५ रुपये नुकसानी देवविली. हें आमच्या खेड्यांत कोठून आणावें ?

खोबरेल बायजाबाई पाटलिणीच्या अंगावर उतलें किंवा त्यायोगें तिच्या डोक्याचे केश पार झडले, अगर भिमसेन महाराला खराब घासलेटच्या धुरानें कफक्षय झाला, तर मुंबईच्या लक्षाधीश शेटचें किंवा युरोप—अमेरिकेच्या कोट्याधीश व्यापारी कंपनीचें काय जातें? 'अर्थातुराणां न पिता न बंधुः।' पैशासाठीं हपापलेल्या व्यापाऱ्यांच्या तावडींतून खेड्यांतले लोक वांच—विणें अत्यंत अवश्य झालें आहे. ते खेड्यांच्या लोकांच्या माथीं जो खाण्यापिण्याचा लेण्यानेसण्याचा अपायकारक माल मारतात, त्याकडे पाहून असे उद्गार निघतात कीं, 'बाबांनो द्रव्यदंड घ्या पण देहदंड तरी घेऊं नका'. मुलगी देऊन जांवयाला आणि ऋण देऊन कुळाला आयुष्य चिंतावें अशी आपली जुनी वहिवाट होती. ती जर आमचे व्यापारी चालविते, आणि गिऱ्हाइकाला टिकाऊ पथ्यकर माल पुरवून तें तगतें व धडधाकट ठेवणें, व पेठेला सचोटीचें व परिणामीं हितकर वळण लावणें, ह्याची वैश्यवर्णावरील जबाबदारी जर ते ओळखते, तर खेड्यांचीं दुकानें म्हणजे शहरचे उकिरडे अशी स्थिति होतीना. वजनामापांत, भावाटावांत, हिशोबांत खेड्यांतलें गिऱ्हाईक सर्वस्वीं दुकानदारांच्या मांडीवर मान टाकतें. तेव्हां व्यापाऱ्यांचा निर्धार झाला कीं खोटा माल म्हणून आणावयाचा नाहीं, तर शेर अच्छेर मालासाठीं किंवा १०।२० हात कापडासाठीं गिऱ्हाईक मुंबई पाहून खोटा पण स्वस्ता माल घेऊन येईल, आणि त्यामुळें आपलें नुकसान होईल, अशी भीति बाळगण्याचें कारण नाहीं. माल खरा पण महाग मिळूं लागला म्हणजे फार तर गिऱ्हाईक तो कमी घेईल, आणि मितव्ययी होईल, इतकेंच. पण तें गांवचें दुकान सोडून जाईल असें सहसा होणार नाहीं. गिऱ्हाईक मितव्ययी झालें तर व्यापाऱ्यांचा कायमचा फायदा आहे. दुसरी गोष्ट अशी कीं, वाईट माल पैदा करणाऱ्या देशी परदेशी व्यापाऱ्यांची स्थिति कैफी माणसाप्रमाणें झाली आहे. जों जों वाईट माल खपतो तों तों तो अधिक अधिक वाईट पण स्वस्ता कसा बनवितां येईल ह्या विचारांत ते चूर होऊन गेले आहेत, व उत्तरोत्तर जास्त जास्त

वाईट मालाचा बाजारांत पाऊस पाडीत आहेत, आणि अनाथ खेड-वळांच्या पैशाचा व आरोग्याचा बळी घेत आहेत. खेड्यांच्या व्यापाऱ्यांनीं आपसांत व्यापारी सभा स्थापून दुकानांत वाईट माल ठेवावयाचा नाहीं, असा आळा घातला तर शहरच्या उजळ ठकांच्या गमजा बंद पडतील, व त्यांना वाममार्गीतून सोडविल्याचें श्रेय मिळवून आपल्या पिढीजाद अन्नदात्या गिऱ्हाइकाशीं इमानेंइतबारें वागल्याचें पुण्यही त्यांच्या पदरीं पडेल. खेड्यांत परप्रांतस्थ व्यापारी थोड्या भांडवलावर थोडक्या काळांत हवेल्या बांधतात, डागडागिना करतात; आणि पोटापाण्याचा उद्योग मिळत नाहीं म्हणून वरिष्ठ कनिष्ठ जातींतले लिहिणारे सवरणारे गांवकरी इकडे माशा मारीत बसतात. त्यांनीं जर दुकानदारींत मन घातलें तर ते स्वत: पोटभर खातील, आणि चोख माल चोख हिशेब ह्यांचा फायदा स्वकीयांना देतील. फायदेशीर रीतीनें कोणता माल कोठें मिळतो, ह्याची माहिती पाहिजे असल्यास सेक्रेटरी इंडियन मर्चंट्स चेंबर ऑफ कॉमर्स मुंबई, ह्यांच्यांशी पत्रव्यवहार करावा म्हणजे ती बसल्या जागीं मिळेल. सरकारनेंही खेड्यांच्या बाजारांतील मालावर पूर्ण नजर ठेवून मुक्या आंधळ्या पांगळ्या खेडवळांना व्यापारी स्वातंत्र्याच्या स्वैर व स्वार्थी दुरुपयोगापासून वांचवावें, आणि आई ना बाप अशी जी खेडवळ गिऱ्हाइकांची दैना झाली आहे, ती नाहींशी करावी.

खेड्यांतील सावकारीला उचापतीच्या खात्यापासून आरंभ होतो. खावटीचें धान्य, कडबा, बैल, बीं, प्रपंचाच्या नेहमींच्या नडी वगैरे संबंधानें जी उचापत होते ती सांचूं लागली म्हणजे हिशेब करून दस्तैवज करून देणें प्राप्त होतें. ज्याच्याकडून कर्ज येण्यासारखें असतें त्याला त्याच्या पतीप्रमाणें कर्जरोख्यावर दरसाल दरशेंकडा ६ तें ३६ पर्यंत व्याजानें कर्ज मिळतें. त्यांतले त्यांत दोहोत्र्याचे दस्तैवज जास्त नजरेस येतात. शेतकऱ्यांना बिनव्याजीं हप्तेबंदी मिळते, अशा समजुतीवर कांहीं सावकार भरण्याच्या दुपटीचा दस्तैवज करून घेतात. हातावरील सावकारी फार करून संपुष्टांत आली आहे, असें म्हटलें तरी

चालेल. शेतकऱ्यांकडील बिनतारणाचें कर्ज वसूल होण्याला फार जिकीर पडते, म्हणून बहुधा स्थावर तारण घेऊन सावकार त्यांना कर्ज देतात. खात्याच्या हिशेबाची व फेडीची जी अवस्था तीच दस्तैवजी देण्याच्या हिशेबाची व फेडीची. फुगलेला भरणा, जबर व्याज, 'माघ, फाल्गुन, शिमगा, होळी, चैत्र एकूण महिने पांच ' असला हिशेब, आणि दिलेल्या वसुलाची नाकबुली–मिळून सर्व प्रकारें कुळाचें घर घेण्याला बाताबेताच्या भांडवलाचे सावकार सदैव तत्पर असतात. ह्याला अपवाद फार थोडे. ह्यामुळें प्रपंचाच्या व धंद्याच्या चालू खर्चासाठीं काढलेल्या कर्जाखालींच गांवढेकरी दडपून जातात. तेव्हां धंदा वाढविण्यासाठीं कर्ज काढून त्यांत नवीन भांडवल घालण्याचें अवसान त्यांना कोठून सांपडणार ? शेतीशिवाय तर धंदे खेड्यांत फारसे नसल्यामुळें अडाण्यांचे दस्तैवज बहुतेक प्रापंचिक खर्चासाठीं झालेले असतात. कुणब्यांचे दस्तैवज मात्र धंद्यासाठीं (उदाहरणार्थ बैल, बीं, शेत घेणें, विहिरी, ताली करणें, इत्यादि) काढलेल्या कर्जांचे दिसून येतात. परंतु ज्याप्रमाणें रजिष्टरपुढें भरणा पदरांत घेऊन कचेरीच्या बाहेर ती रक्कम कूळ सावकाराला परत देतें, त्याप्रमाणें कज्जा जिंकण्यासाठीं वरील प्रकारचीं कारणें दस्तैवजांत फडकतात आणि शेंकडा ६० व्यवहारांत हीं कारणें वास्तविक नसतात. गरजवंताला अक्कल नसते. ऋणको म्हणतो कांहींही लिही पण माझी आजची नड वार. धनको म्हणतो मला कोर्टांत ददात पडणार नाहीं असा दस्तैवज करून दे. खेड्यांत सावकारी करणारांचे साधारणतः पांच सहा वर्ग पडतील. थोड्याशा भांडवलावर व्याजबट्टा करणारे 'अडाणी' व सधन कुणबी, खेड्यांतील उद्मी, मोठ्या भांडवलाचे सराफ, पिकें खंडून घेणारे एतद्देशी व परदेशी व्यापारी आणि अलीकडे गांवोगांव पैसा कापड वगैरे पेरणारे पठाण किंवा पंजाबी व्यापारी.

थोड्याशा भांडवलावर व्याजबट्टा करणारे अडाणी बहुधा आशेखोर असतात, पण नेटदार नसतात. हे जातीनें ब्राह्मण, सोनार, सुतार वगैरे असतात. व्याजाच्या आशेनें ते लहानसान रकमा कर्जाऊ देतात,

पण त्या परत येणें आतांशा मुष्कील असते. त्यांनीं जमिनी गहाण घेतल्या तर ते त्या गहाणदारांना किंवा इतरांना बटाईनें अगर खंडानें लावतात. मारुतीचे शपथेवर कर्ज, खंड, किंवा बटाई येत असे अशा काळांत व्याजबट्टयापासून जो धान्याच्या व कुळाच्या सेवेच्या रूपानें नफा मिळे, त्याच्या दंतकथा ऐकून हे लोक अजूनही कर्जदारांच्या थापांना भुलतात. परंतु कोळी, ठाकर, भिल्ल, वगैरे जंगली म्हणून कमी चौचाल जाति किंवा वऱ्हाड, खानदेशसारखे सुसंपन्न कुणबी ह्यांची वस्ती सोडून बाकीच्या ठिकाणीं किरकोळ अडाणी सावकार साफ फसतात. त्रागा करून, शिव्याशाप देऊन त्यांचें कर्ज वसूल होत नाहीं, व शेतमालही कुणबी त्यांच्या हातीं लागूं देत नाहीं. कांहीं दिवस अंदर बट्टा सोसून हे लोक बहुधा मुद्दल रुपयांचे सहा तें बारा आण्यांवर आपले रोखे वाण्यांला बेचन करून देतात. हा वर्ग आतां नामशेष होत चालला आहे. धान्याच्या वाढत्या किंमतींनीं थोडासा हात दिल्यापासून तुरळक कुणबी व्याजबट्टा करूं लागले आहेत. त्यांचें कर्ज येण्याला खळखळ पडते, आणि बोलीप्रमाणें भरपूर वसूल त्यांना क्वचित् मिळतो. व्यवसायधर्मानुसार त्यांचा डोळा जमिनींवर असतो, म्हणून ते जमिनी गहाण घेतात आणि त्या घरीं कसतात. कुणबिकींतले ते पोटकिडे असल्यामुळें त्यांना रोकड व्याजापेक्षां शेतवांट्यांत जास्त नफा भेटतो. कर्ज फुगवून कुळाची जमीन तोंडांत टाकावी अशी त्यांची मनांतून इच्छा असते. परंतु त्यांचा व्यवहार नात्यागोत्यांतल्या माणसांत बहुतेक झालेला असतो. तेव्हां मुरवतीखातर हातीं आलेली जमीन त्यांना सोडावी लागते. कुणबी तेथून जबरदस्त भिडस्त. एखादा बेमुरवत निघाला, तरी लिहिण्यावाचण्याचें अंग कमी असल्यानें, व कचेरीकोर्टांचे अडाखे माहीत नसल्यानें, त्याला जमीन जिंकणें कठीण पडतें. 'ज्या गांवच्या बोरी त्याच गांवच्या बाभळी.' तेव्हां असें हमेष घडतें कीं, वेळेला ह्या दोन्ही वर्गांच्या सावकारांवर कुळें कुरघोडी करतात; आणि त्यांचें व्याज दिसतांना जरी जबर दिसलें तरी

कुळें तितकें देत नाहींत, व तेही भांडणाचें तोंड काळें म्हणून माघार घेतात. दोन्ही वर्गांची संख्या इतकी अल्प आहे कीं ती जमेंत धरण्यासारखी नाहीं. कारण पुष्कळ दिवसांपासून दाक्षिणात्यांचा वैश्यवृत्तीकडे बहुतेक ओढा नाहीं म्हटलें तरी चालेल. गेल्या हजार पांचशें वर्षांत विद्वान् व्हावें, राज्यकारभार हांकावा, जमेदार बनावें, स्थावर संपादावें, ह्या व ह्यांसारख्या उद्योगाची दक्षिणेंत अतोनात चहादारी झाली; आणि तागडी–माप हातीं धरावें व एकाचे दोन करावे, असल्या वाणिज्याला लोक तुच्छ मानूं लागले. ब्राह्मण किंवा क्षात्रधर्मांना काय तो मान मिळूं लागला; आणि वैश्यवृत्ति मानहीन झाली. हे दोन्ही रोजगार ताजे नव्हत. त्यांच्या उत्पन्नांचा झरा नसतो, पूर असतो. शेती, इनाम, वतनें, सालचाकरी वगैरेंचें उत्पन्न वर्षांतून एकदां हातीं चढावयाचें. म्हणून इकडे नेहमीं दाम दुष्काळ राहून, देणें घेणें व व्यापार परप्रांतियांचे हातीं गेला; आणि गुजरात वगैरेच्या मानानें व्याजाचा दर नेहमीं जडीप राहिला. परंतु जिन्नसांच्या विशेषतः शेतमालाच्या व गांवहुन्नराच्या किंमती स्वस्त्या रहात गेल्या व जनता द्रव्यहीन राहिली, तरी वतनाचा मान ढळला नाहीं. अजूनसुद्धां खेड्यांत चार मंडळी जमली तर मानाची जागा, पानसुपारी अगोदर ब्राह्मणाला, साधूंना व वतनदारांना मिळते, मग ते दोन प्रहराला कां महाग असेनात; आणि त्यांच्या मागून शेटसावकारांना मान मिळतो. गांवपंचायतींत चांभार, महारांना बोलावलें नाहीं तर ते रुसतात. पण असला हक्क त्यांवर कर्ज असणाऱ्या शेटजींना सांगतां येत नाहीं. असल्या सामाजिक कल्पनांमुळें आमच्या लोकांनीं पूर्वीपासून व्यापारांत मन घातलें नाहीं, व नाण्याचें प्राबल्य ओळखिलें नाहीं. तरी पण सराफी करणारे कांहीं ब्राह्मण नाईक होते; आणि सावकारी, दुकानदारी करणारीं थोडीं फार इतर जातींचीं घराणीं होतीं. ह्या लोकांच्या पिढ्यानूपिढ्या गांवांत झाल्यामुळें व त्यांना कमी अधीक वतनवाडी असल्यामुळें ते गांवच्या वतनदारांत मोडत, आणि कुळें शाबूत ठेवून त्यांना आपला धंदा करावा लागे. कुणब्याच्या भिडस्त-

पणानें त्यांनाही व्यापिलें. त्यामुळें त्यांना कुळांची भीड पडे, आणि पाण्यांत राहून माशांशीं वैर करावें कीं नाहीं ह्याचा विचारच पडे. मागच्या राज्यांत चाललें तसें पुढेंही चालेल, ह्या भिस्तीवर ते बसले, आणि समयानुरूप नवीन व्यापारी कसब ते शिकले नाहींत. दक्षिणी लोक परधारजिणी असल्यामुळें आणि मारवाड्यागुजरात्यांइतकी हिंमत, आंगमेहनत, व्यवहारदक्षता, बेमुरवत, काटकसर, व पोटांत शिरून आपला मतलब जाऊं न देण्याची शिताफी त्यांना नसल्यामुळें मारवाडी, गुजराती व्यापाऱ्यांनीं पथारी पसरल्याबरोबर खास दक्षिणी सावकारांना व दुकानदारांना आपला गाशा गुंडाळावा लागला. दाक्षिणात्यांची जी दुकानदारीची घडी मोडली ती मोडलीच; आणि आतां दक्षिणी सावकार व दुकानदार बिंयाला सुद्धां उरले नाहींत.

खेड्यांतले उदमी व मोठ्या भांडवलाचे सराफ हे आतां बहुतेक ठिकाणीं मारवाडी, गुजराती व कित्येक ठिकाणीं लिंगायत आहेत. परदेशी व इतर जातींचे दुकानदारही क्वचित् आढळतात. बहुतेक दुकानदार मालाच्या खरेदी–विक्रीबरोबर व्याजबट्टाही करतात. त्यांच्या दुकानदारीचें व सावकारीचें वर्णन वर आलेंच आहे. भावांत, वजनांत, हिशेबांत, सारांश जेथें गिऱ्हाईक गांठेल तेथें त्याला हे चेपतात. दुकानचें खातें फुगलें म्हणजे हे व्याजमुद्दलासुद्धां रकमेचे कर्जरोखे किंवा गहाणरोखे करून घेतात, आणि गहाणाची बाकीही चढली म्हणजे कायमचीं किंवा नामधारी खरेदीखतें करून घेतात. स्थावराशिवाय लोकांत मान नाहीं. ह्यामुळें ह्यांची नजरही स्थावर संपादण्याकडे असते, आणि मण सहा पायल्या खावटीवारी किंवा चाळीस पन्नास रुपयांच्या खात्या अगर कर्जावारी वाण्यांनीं मोठाल्या जमिनी, हवेल्या काबीज केल्याचीं उदाहरणें पुष्कळ सांपडतात. गहाणव्यवहाराचीं खरेदीखतें घेऊन हे जमिनीचा भाडेपट्टा तिऱ्हाइताच्या नांवानें करून घेतात. त्यामुळें कुळाला खरा व्यवहार शाबीद करण्याची पंचाईत पडते. हे जागेवर असतात, तेव्हां त्यांना कुळांना वेळच्या वेळीं तगादा करण्याला किंवा रास होत अस-

तांना खळ्यावर जाण्याला सांपडतें. ह्यांचें तोंड फार मोठें असतें. तें इतकें कीं, वेळेवर हे रुपयाला रुपया देखील व्याज किंवा नफा मारतात. त्यामुळें कमी भांडवल असलें तरी थोड्याच अवकाशांत त्यांची पथारी वाढून ते मोठ्या दुकानदारांत किंवा सराफांत मोडूं लागतात. दक्षिणेंत कायमचीं घरेंदारें करीपर्यंत मारवाडी गुजरात्यांनीं मारवाड–गुजरातेकडे डोळे ठेवून, इकडील लोकांच्या हितानहिताकडे लक्ष न देतां धंदा केला; आणि लोकांचा भोळेपणा, अदूरदर्शित्व व सरकारी कायदे ह्यांचा रेलचेल फायदा घेतला. ह्याचा सर्व दोष वाण्यांवरच लादतां येत नाहीं. कारण आमच्यासारखे घमेंडी, धौताल, व कूपमंडूक गिऱ्हाईक मिळाल्यावर कोणीही काटकसरी व व्यापारी नजरेचे लोक असते, तरी त्यांनीं आपलाच मतलब साधला असता. आतां हे लोक दक्षिणेंत स्थाईक झाल्यामुळें गिऱ्हाईक कायम ठेवण्याची व तें फारसें असंतुष्ट न करण्याची प्रवृत्ति त्यांच्यामध्यें निर्माण होणें साहजिक आहे. मोठाले सावकार गहाण जमिनी परत कुळांनाच लावतात, आणि खंड किंवा व्याज येतें तोंपर्यंत कुळांना कोर्टांत ओढीत नाहींत. शेतकी कायद्याचें कलम ६४ व ६७ प्रमाणें कुळांना पावत्या दिल्या पाहिजेत, सालअखेर खातेंउतारा दिला पाहिजे, आणि खातें–वही देऊन तिच्यांत जमाखर्च टिपून दिला पाहिजे. असें न केलें तर १०० रुपयेपर्यंत दंड होतो. ह्याप्रमाणें चालणारा हजारांत एक सांपडणें दुरापास्त होतें, आणि हा कायदा पास होऊन तीन तपें झालीं तरी 'मागील भरणा, पुष्कळ वसूल, पावती नाहीं.' इत्यादि कुळांच्या पूर्वींच्याच तक्रारी अजून कायम आहेत. अंधेरांत देणें घेणें करणाऱ्या अब्रुदार कुळांची संख्या फारशी नाहीं. तेव्हां चावडींत चारचौघांसमक्ष देणें घेणें केलें, आणि कूळ–पावतीसारखी वही करून तिजवर सरकारी वसुलाप्रमाणें गांवकामगारांकडून वसल मांडून घेतला, व त्यावर सावकाराची सही घेतली, तर खेड्यांतील कुळें बुडणार नाहींत. पैसा किंवा माल उचलतांना कूळ नडलेलें असतें, हें कबूल केलें तरी वसूल देतांना तें नडलेलें नसतें. मग पोंच मांडून

घेतल्याशिवाय त्यानें वसूल कां द्यावा ? खेड्यांतील उदमी म्हणजे लोकांचे सराफ, आडत्ये आणि आप्त होत. लोकांचें सुखदुःख, गरिबीहरिपी समजणें जितकें त्यांना शक्य आहे तितकें बिछाइत्यांना नाहीं. दोन प्रहर रात्रीला कोणाला गरज लागली तर त्यांच्याकडेच गेलें पाहिजे. आपला माल दूर देशीं नेऊन विकणें खेडवळांना शक्य नसतें. तो ते बहुतेक गांवचे वाण्यांनाच घालतात. खेड्यांतले बहुतेक लोक त्यांचे देणेदार असतात. हें सर्व मनांत आणून ते जर फुंकून खातील तर त्यांचाही धंदा चालेल, आणि लोकांनाही तकवा राहील. देशांत व्यापार-वृद्धि झाल्यामुळें अलीकडे खेड्यांतील मोठमोठ्या व्यापाऱ्यांनीं शेतकऱ्यांशीं व्यवहार आंखडता घेतला आहे; आणि ते आपलें भांडवल, आडत, जवाहीर, गिरण्या वगैरे सारख्या व्यापारांत घालूं लागले आहेत. परंतु झटपट श्रीमंत होण्याची हांव जर उदमी आंवरून धरतील, आणि रास्त नफा ठेवून धंदा करतील, तर खेड्यांची स्थिति सुधारून त्यांच्या भराभटीचे तेही वांटेकरी होतील. लोक सधन झाले म्हणजे दुकानदारी वाढते व त्यांची संपत्ति अनंतरूपांनीं व्यापाऱ्यांच्या घरांत शिरते. तसेंच हे लोक जर चोख हिशेब ठेवतील, तर त्याच्या व्यवहारासंबंधानें जिकडे तिकडे जें संशयाचें काहूर उठलें आहे तें खात्रीनें कमी होईल. पिकें खंडून घेणाऱ्या देशी, परदेशी व्यापाऱ्यांच्या व्यवहाराबद्दल जरूर विचार केला पाहिजे. ह्यांना द्रव्यबल व माणूसबल असल्यामुळें ह्यांच्या केवळ फूत्कारानें शेतकऱ्यांना कमींत कमी चौथाईला मुकावें लागतें. ही गोष्ट कांहीं लहानसान नव्हे. ह्याबद्दल लोकांत विचारजागृति होऊं लागली आहे, आणि हे व्यापारी प्रतिष्ठित असल्यामुळें ह्या बाबतींत उभयतांमध्यें फायदेशीर व सरळपणाचा मार्ग निघण्याची आशा आहे. पण ज्यांकडे डोळेझांक करणें आत्मघाती आहे, अशा पठाण व पंजाबी व्यापाऱ्यांबद्दल काळजीपूर्वक विचार चालूं असल्याचें ऐकिवांत नाहीं.

मराठशाहींतल्या पडत्या काळांत जिकडे तिकडे गृहकलह माजला, आणि संस्थानिक व सरदार ह्यांस आप्तांचा देखील भरंसा येईनासा झाला;

तेव्हां स्वसंरक्षणार्थ त्यांच्यामध्यें अरब लोकांना शिपाईवेषानें चाकरीस ठेवण्याचा प्रघात पडला. त्यांचा पगार मोठा, आणि खर्च कंजूषपणाचा असल्यामुळें ते अल्पावधींत व्याजबट्टा करूं लागले. खानदेशांतील त्यांच्या व्यवहारासंबंधानें क्याप्टन ब्रिग्ज ह्यांचा रिपोर्ट मनन करण्यासारखा आहे. थाळनेर, बेटावद, सिंधखेड, सोनगीर, सुलतानपूर, आणि नंदुरबार ह्या परगण्यांत खेड्याखेड्यांनीं दोन अगर तीन अरबांचें ठाणें असे; आणि पुष्कळ दिवसांपूर्वीं दिलेले कर्जाबद्दल ते दरमहा दरशेंकडा ८।१० टक्के व्याज घेत. दुबळ्या खेडवळांवर जुलूम करण्यांत आणि त्यांचेकडून सोनेंनाणें, जडजवाहीर जबरीनें काढण्यांत ते आपलें शौर्य व शक्ति खर्चीं घालीत. त्यांच्या पेंढारीपणास कंटाळून अखेर कंपनी सरकारनें त्या सर्वांला खानदेशांतून सुरतेस नेलें, आणि जहाजांत घालून अरबस्तानांत रवाना केलें. ही कुलकथा सांगण्याचें कारण इतकेंच कीं, शंभर वर्षांपूर्वीं अरबांनीं ज्याप्रमाणें गांवढेकऱ्यांना हैराण केलें तसेंच आज पठाण व पंजाबी व्यापारी दक्षिणप्रांतीं करीत आहेत. पठाणांना रोहिले, काबुली, पेशावरी, खान, अफगाण, कंदाहारी, पशतुनी, पेशनी म्हणतात. ते आणि पंजाबी व्यापारी हे विशेषतः रोहिले, काबुली, भरेकरी किंवा दमकोंडे, ह्या नांवांनीं प्रसिद्ध आहेत. असाम्यांकडे हे लोक पैसे मागावयाला गेले, आणि त्यांनीं म्हटलें दम धर म्हणजे ते थोडा वेळ नाक दाबून धरतात; म्हणून दमकोंडे हें त्यांचें नांव पडलें. ते लालबुंद, सुरेख, पिळदार, सशक्त, सतेज, पुष्ट, उग्र व उंचे पुरे असतात. डांगाणांतले कोळी ठाकर म्हणतात कीं, ते साहेब लोकांचे कोणी तरी असावेत, आणि त्यांना सरकारचा हुकूम असावा; त्याशिवाय ते मारपीट करून देणें वसूल करतेना. असो. ते इकडील लोकांना कस्पटाप्रमाणें लेखतात, आणि लोकही त्यांच्या शीघ्रकोपी व क्रूर स्वभावाला आणि शरीरसामर्थ्याला भिऊन त्यांच्यापासून जरा लांबच राहतात. मराठी म्हण अशी आहे कीं, ‘सावकाराचे उरावरून आणि सरकारचे पाठीमागून जावें.’ पण दमकोंड्याचे

संबंधानें मात्र ही म्हण उफराठी दिसते. कोठें कोठें सावकार लोक ह्यांना रखवालीसाठीं किंवा तगाद्यासाठीं चाकरीस ठेवितात. हे लोक बहुधा व्याजबट्ट्याचा धंदा करितात, आणि कांहीं उधारीनें कापड, सुऱ्या, चाकू, कात्री, सुरमा, औषधी, खोटे दागिने, खडे, नोटा वगैरे विकतात. मेंढवाड्यांत जसा लांडगा उतरावा तसा इकडील लोकांत पठाण, अशी स्थिति आहे. ज्याला कोठेंही कर्ज किंवा उधार माल मिळत नाहीं, तें पठाणांचें गिऱ्हाईक. परंतु अलीकडे बरे म्हणविणारे शेतकरी व किरकोळ उदमीही त्यांजपासून कर्ज घेऊं लागले आहेत. ते तारण किंवा दस्तैवज घेत नाहींत, आणि हंगामापर्यंत वाट पाहण्याचें कबूल करतात. त्यांमुळें गिऱ्हाइकाला बरें वाटतें, आणि मग रुपयाला दरमहा एक तें चार आणे सुद्धां व्याज किंवा नफा देण्याचें तें कबूल करतें. सरासरीनें त्यांचें व्याज दरमहा दर रुपयाला दोन आणे पडतें. यदाकदाचित् त्यांनीं दस्तैवज करून घेतला तर ते त्यांत कर्जाचे तिप्पट रकमेचा भरणा दाखवितात, आणि स्टँपाचा खर्च, मनोती, महिन्याचें व्याज, धर्मफंड अगाऊ कापून घेऊन बाकी रक्कम कुळाच्या पदरांत टाकतात, असा चहूंकडे बोभाटा आहे. एका रोहिल्यानें कोर्टापुढें साक्षींत सांगितलें कीं, मुसलमानांजवळून व्याज घेणें निषिद्ध असल्यामुळें आम्ही मुसलमानांकडून व्याज घेत नाहीं. इकडील मुसलमानांना ही ढील मिळते हें त्यांतलें त्यांत बरें आहे. पण तिचा सर्व वचपा ते हिंदूंवर काढतात. उगवणीसाठीं त्यांना स्टँप, रजिष्टरकचेरी, किंवा कोर्ट यांची गरज लागत नाहीं. वायदा भरला कीं, दोन तीन जवान पलटणींतल्या शिपायासारखा पोषाक करून चाबूक सोटे घेऊन निघतात, आणि तांबडें फुटलें नाहीं तोंच ते आक्राळ विक्राळ स्वरूपानें कुळाच्या दारांत दत्त म्हणून उभे राहतात. फिरून ये म्हटलें कीं, आपल्याभोंवतीं चक्कर देऊन तेथेंच उभे, दम धर म्हटलें कीं नाक दाबलेंच. कुळाला उसासा म्हणून ते टाकूं देत नाहींत, व बायकांना पाण्याला किंवा पुरुषाला कामाला देखील घराबाहेर निघूं देत

नाहींत. वेळेवर ते त्यांना गैरकायदा अटक किंवा मारपीट करतात, बायकांची अब्रू घेण्याची किंवा तोंडांत थुंकून धर्म बाटविण्याची अगर गांवच्या मारुतीला उपटून बांधून नेण्याची दहशत घालतात. कोणत्याही लोकांत बायका आणि धर्म ह्या बाबी किती नाजूक आहेत आणि त्यांप्रीत्यर्थ लोक जिवाचीसुद्धां पर्वा करीत नाहींत हें नव्यानें सांगितलें पाहिजे असें नाहीं. तेव्हां बायकाधर्मांवर मजल येऊन बेतली म्हणजे वेळेला गांवचा तिऱ्हाईत पैसा भरतो, आणि पठाणांचे मगरमिठींतून देणेदाराला सोडविण्याचें पुण्य जोडतो. त्यांची जरब इतकी बसली आहे कीं, लोक हें सर्व निमूटपणें सहन करितात, हूं का चूं करीत नाहींत, किंवा फिर्याद देण्याला अगर त्यांचेविरुद्ध पुरावा करण्याला धजत नाहींत. त्यांच्या छळाच्या व अब्रू घेण्याच्या भीतीनें कोठें कोठें भेकड गांवढेकरी परागंदा झाल्याचीसुद्धां जनवार्ता आहे. हे एका वर्षाचे आंत रुपयाला रुपाया काढतात. त्यावरून लोक किती बुडत असतील ह्याची अटकळ कोणालाही येण्यासारखी आहे. यांच्यासंबंधानें दुसरी गोष्ट अशी आहे कीं, ह्यांतले पुष्कळ पक्के गुन्हेगार असतात. ते उचलेगिरी करतात, दरोडे घालतात, जुवा खेळतात, गैरकायदा दारू व अफू विकतात, खोटे दागिने, खडे, व नोटा चालवितात, आणि धन्यापाशीं पहिल्यानें साक वाढवून पुढें त्याचे तगाद्याचे पैसे गट्ट करतात. गांवच्या लुच्यासोद्यांची व ह्यांची चांगली दोस्ती असते. सडेफटिंग असल्यामुळें ते व्याभिचार करतात, व डांगाणाचे जंगलांत ते दारूही गाळतात. सारांश, दमकोंड्यांचा व्यापार जळजळाटाचा आणि चालरीत लबाडीची आहे[१]. ह्या मुलखांत ते पापपुण्याची भीति

१ असाम्यांना छळून ठोकून त्यांनीं पैसे काढून घेतल्याचीं उदाहरणें वाटेल तितकीं मिळतील. परंतु पैशासाठीं ते कोठवर गळ टाकतात याचा एक चमत्कारिक मासला खानदेशांत चोपडें येथें १९०८ सालीं पहाण्याला मिळाला. तेथील पठाणांनीं एका कुट्टिनीमार्फत एका बारा तेरा वर्षांच्या हरदासणीच्या बापाला १५० रुपये देऊन तिच्याकडून नवऱ्याला काडी मोडून देवविली, आणि असा सौदा केला कीं, तिला लेणें, खाणें, पिणें द्यावें व तिनें कसब करून सर्व कमाई त्यांना द्यावी !

न धरितां निव्वळ पैसे कमावण्याला आले आहेत. माल किंवा पैसा पेरण्यापुरती मुशाफरी करावी, व मुलखाला जावें आणि सुगीचे दिवसांत परतून गच्च तुंबडी भरून पुन्हां घरचा रस्ता सुधारावा, हा त्यांचा सध्यांचा क्रम आहे. ही तैमुरलंगी किती दिवस चालू ठेवावयाची ह्याचा निकाल लावण्याचें सामर्थ्य लोकांपेक्षां सरकारला आहे.

# कुणबी.

कुणबिकीचीं अवजारें, जनावरें, खताचे प्रकार, शेतकुंपणें, कुणबी पोशीत असलेले बलुत्येआलुत्ये व भटक्ये यांची संख्या इत्यादींचा विचार केला ह्मणजे आमची कुणबीक उमाप रानाच्या उदंड भरंशावर थाटली असावी अशी पाकळी बसते. "जातीजातींचे चाळे" वर्णन करितांना **तुकोबांनीं** " हेकड कुणबी वाटा मोडी " असें म्हटलें आहे. अव्वल इंग्रजींतल्या मराठी शाळेंत शिकलेल्या एका ऐंशी उलटलेल्या गृहस्थानें त्या वेळचा नीतिपाठ म्हणून दाखविला; तेव्हां 'ज्यानें त्यानें आपली जमीन वहीत करावी, आपल्या जमिनीबाहेर वहीत करूं नये,' अशी त्यांतील एक नीति त्यानें म्हणून दाखविली. यावरून हें उघड होतें कीं, पडितांत तर कुणबी नांगर फिरवीच पण वाटा मोडून देखील तो कोठेंही रान काढून वहीत करी. मुसलमानी व मराठी अमलांत जरी गांवची पहाणी होऊन मिरासदार, उपरी व त्यांच्या जमिनी ठरून गेल्या होत्या, तरी सुद्धां कमाल आकार बांधून काळी–पांढरी गांवचे दिमतीस दिल्यामुळें गांवांतल्या एखाद्या कुणब्याला काळी आजिबात नसली किंवा त्याच्या खटल्याला निपुर आली तर गांवकरी दुसऱ्याच्या शेतांतून त्याला हरप्रयत्नानें जमीन मिळवून देत आणि त्याची व त्याच्या मुलाबाळांची बेबुदी करीत. पूर्वींच्या राजवटींत दर्याची व जंगलची अटक सैल होती, आणि समुद्र व रान ह्यांवर सरकारी जाबता नव्हता असें म्हटलें तरी चालेल. नांगरापासून तों उंसाच्या चरकापर्यंत बहुतेक शेतीचीं हत्यारें व सनगें लांकडी आहेत, आणि तीं नवीन किंवा दुरुस्त करितांना कुणब्याला सुतारलोहारांला लांकूडसरपण पुरवावें लागतें. कारूनारूंच्या हत्यारांतही इतर जिनसांपेक्षां लांकडाचा खप अधिक दिसून येतो. तेव्हां सर्वांनाच लांकडाचा पुरवठा पुष्कळ आणि थोडक्यांत मिळण्याची सोय असली पाहिजे. सर्वत्र मुख्य खत गोव-

राचें आहे. शेणकुराचें मुबलक खत मिळण्याला पुष्कळ लक्ष्मी उर्फ गुरें बाळगलीं पाहिजेत. तीं सर्व शेताच्या मालावर जोगवणें अशक्य. "घरचा चारा आणि रानचा वारा" बरोबर नाहींत असें म्हणतात. इतक्या गुराढोरांना तोंड घालण्याला मोकळें जंगलच पाहिजे. शेतीला कुंपण कांटेरी झुडपांचें असतें. तीं सर्व वहिती जमिनींत मिळत नाहींत. तीं जंगलांतून आणिलीं पाहिजेत. जंगलाशिवाय पुरेसें सरपण कोठें सांपडणार ? महारांचें काम जमेदारांना जळण पुरविण्याचें होतें, व त्याबद्दल त्यांना भाकर किंवा जेवण मिळे. गुऱ्हाळांत चुलांगणाला महारानें सरपण पुरवावें व त्याबद्दल त्याला ऊंस, दोन ढपा गूळ व शेवटचें आधण मिळतें. हें सरपण जर मालकाच्या शेताचेंच असतें तर महाराचा हक्क इतका मोठा नसता. अर्थात् महारांना काय आणि इतरांना काय जंगलांतून सरपण घेण्याची मनाई नव्हती. वारली, कातकरी वगैरे जंगली जाती 'जंगलांत जाऊन सरपण, गवत आणणें, जंगलांतील कंद-मुळें खाणें' असा आपला धंदा अजून सांगतात. त्याचप्रमाणें आज-मितीला पहाडाचे आसपासचे शेतकरी व मजूर आपले घरांतला दाणा वाढला ( संपला ) म्हणजे जंगलांत जातात; व झाडपाला, फळें, कंद आणून खातात. रासमाथ्याला बलुत्येआलुत्ये आणि अठरापगड भिकार हक्क म्हणा कीं भीक म्हणा मागून आज हजारों वर्षें आपली सालबेगमी करून ठेवीत आहेत. कुणब्याला जर काळी इतकी कमी असती कीं, तिच्यांतून त्याची स्वतःची सालबेगमी निघणें दुरापास्त, तर ह्या वहिवाटीला कांहीं तरी आळा घालण्याचा प्रयत्न तो करता. भिकाऱ्यांच्या टोळधाडीमुळें आपल्या पोटावर पाय पडतो असें बलुत्याआलुत्यांना आढळतें तर निदान ते तरी त्यांना आडवे होते. ह्या सर्व गोष्टींवरून असें स्पष्ट होतें कीं, कुणबी थोडा व काळी फार असल्यामुळें बळीराजानें दुनियेचा भार उचलला. त्यानें वाटेल तेथें वाटेल तितकी काळी काढावी व पिकवावी, तिच्यासाठीं लागेल तो रानमाल उपसावा आणि हवी तितकी लक्ष्मी बाळगावी,

इतरांनींही वाटेल तसा रानपसारा आणि मीठ घ्यावें व कुणब्याच्या पोटांत पोट आणि घांसांत घांस काढावा; परंतु कोणीही—माणूस काय किंवा जनावर काय—उपाशीं मरूं नये अशी व्यवस्था ठरली. अव्वल इंग्रजींतही काळी फार व कुणबी थोडा अशी स्थिति होती, आणि हें आंधळें गारूड पूर्वींप्रमाणेंच चाललें होतें. जमिनीची पैमाष झाली, मीठ-खातें निघालें आणि सरकारानें जंगल ताब्यांत घेतलें, तेव्हांपासून कुण-ब्याचे व त्याजवर अवलंबून राहणाऱ्या शेंकडों जंगली व भटकणाऱ्या जातींचे हात पाय आंखडले. प्रपंच भागत नाहीं म्हणून वाटेल तेथें फुकट-फाकट किंवा वेळेला पैसे देऊनही वहीत करीन; आऊतकाठी, कुपाटी, राब, ताली, विहिरी, घरें वगैरेसाठीं जंगलांतून लांकूडफाटी, ढाळ्या, पाचोळा, गाटागोटा बिनपरवानगीनें अगर कर न देतां आणीन; किंवा मर्जीप्रमाणें जंगलांत गुरें चारीन असें कुणबी आज म्हणेल तर चालत नाहीं. समुद्रकांठच्या किंवा जंगली जमाती म्हणतील कीं, मीठ किंवा रानमाल वाटेल तसा विकून पैसे करूं तर सोय नाहीं. पाश्चात्य कला-वृद्धीमुळें पुरातन धंदे बहुतेक मोडले आणि जो उठला तो कुणबी बनला. शिवाय प्रजाही वाढली. त्यामुळें लागण करण्याजोगी बहुतेक नाकीर्द-सार जमीन वहीत झाली आहे. तेव्हां हवी तितकी काळी, खारी आणि मोकळें रान हा जो आमच्या आडमापी कुणबिकीचा अनादि धर तो सुटला.

समुद्राची व जंगलाची बंदी झाल्यापासून त्यांची सर्व वर्दळ लागण जमिनीवर लोटली. सरपण हजारों वर्षें फुकट मिळत असल्यामुळें त्याच्या खर्चाचा सुमार कोणालाच राहिला नाहीं. आपल्या धंद्यासाठीं व प्रपंचासाठीं कुणबी आपापल्या शेतांतलीं झाडें तोडूं लागले. जळण विकत घेण्याची संवय नसल्यामुळें तमाम गांवकरी कुणब्या-जवळून तें मोहबतीनें मागून आणूं लागले. झाडें कमी होत होत गेलीं आणि त्या मानानें नवीन लागवड झाली नाहीं. त्यामुळें सरपणाला किंमत येऊं लागली. भील, रामोशी, महार, मांग वगैरे

परपिंडलोलुपांना फुकट तोडून आणिलेलें सरपण विकण्याचा एक रोजगार झाला. होतां होतां गोंवऱ्यांचा उपयोग खताकडे करण्याच्या-ऐवजीं कुणबी त्या जाळूं लागले, आणि सर्व जाती कुणब्यांचीं गुरें सुटलीं कीं त्यांच्यामागें शेण धरण्याला आणि रानांत गोंवऱ्या वेंचण्याला जाऊं लागल्या. शेत कुपाटी व चाऱ्याचीही हीच कथा. खेड्याच्या सरकारी बंगल्याच्या कंपौंडांतील झाडांचा व गवताचा, सरकारी जागेवरील तरवडाचा व शेण्यांचा देखील लिलांव होतो. पण कुणब्याच्या तरवड केकताडावर महारमांग ताव मारतात, व त्याच्या शेतांत झुडूप दिसलें किंवा गवताचा ठोंम उगवला कीं महारपोर व भिकार तें नेतें. वास्तविकपणें गायरानें, गांवचारण, शेताच्या बाजूच्या रस्त्याच्या कडा ह्यांवर कुणब्याचा अग्र हक्क; परंतु गांवचे सर्व अडाणी व भटकणारे लोक आपलीं जनावरें मोकार सोडतात, आणि कुणब्यांच्या जनावरांच्या वांट्याला तेथील गवत येऊं देत नाहींत. पट्टी भरतो कुणबी आणि वरिष्ठ जाती शिवाय करून सर्व बलुत्येआलुत्ये व भटक्ये त्याच्या शेतांतलें गवत-चाटूक काढतात, रात्रीं चोरतात, आणि त्यावर आपलीं गुरें पोसतात किंवा त्याचे टक्के करितात. गाढवा-डुकरांना कधीं दावें नसतें, व त्यांना उचलून चारा कोणी टाकीत नाहीं. त्यामुळें परीट, कुंभार, पाथरट, वैदु वगैरेंचीं गाढवें आणि वडार, कोल्हाटी यांचीं डुकरें ह्यांची शेतांना नेहमीं वर्दळ लागते. तेव्हां आज स्थिति अशी आहे कीं, कुणबी ओरडतो माझे बैल उपाशीं मरतात, १०-२० रुपये शेंकड्याप्रमाणें मला कडबा विकत घ्यावा लागतो, दोन दोन कोस पायपीट केली तरी कुऱ्हाडीच्या दांड्याजोगें सरळ किंवा हळसाजोगें बांकदार लांकूड भेटत नाहीं; आणि बाकी सर्व दुनिया शेतांतील चारा, तरवड, केकताड, फांटीं, फुकट म्हणून बेसुमार लुटते, नव्हे कनिष्ठ जाती त्याचे पैसे करतात, आणि हा कपाळ झोडतो कीं, चाऱ्यासरपणाचा दुकाळ पडला. मुलकी खात्याचा ठराव नंबर ५ तारीख २-१-१९१३ अन्वयें मुंबईसरकार लोकांना सवलती

देऊन झाडें लावण्यास उत्तेजन देत आहे. चाऱ्याचा संचय कसा करावा हें कोडें उकलण्यांत सरकार व लोक गुंतले आहेत. परंतु जों-पर्यंत कुणब्याच्या मागचे हे भुंगे तोडून काढले नाहींत, तोंपर्यंत सर-कारच्या व लोकांच्या प्रयत्नाला ह्या कामीं यश येणार नाहीं. यावें कसें ? जमिनीच्या बाहेर अंकुर येण्याचा उशीर कीं तो खुडलाच. मना करावें तर जाळ सुडी, मार जनावर असल्या नुकसानीला पाचारण करावें. जोंपर्यंत अशी स्थिति आहे तोंपर्यंत कुणब्यानें तरी काय करावें ? आणि चाऱ्याचा व जनावरांचा संग्रह कसा करावा व त्यांचा विमा उतरण्याला तरी कोणीं पुढें यावें ? आतां काळी आंखली आहे, आणि वाटेल तेथें रान काढण्याला कुणब्याला मार्ग नाहीं. वांटणीमुळें शेताच्या चिंधोट्या चिंधोट्या झालेल्या आहेत. तेव्हां सबंध दुनियेच्या पोष-णाचें ओझें कुणब्याला झेंपेनासें झालें आहे. आणि " एक बळी हजार छळी " असें तो पाण्याच्या दर घोटास कुरकुरतो. पाटील–कुळ-कर्ण्यांचे ऐन जिनसी हक्क वजा केले, तसे महारजागल्यांचे सरकारनें केले नाहींत. त्यामुळें कुणब्यांना सबंध महारवाडा, रामोसवाडा, भिलाटी, कोळवण, मांगवण पोसावें लागतें. आम्हीं सरकारचें काम करितों असें, म्हणून कुणब्याच्या बोकांडीं बसून हे लोक त्याला लोळवितात. तसेंच दरसाल हजारों भिकार सहपरिवार कुणब्याला पोसावें लागतें. समुद्र, जंगल सुटें होतें, हत्यारांची मनाई नव्हती, तेव्हां हे लोक व भटक्ये जंगलावर, शिकारीवर व मिठावर थोडें फार पोट काढीत आणि पिकांना व ढोरांना उपद्रव करणाऱ्या पांखराजनावरांचा संहार करीत. जंगल-काळी आंखून कुणब्याला डांभलें त्याच वेळेला ह्या सर्वांना डांभून टाकावयास पाहिजे होतें. तसें न झाल्यानें कुणब्याच्या आयातीला मात्र बांध पडला; परंतु निर्गत कायम–नव्हे–जास्त वाढली. कुणबी म्हणत असतो कीं, पृथ्वीचा एक कोंपरा पिकला आणि तीन खकाण राहिले म्हणजे सगळ्या भोरड्या पिकलेल्या भागावर आदळतात. तशी त्याची गति झाली आहे, आणि माणसांजनावरांचीं सर्व खातीं–तोंडें शेतांवर येऊन पडलीं आहेत.

अलुतदार-बलुतदार नुसतें कुणब्यांचेंच काम करितात असें नाहीं, तर ते सर्व नारभाऊ-कारभावांचें जातिविशिष्ट काम फुकट म्हणजे पैसा अगर धान्य न घेतां करतात. तसेंच गांवची जबाबदारी वतनदारांत समाईक असल्यामुळें गांवांत कायम वस्तीला किंवा थोडा वेळ मुक्कामाला आलेल्यांचीं कामेंही त्यांना फुकट करावीं लागत व लागतात. जमीन अगर वतनी काम नसलेल्या मुसलमान रहिवाशांचीं व अतिथि-अभ्यागतांचीं कामें लोहार, सुतार, परीट, न्हावी, चांभार, आज मित्तीला सुद्धां फुकट करतात. पूर्वींच्या अमदानींत परगणेवतनदारांचे व ग्रामाधिकाऱ्यांचे कारूनारूंवर हक्क असत, आणि सरकारी कामगारांचीही त्यांना पुष्कळ वर्दळ लागे. तेव्हां कुणबी, कारूनारू, पै-पाहुणा आणि हक्कदार ह्या सर्वांचीं करावीं लागणारीं खासगी व गांवकीचीं कामें व द्यावे लागणारे हक्क हें सर्व जमेंत धरून आलुत्याबलुत्याचा निरख ठरला; आणि सगळे अडाणी मोकळे राहून समस्तांच्या योगक्षेमासाठीं तो एकट्या कुणब्यानें पुरा पाडण्याचा जो एकदां भार उचलला तो अद्यापि बिचारा वाहत आहे. पृथ्वी व समुद्र मोकळा आणि जंगल मिठाची सवलत, काळी मुबलक व नवट आणि कुणबी थोडा, अशा वेळीं हा धारा पडला. धारण स्वस्ती आणि सर्वांना पोटभर खाण्याइतका गांवोगांव दाणा शिल्लक असे, म्हणून आजपर्यंत कोणींही बलुत्येआलुत्ये व त्यांचीं कामें ह्यांचा हिशेब चुकून केला नाहीं. तशांत कुणबी मायाळू आणि भिडस्त व इतर सर्व काढू पडले. ह्या व असल्या अनेक कारणांनीं ह्या अगोदरच्या जड बोजांत आणखी भर पडली. आतां कारूनारूंच्या डोक्यावरील जमेदारी हक्क गेले; सरकारच्या सर्व खात्यांत सुधारणा होऊन त्यांचीं कामें हलकीं झालीं, व कित्येक कामें आजिबात वजा पडलीं. रयतवारी पद्धतीमुळें खातेदार किंवा कबजेदार कुणबी कारूनारूंच्या गांवकी कामाबद्दल सरकारला किंवा गांवाला जबाबदार नाहीं. व्यापारवृद्धीमुळें बरींच हत्यारें व जिनसा आयत्या मिळतात, किंवा कारूंच्या अडाणीपणामुळें विकत घ्याव्या लागतात. दाम सुकाळामुळें एनामेल, तांबें, पितळ, वगैरेंचीं भांडीं जास्त प्रचारांत आलीं आहेत.

जंगलबंदीमुळें असाम्यांना महार सरपण पुरविण्यास व मांग केरसुण्या, दोरखंड पुरविण्यास असमर्थ झाले आहेत. सुताराला व लोहाराला काम होऊन उरलेलें सरपण ठेवूं देणें नुकसानीचें झालें आहे. धान्याचे, चाऱ्याचे व लांकडाचे भाव कडकले आहेत. असें सर्व प्रकारें मन्वंतर झालें आहे. तरी सर्व कारूनारू आपले हक्क पूर्वींप्रमाणें उकळतात, इतकेंच नव्हे तर जास्तही उपटतात, आणि कुणब्याचा आडवा नाडा पडल्यामुळें तो चुंबित सर्वांची भरती करतो. कुणबिकीचें उत्पन्न उघडें असल्यामुळें आणि तोच प्रधान धंदा असल्यामुळें बळीराजा सर्वांचा पोशिंदा जो एकदां कधीं काळीं ठरला तो आतां ज्येष्ठ-आषाढांतील बैलाप्रमाणें उठवणी आला आहे तरी त्याचीं झटें कमी होत नाहींत. कुणबी व कारूनारू ह्यांजवळ तपास करतां असें समजतें कीं बलुतें, आणि आलुतें मिळून राशीचा शेंकडा २२ तें २५ मुख्य धान्य जातें. याखेरीज किरकोळ धान्य, भाजीपाला, गवत, काडी, सणवार, शिधा, वाढणीं, पंक्तीचा ठाव वगैरे. कुणब्याचा हात नेहमीं वर असतो, असें म्हणतात. ही माहिती मिळवितांना बहुतेक कुणबी ती देण्याचें नाकारीत आणि दिलदारपणानें म्हणत कीं, 'आपल्या हातानें दिलें मग त्याचा उच्चार कशाला पाहिजे !' यावरून असें वाटतें कीं, ते देतात त्यापेक्षां कमी सांगतात. कारूनारू तर खात्रीनें कमी सांगावयाचे. अशी ही दुहेरी छपवाछपव ध्यानांत आणली म्हणजे असा अंदाज बांधण्यास हरकत नाहीं कीं, आलुत्येबलुत्ये व भिकार कुणब्याचे देखत किंवा हातून त्याच्या उत्पन्नाचा कमकसर तिसरा हिस्सा घेऊन जात असावें, व चोरट्यांची तस्करगिरीची कमाई ह्या खेरीज असावी.

ह्या राज्यापूर्वीं मिरासदार उपऱ्यांची स्थिति कशी होती, तिच्यांत काय फेरबदल झाला आहे, उदमी हळकरी कुणब्याला कसे लुबाडतात, त्याला आपला माल बाजारांत कां विकतां येत नाहीं, इत्यादींचें वर्णन पूर्वीं आलेंच आहे. ह्या ठोकरींचा व त्यामुळें मागें लागलेल्या भगभगीचा परिणाम त्याच्या सांपत्तिक स्थितीवरच नव्हे तर देहस्वभावावरही झाला

आहे. आमच्यांत जे धनवान् झाले ते कुणबिकीवर झाले नाहींत. रोजगारधंदा, व्याजबट्टा, व्यापार करूनच त्यांनीं धनसंचय केला. ‘ दर्याची माती दर्याला आटते ’ ‘ बासा न राहे और कुत्ता न खाये, ’ असें कुणबी आजवर म्हणत आला आहे; आणि ओढगस्तपणाच्या दुर्गुणांना तो बळी पडला आहे. ‘कुणबीका बेटा और गहूंका आटा, पिटा उतना मिठा,’ असें सर्वांच्या अनुभवास येतें. ज्या कारूनारूंवांचून नडतें, अथवा जे कारूनारू अगर भिकार लोक बळजोरी किंवा नुकसान करतील अशी भीति असते, त्यांची भरती कुणबी मनसोक्त करतो. जेथें चाळयाचिपळ्या करून निभण्यासारखें आहे, किंवा ज्यांचें भय बाळगण्याचें कारण नाहीं अशा हक्कदाराचें काम घेऊनही त्याच्या तोंडाला पानें पुसण्याला तो कमी करीत नाहीं. त्यानें कधींही सावकाराचा धाक धरला नाहीं, व देण्याची पर्वा केली नाहीं. त्यामुळें देणें देण्याच्या कामीं कुणबी हातचा फार जड झाला आहे. कुणब्याकडून सारा वेळेवर येण्याची खात्री असती, तर शेतमाल किफायतीनें कुणबी विकीपर्यंत सरकार थांबतें, आणि पट्टीच्या हप्त्याच्या तारखा त्यापूर्वीं नेमतेंना. कुणब्याशीं व्यवहार निर्भीड मारवाड्यांनींच करावा असें म्हणून दक्षिणी सावकारांनीं तोंड फिरविलें, व मारवाडी आतां म्हणतात कीं, कडव्या रोहिल्यांची सावकारी खरी. जसें ज्याचें नेट किंवा लुच्चेगिरी तसा कुणब्याजवळून पैसा निघतो. थापडवाईक सावकाराला किंवा जमीनदाराला कुणबी कुळें चांगलाच झोका देतात. रोख खंड कबूल न करतां त्यांच्या जमिनी ते बटाईनें ( वांट्यानें ) घेतात. ‘बटाई म्हणजे लुटाई.’ शक्य तितकी मेहनत ते आपल्या स्वतःच्या शेतांत करून फावला वेळ बटाईच्या शेताकडे लावतात, आणि स्वतःच्या शेतावरीलसुद्धां खर्चाच्या सर्व बाबी दुसऱ्याच्या शेतावर घालतात. उदाहरणार्थ, बटाईच्या शेतांत गुरें चारण्यासाठीं पडीत जास्त टाकावयाचें, त्यांत कोंब फुटल्यापासून तों पार खळें संपेपर्यंत आपले बैल चारावयाचे, धान्य हुरड्यावर आलें कीं, घरच्या सर्व माणसांचें व पै-पाहुण्यांचें पोट त्यावर काढाव-

याचें; बलुत्ये, भिकार वगैरे सर्व हक्क, दानधर्म त्यावर भागवावयाचे, आउत काठी, सरपण यांसाठीं त्यांतील झाडें तोडावयाचीं, आपल्या शेताचें राखण खंबीर करण्यासाठीं वेळ पडल्यास बटाईचें शेत मोकळें टाकावयाचें, व इतक्यावरही ताण म्हणजे आपण बायकापोरांनिशीं चोरवेल तितकें धान्य चोरावयाचें आणि अखेर मालाचा मोधळा ( जाड ठोंसर धान्य ) मालकाच्या हातीं लागूं न देतां अकणनिकण कालवून बटाईचें किंवा मक्त्याचें धान्य त्याच्या माथीं मारावयाचें ! कुळाचें नातें आहे तोंपर्यंत गरिबी गाऊन आणि पहिल्यापहिल्यानें भलाई दाखवून कुणबी आपल्या सावकार जमीनदाराकडून पुष्कळ रोखीची व धान्याची उचल करतात. अशा रीतीनें कुणब्याशीं पालथा रोजगार करून तोंडघशीं पडलेले पेन्शनर बरेच दिसून येतात. 'गोगल गाय आणि पोटांत पाय.' कुणब्याच्या शब्दावर किती भरंवसा ठेवावयाचा, त्याची खरी खोटी नड कोणती, तो कशांत गोता देतो व त्याजकडे रुतलेला पैसा कसा काढावयाचा हें एक भलें मोठें शास्त्र आहे, व तें अनुभवानें येतें. पुष्कळांना त्याचा गंध नसतो. शेतींत भांडवल गुंतवून शेंकडा ३।४टक्केसुद्धां व्याज सुटत नाहीं, उलट सारा पदरचा द्यावा लागतो असें अहमदनगर जिल्ह्यांतले पुष्कळ नव्या थळीचे पांढरपेशे लोक कुरकुरतात. ह्यामुळें मोहबतीच्या लोकांचें हलक्या व्याजाचें भांडवल शेतींतून दुसरीकडे जातें, व गांवांतली सधन लोकांची वस्ती उठते, हें कुणब्याला उमजेल तो सुदिन समजावयाचा ! दक्षिणी सावकाराशीं जर कुणबी इमानानें वागता व 'खाटकाला शेळी धारजिणी' हा न्याय खोटा करून दाखविता, आणि दक्षिणी सावकारही देशकालवर्तमान पाहून आपल्या परप्रांतीय व्यापारबंधूंजवळून आत्मसंरक्षणापुरतें व्यापारी कसब शिकते तर मारवाडी-गुजराती-रोहिल्यांच्या व्यवहारावर दाब राहता; आणि कुणबीही इतका कर्जबाजारी झाला नसता. कुणब्यांमध्यें दिवाळखोरी इतकी वाढली आहे कीं, खळ्यांतून सबंध वर्षाची चंदी फार थोड्यांच्या घरीं येते. सुमारें चार सहा महिन्यांची चंदी वागविणारे कुणबी बरेच आहेत. अगदीं महिन्या दोन महिन्यांची खावटी उरते असे कुणबी कशी बशी पाळीगोपाळी घालून शेत कोणा आप्तांच्या

माथीं मारून पोटासाठीं शहरांत जातात; व खळ्याच्या सुमाराला परतात, आणि खळें उलगडलें कीं परत शहरचा रस्ता सुधरतात. पावसाचा वर्ष दोन वर्षांनीं ठेवलेला टाळा आणि शहरचा ताजा रोजगार ह्यांमुळें ह्या शेवटल्या वर्गाची संख्या उत्तरोत्तर वाढत आहे. परंतु हे लोक चांगलें बीं धरून ठेवीत नाहींत, त्यांजवळ चांगलीं गुरें नसतात आणि ते जमिनीची मशागत करावी तशी करीत नाहींत, ही मोठी काळजी करण्यासारखी गोष्ट आहे. ह्याप्रमाणें दुसरीकडे पोट भरण्याचा मगदूर असणारे लोक खेडीं सोडून गेले म्हणजे खेड्यांत शेतीच्या वांट्याला बहुतेक सर्व प्रकारें टाकाऊ गचाळ लोक काय ते उरतात. ही दुसरी काळजी करण्याजोगी गोष्ट आहे. मोलकरीण ह्या शब्दाला प्रति–शब्द 'कुणबीण' हा आहे; ह्यावरून मजुरी हा कुणब्याचा उपव्यवसाय ठरतो. खरेंखरें अंग मोडून राब-ण्याची संवय अडाण्यांपेक्षां कुणब्यांनाच झालेली असते. म्हणून मजु-रांतही कुणब्यांचाच अनुक्रम सर्वांच्या वर लागतो. त्यांच्या नेहमींच्या भगभगीमुळें त्यांला अंग राखून काम करून मजुरी फुगविण्याची खोड जडली आहे. 'भाड्याचें घोडें आणि तरवडाचा फोंक' अशी म्हण आहे. खानदेशांत कपाशीवरील कुणबी मजूर शेतांत जाण्याला प्रहर दिवसाच्या आंत घर सोडीत नाहींत. रोजंदार कधींही वेळेवर कामाला लागत नाहींत, मुंगीच्या पावलानें चालतात, आणि मालकाची नजर चुकवून यथास्थित गमतात. उक्तें काम तेच इसम रोजंदारीच्या पांच तें सातपट आधिक कर-तात. परंतु अंगावर काम दिलें तर ते तें खोटें करतात. ह्यामुळें मालकाचें तर नुकसान होतेंच पण कुणब्याचेंही कायमचें नुकसान झालें आहे. त्याची पत म्हणून राहिली नाहीं; आणि हर प्रकारची बूड हिशेबांत धरून मजुरीचे दर हलके झाले. आतां जरी मजुरांची चणचण आहे आणि मजुरीचे दर वाढले आहेत तरी कुणबी खरे कष्ट करील तर ते ह्यापेक्षांही वाढतील. मागें सतत लकडा नसला तर तो काम करणार नाहीं, आणि मिळतो तोंपर्यंत दुसऱ्याचा माल उपसण्यांत कमी करणार नाहीं. ह्यासच तो कसब समजतो, आणि मागचा पुढचा

व्यापारी पोंच बिलकूल धरीत नाहीं. इमानेंइतबारें काम करून आपणही खावें, आणि शेतधन्याचा अंश बिनबोभाट न मागतां त्याला पोहोंचवावा अशी दानत फार थोड्या कुणब्यांची असते. ' असेल मालक शेतीं तर शेती, नाहीं तर माती ' असें म्हणतात, त्याचा अर्थ असा आहे कीं, कुणब्यावर जर खंबीर राखण ठेवलें नाहीं तर शेतचें कांहींएक हातीं लागावयाचें नाहीं. कुणबी शेतांत काय करतो, काय चोरतो, वेळेवर पाळी घालतो किंवा नाहीं, मोट धरतो किंवा नाहीं, राखण करितो किंवा नाहीं, सारांश पत्करलेलें काम करतो किंवा नाहीं, यासाठीं मालकाला नेहमीं त्याच्या पायावर पाय देऊन उभें रहावें लागतें, आणि रात्रींच्या रात्रीं खळ्यांत पडावें लागतें. हीच अवस्था सर्व प्रकारच्या मजुरीबद्दल आहे. खुरपणी-वेंचणीला जे मजूर लावावेत ते चापून मजुरी घेऊन शेतमाल घोळांत, पदरांत, भाकरीच्या पाटींत किंवा पिण्याच्या भांड्यांत चोरून आणितात. तो विकत घेण्यासाठीं मिठाई, खारीक, खोबरें, सुपारी, खजूर घेऊन भिकार दुकानदार हंगामाच्या दिवसांत संध्याकाळच्या सुमारास शेतवाटांवर बसलेले असतात. धन्याचे हे श्रम आणि नुकसान वांचविलें तर त्याचा मोबदला कोणीही आनंदानें देईल, आणि कुणब्याची राजरोष किफायत वाढेल. गिरण्यांसारख्या कारखान्यांत बहुतेक मजूर कुणबी वर्गांतले आहेत, ते तेथें काम कुचराईनें करतात. यूरोप-अमेरिकेच्या मजुरांच्या कामाचा पांचवा साहावा हिस्साही हिंदी मजुराचें काम पडत नाहीं अशी ओरड आहे. ती कां ? तिचें कारण इतकेंच कीं, कामचोरपणा हा गुण आमच्या सर्वांच्या अंगीं खिळला आहे. यूरोपियन जमीनदार, खाणीवाले व कारखानदार ह्यांनीं हिंदी मजुरांना सक्तीनें काम करण्याला भाग पाडण्याचे कायदे करून घेतले ते ह्या अवगुणांमुळें तर नसतीलना ? अर्थात् ह्या कायद्यांची तरफदारी करण्याचा हेतु नाहीं; फक्त आमचे अवगुण आम्हांला कसे नडतात हें दाखविण्याचा आहे. कामकुचरपणा व लबाडी ह्यांच्या मागोमाग येणारा दुर्गुण म्हणजे एकमेकांचा पहिल्यानें अपहार, नंतर

अदावती करण्याची बुद्धि धरणें हा होय. एकमेकांच्या शेतांत गुरें सोडणें, तीं चोरून चारणें, सुड्या स्वतः किंवा इतरांकडून पेटविणें, गुरांना महारामांगाकडून विषप्रयोग करविणें, लुच्चेलफंग्यांना बगलेंत मारून शेतांत चोऱ्या करणें किंवा करविणें, चोरलेल्या शेतमालाची ठेव ठेवणें किंवा तो स्वस्त्या भावानें खरेदी करणें, इत्यादि बळीराजाच्या पदवीला कमीपणा आणणारे पुष्कळ अवगुण कुणब्यांत संचरले आहेत. छोटेखानी गिरासिये, पाटीदार, कुणबी, शेतमाल चोरणाराला पाठीशीं घालितात. हें पाहून एका डिस्ट्रिक्ट पोलीस सुपरिंटेन्डेंट साहेबांना सखेदाश्चर्य वाटलें, आणि ते हळहळून उद्गारले कीं, हातांत दिवटी घेऊन जर कुणबी विहिरींत उडी घालीत आहे तर त्याला इतरांनीं तरी कसें वांचवावें ? मोलकऱ्यांमधील जे दोष येथवर वर्णन केले आहेत ते एकट्या कुणब्यांत आहेत आणि तदितर जातींचे मजुरांत नाहींत असें नाहीं. जातिस्वभावानुसार ते कमी किंवा अधिक—बहुधा अधिक-सर्व कामकऱ्यांत आहेत; आणि मजुरांत कुणब्यांची संख्या श्रेष्ठ असल्यामुळें 'हत्तीच्या पायांत सर्वांचे पाय' ह्या न्यायानें ते जातिपरत्वें सांगत बसण्याची गरज नाहीं.

तत्वतः कुणब्याच्या अवगुणांचें प्रमुख कारण सर्वांकडून त्याची होत असलेली कुतरओढ हें होय. तिच्यामुळें तो माशा पिल्याप्रमाणें गुंग होतो, आणि खऱ्याखोट्याचा देण्याची निवड करणें, व्यर्थ खर्च कमी करून बचतींतून आपली स्थिति सुधारणें इत्यादि कांहींएक त्याला सुचेनासें होतें. काळींत जें पिकतें त्याची लूट किंवा खैरात कमी होऊं लागली आणि तिचें उत्पन्न वाढलें, तर कुणबी सर्व प्रकारें विशेषतः नैतिक व सांपत्तिकदृष्ट्या सुधरेल यांत शंका नाहीं. पिनलकोड कमिशनरांनीं असा आभिप्राय दिला कीं, ह्या देशांतील लोक आपण होऊन जुलमाचा प्रतीकार करणारे नाहींत, व त्यांचा टोलेखाऊपणा पाहून मन उदास होतें. ही स्थिति आज वाढली पण कमी झाली नसावी. तेव्हां महार, जागले व भिकार वगैरे खट्याळांचा व आडमुठ्यांचा बंदोबस्त करणें सर्वस्वीं सरकारावर अवलंबून आहे. शेताचें सर्व उत्पन्न हातीं लाग-

ण्याला शेताचें राखण चांगलें झालें पाहिजे. ही गोष्ट सरकारलाही फार इष्ट आहे, आणि म्हणून मुंबईसरकारच्या जमीनमहसुलाच्या कायद्याच्या ६५ व्या कलमान्वयें त्यांनीं अशी सवलत दिली आहे कीं, शेतकऱ्यानें रहाण्यासाठीं किंवा शेतीच्या उपयोगासाठीं जर शेतांत इमला बांधला तर सरकार त्याजबद्दल जास्त पट्टी आकारणार नाहीं. अशा कामासाठीं शेतांतले गाटेगोटे, माती शेतकऱ्याला मोफत मिळते. फलत्यवेक्षिता स्वर्णं दैन्यं सैवानवेक्षिता । कृषिः कृषिपुराणज्ञ इत्युवाच पराशरः ॥ रानांत राहिलें ह्मणजे कोटकल्याण होतें ही गोष्ट कुणब्यालाही ऋषिकालापासून उमजतें. गांवांतून शेतांत आणि शेतांतून गांवांत ज्या माणसांच्या व जनावरांच्या येरझारा होतात त्या वांचतात, ताजेतवानेपणीं माणसांजनावरांना काम करावयाला सांपडतें, व हेलपाट्यांचा वेळ वांचून कामही जास्त उठतें. माणसें जनावरें रानांत राहिल्यानें गावांतली घाण नाहींशी होऊन सर्व खतमूत शेतांत मुरतें. गांवांत उकिरडा सांचविल्यानें खताचा सर्व कस उकिरड्याचे खांचेंत जिरतो, व अगदीं निकस खत शेतांत जातें, आणि तें चांगला चटका घेत नाहीं. म्हणून खताची वाहतूक अंगावर पडून ताज्या खतापेक्षां खतही जास्त लागतें. ‘ राखील त्याचें शेत. ’ शेतांत राहिल्यानें राखणाचा खर्च कमी येतो किंवा तो आजिबात वांचतो, आणि राखणही वेळच्यावेळीं व सावधगिरीचें होतें. परंतु रानांत राहणें निर्धोक केल्याशिवाय वरील फायदे कुणब्याच्या पदरांत पडावेत कसे ? गुन्हे करणारे लोक चोरून कां होईना पण हत्यारें मिळवितात. त्यामुळें गांवांत सुद्धां त्यांचा प्रतीकार करून दरोडा परतविण्याची सोय नसते, मग रानांतली अवस्था काय विचारावी ? हिंस्र पशु व सर्प ह्यांपासूनही रानांत जिवाला धास्ती असते. ब्रिटिश हिंदुस्थानांत सन १९१२ सालीं २०६६ लोक हिंस्र पशूंनीं मारले, आणि २१४६१ लोक सर्पदंशानें मेले. त्याचप्रमाणें सदर सालांत ९४८७३ गुरेंढोरें रानटी पशूंनीं मारलीं आणि १०३०१ ढोरें सर्पदंश होऊन मेलीं. गुरांढोरांना एक नवीन विघ्न उद्भवलें

आहे, तेंही जातां जातां सांगितलें पाहिजे. तें हें कीं, अनेक रेल्वेंना कोणत्याही प्रकारचें कुंपण नसल्यामुळें गुरें आगगाड्यांखालीं चिरडून मरतात. समर्थाशीं टक्कर घेण्याची लोकांना ऐपत नसल्यानें रेल्वे-कंपन्यांना लोकांचें नुकसान भरून देण्याची पाळी येत नाहीं, आणि लोक मात्र नाहक बुडतात. दरी, डोंगर, ओहोळांनजीकच्या चांगल्या चांगल्या जमिनींची किंमत घटत चालली आहे. कारण विचारतां असें सांगतात कीं, त्या बाजूला हरणाडुकरांचा फार त्रास होतो. झांवळ झांवळ असतांच कोल्हेहुक गांवकुसापाशीं ऐकूं येते, व हरणें इतकीं धीट झालीं आहेत कीं, ढवळ्या दिवसा राखणदाराच्या उशाशीं येऊन पीक खातात, आणि ओरडलें, धोंडे फेंकले तरी हालत नाहींत. राखणाच्या दिवसांत कुणब्याला आपल्या आईच्या दुधाची हरघडीं आठवण होत असावी. दिवसभर गोफण चालवून दंड भरून येतात, आणि हर्र हुर्र, हांआं करतां करतां घसा कोरडा पडून अखेर बसतो, तरी पांखरें जनावरें दाद देत नाहींत. पुन्हां चांदणी निघाली कीं लागलींच गोफण, आरडाओरड, टिनचे डबे बडवून आवाज काढणें जें सुरू होतें तें फटफटेपर्यंत. जरा विसंबलें कीं सबंध शेत थोटें होऊन जावयाचें. हा काळाचा व मनुष्यशक्तीचा किती प्रचंड खर्च आहे ? एका वयोवृद्ध पाटलानें असें सांगितलें कीं पूर्वीं घोड्यावर माणूस पाहिला कीं, हरिणें लांब पळत, तीं आतां बेधडक घोड्याजवळून जातात. देवानें पोटापुरतें ज्ञान सर्वांना दिलें आहे. एका शिकारी पारशी गृहस्थानें सांगितलें कीं मी स्वतः जंगलांतून पिस्तुलाशिवाय चाललों तरी हरणें धूम पळतात, तींच शिकार न करणारा शिपाई गोळ्या बंदूक घेऊन चालला तरी त्याला न भितां जरा दूरवर मात्र उभीं राहतात. हरणासारखी काळजी कोणी करीत नाहीं म्हणून 'हरिण–काळजी' शब्दप्रयोग प्रचारांत आला. परंतु आतां पहावें तों " विश्वासोपगमादभिन्नगतयः शब्दं सहन्ते मृगाः " हा ऋषींच्या आश्रमाचा देखावा शिवारभर नजरेस पडतो. ज्याजवळ बंदुक असते त्याला बार काढण्यास बोलवावें तर

तो गांवचा संभावित मनुष्य असतो. पैसे घेऊन बार काढण्याला त्याला शरम वाटते, आणि दर बाराला दोन चार आणे खर्च येतो म्हणून तो टाळाटाळी करतो. वाघाची भीति नाहींशी झाल्यामुळें कोल्हे, रान-डुकरें व हरणें यांची वीण फार झाली आहे; आणि ऊंस, भुइमुगासारख्या किफायतदार उदिमाचा धुव्वा उडतो. लांडग्यांचा, तरसांचा, वन-गाईचा उपद्रवही बराच आहे. रानटी जनावरांप्रमाणें पांखरांच्याही झुंडी पूर्वीपेक्षां पिकावर जास्त येतात व भीत नाहींत. असें सांगतात कीं, पूर्वीं होला नांवाचा पक्षी कडे प्रांतांत सीनानदीच्या अलीकडे येत नव्हता, व तो कावळ्याप्रमाणें जमिनीवरचा दाणा वेंची पण कणसावर कधीं बसत नसे. आतां हीं दोन्हीं पांखरें सदर प्रांतांत बेधडक कणसावर बसून दाणा खातात. वटवाघुळें फळांचा फन्ना पाडतात. सरकारी जंगलांत दडण चांगलें सांपडतें, आणि लोक निःशस्त्र झाल्यामुळें संहार होत नाहीं. शिकारी साहेब लोक तरी कितीसे कामाला येणार ? तेव्हां येथें हत्यारांचा प्रश्न उपस्थित होतो. तो राजकीय महत्वाचा असल्यामुळें सरकाराला लोकांचा दिलभरवसा आल्याशिवाय व त्यांच्या सद्धेतूची पूर्ण खात्री पटल्याशिवाय त्याची वासलात समाधानकारक लागणार नाहीं. तथापि चर्चा सुरू होण्याला कांहीं तरी आधार पाहिजे म्हणून खालीं लिहिल्या-प्रमाणें सुचवितों. प्रत्येक गांवांतल्या किंवा चार सहा गांवें मिळून त्यांतल्या संपत्तिमान् अब्रूदार पंचांनीं अशी हमी घ्यावी कीं, हत्यारें पंचांच्या ताब्यांत राहतील; कायदेशीर रीतीनें वित्त किंवा जीवित ह्यांच्या संरक्षणाखेरीज इतर कामीं त्यांचा उययोग करणार नाहीं किंवा होऊं देणार नाहीं; शेतकऱ्यांचे अर्जावरून त्यांचा उपयोग करूं तेव्हां खर्ची पडलेल्या दारूची व परिणामाची नोंद करूं; बेकायदेशीर उपयोग केल्यास अमुक गुन्हेगारी किंवा जामिनकी भरूं; आणि सरकार नेमील त्या अधिकाऱ्यांना हत्यारें व त्याबद्दलचे कागदपत्र वेळोवेळीं दाखवूं. ह्याप्रमाणें योग्य निर्बंध घालून जरूर त्या गांवाच्या शेतकऱ्यांच्या उप-योगाकरितां हत्याराचे परवाने दिले तर 'गाढवानें शेत खाल्लें पाप ना पुण्य'

अशी जी अनेक ठिकाणीं पिकाची नासाडी होते ती टळेल. ह्या प्रकारचे हत्याराचे परवाने देण्याचा अधिकार प्रांत मॅजिस्ट्रेटला दिला तर रयतेची सोय पुष्कळ वाढेल. हत्यारांच्या खालोखाल शेतकऱ्यांची दुसरी तक्रार कुंपणाबद्दल आहे. जंगलामुळें कुपाटीला फांटीं मिळत नाहींत असें कुणबी कण्हतात. निवडुंगाचें कुंपण करावें तर त्याचा कांटा विषारी असून त्याखालीं विंचू, साप राहतात, त्याला आग फार असते व त्याच्या वसव्यामुळें ५।१० हात जमिनींत पीक येत नाहीं. शेराचें कुंपण करावें तर त्याला आग असून त्याला जनावर खेटलें म्हणजे अपाय होतो. एका शेताभोंवतीं १०।१२ हात रुंद व ६।७ हात खोल असा खंदक रानडुकरांसाठीं केलेला दिसला. इतकी जमीन दरसाल अडविणें फायदेशीर नसलें पाहिजे. जें झाड एका ठिकाणीं उगवतें तें तेथून बारा कोसांवर उगवेल कीं नाहीं हें सांगतां येत नाहीं. तेव्हां बोरी, बोऱ्हाटी, हेकळ, करवंदी, खैर, करंजी वगैरे झाडाझुडपांचें कुंपण करणें झाल्यास अल्पखर्चानें फार जागा न अडवितां आणि वसवा न पाडतां कोणतें कुंपण घालतां येईल ह्या प्रश्नाचें सर्वसाधारण उत्तर देतां येणार नाहीं. सबब हा प्रश्न शेतकीसभेनें हातीं घ्यावा, आणि वाकबगार शेतकऱ्यांकडून त्याची शहानिशा करवून फायदेशीर कुंपणें ठरवावींत. कुंपण नसल्यानें माणसें जाणून बुजून शेतमालाची चोरी करतात, व गवत किंवा धान्य उगवलें कीं रस्त्यानें जाणारीं येणारीं जनावरें शेतांत तोंड घालतात. असल्या जनावरांमध्यें देवा-पिरांला वाहिलेलीं जनावरें अति उपद्रव देतात. खेड्यांत मोकार जनावरें सोडण्याची सर्रास चाल आहे, ती अजिबात बंद झाली पाहिजे. पहातां पहातां ओघानें आलें म्हणून येथें हेंही सांगितलें पाहिजे कीं, हलक्या जातींचे वतनदार व फिरस्ते नुसते शेतमाल व जनावरांवरच ताव मारून राहतात असें नाहीं तर ते कुणबिकीचे अनेक पोटधंदे कुणब्याला किफायतशीर होऊं देत नाहींत. इंग्लंडमध्यें निम्मी जमीन चारण राखतात, व आपल्याकडे शेंकडा सतरा जमीन सुद्धां चारा-पेरीला ठेवीत नाहींत. सुमारें पावहिस्सा

रान जर ज्यानें त्यानें चाऱ्यासाठीं ठेविलें तर गुरेंढोरें, शेळ्यामेंढ्या, घोडीं बाळगून त्यांची पैदास व हेड करणें हा धंदा कुणब्याला बसल्याजागीं साधण्याजोगा आहे. पण तसें करण्याला कुणब्याला खर्च येतो, आणि आयतखाऊंना येत नाहीं. ते आपलें व जनावरांचें पोट बाहेर काढतात. त्यामुळें बिन चोरलेलीं जनावरें, कोंबड्यासुद्धां त्यांना स्वस्त विकणें परवडतें, आणि त्या मानानें कुणब्याचा धंदा नाहक बुडतो. तेव्हां ह्याही दृष्टीनें विचार करतां अशी स्थिति निर्माण केली पाहिजे कीं, ज्याला जनावरें पोसण्याचें सामर्थ्य नाहीं त्यानें तीं बाळगूं नयेत, व कुणब्याचा हक्काचा धंदा फुकटफाकट बुडवूं नये.

मुबलक भांडवल, साक्षरता आणि प्रवासजन्य ज्ञान ह्यांच्या अभावाचें जबरदस्त लोढणें गळ्यांत वागवून आमच्या एकलपायी कुणब्यानें जातिधर्म व आनुवंशिक संस्कार ह्यांच्या जोरावर कुणबीक जितकी पूर्णत्वाला नेणें शक्य होतें तितकी नेली असें यूरोपिअन पंडितांचें बहुमत आहे. त्याला शास्त्रीय व्याख्या किंवा उपपत्ति तोंडानें सांगतां येत नसेल; परंतु कोणत्या जमिनींत कोणतें पीक काढावें, त्यांच्या पाळ्या कशा असाव्यात, बीं कसें धरावें, मावा चिकटा कानी वगैरे कीड कशी मारावी, खत कोणतें योग्य, जनावर कसें तयार ठेवावें, त्यांचें औषधपाणी वगैरे सर्व कामें तो बापआजाचीं पाहून खाशीं नामीं करीत आला आहे. आतां मालकीची जमीन नसली तर कुणबी ती काळजीकाट्यानें करीत नाहीं, व कांहीं कुणबी इतके दरिद्री झाले आहेत कीं, त्यांना शेताची उस्तवार करण्याची ऐपत नसते, अशांची गोष्ट वेगळी. हे वगळले तरी आमच्या कुणबिकींत सर्व प्रकारें सुधारणा करण्यास अतिशय जागा आहे हें पाश्चात्य कुणबिकीवरून सिद्ध होतें. ह्या सुधारणा कशा करतां येतील ह्याबद्दल सरकारानें शेतकी खातें स्थापून आटोकाट प्रयत्न चालविले आहेत. पुसा येथें सर्वांत मोठें शेतकी कॉलेज काढून त्याला प्रयोगशाळा जोडली आहे. तेथें कृषिकर्मशास्त्राचे शोध चालू आहेत. हें शोधाचें काम रयतेच्या आवांक्याबाहेर आहे; म्हणून कृषिशास्त्राच्या शोधाचें

काम सरकार करील तितकें थोडेंच आहे. इलाखानिहाय शेतकीचीं कॉलेजें आहेत. त्यांत शिकून तयार झालेल्या लोकांना सरकार शेतीखात्यांत घेतें, आणि त्यांच्याद्वारें कुणबिकीच्या ज्ञानाचा प्रसार करतें. मुंबई इलाख्याचें शेतकी कॉलेज पुणें येथें आहे. तेथेंही शेतकीसंबंधानें प्रयोग व शोध चालू असून त्यांच्या माहितीचा प्रसार करण्याचें काम चाललें आहे. सदर कॉलेजामध्यें थोड्या दिवसांत संपणाऱ्या अभ्यासक्रमाचे वर्ग आहेत, आणि देशी भाषांतून उंसाची लागवड शिकविण्याचा वर्ग आहे. लोणी काळभर, जांभूळ (ठाणें), देवीहोसूर ( धारवाड ), गोध्रा व मिरपुरखास ( सिंध ) येथें देशी भाषांत कृषिविद्या शिकविणाऱ्या शाळा स्थापन झाल्यासारख्या आहेत. श्री० **सरदार बिवलकर** ह्यांनीं अलीबागेस स्वतःच्या खर्चानें शेतकी शाळा चालविली आहे, आणि तिचा लोकांना पुष्कळ उपयोग होत आहे. शेतकी शाळा स्थापन करण्यासाठीं चोपडें तालुक्याच्या लोकांनीं वर्गणी जमविली आहे. सरकारानें अलीबाग, रत्नागिरी, धुळें, जळगांव, अहमदनगर, पुणें, मांजरी, नाडियाद, सुरत, दोहद, धारवाड, गोकाक, गदग वगैरे ठिकाणीं नमुन्याचीं शेतें स्थापिलीं आहेत. जनावरांच्या जोपासनेचा व त्यांची पैदास सुधारण्याचा बोध होण्यासाठीं सरकारनें दावणी घातल्या आहेत; त्यांत मुख्य गुजरातेंतील नार्थकोट गोशाळा होय. सबंध इलाख्यांत शेतकी प्रयोगांचीं ठाणीं वीस असून पोटठाणीं एकोणीस आहेत. ह्या सर्व ठिकाणीं जे शोध उपयुक्त ठरतात त्यांचें ज्ञान शेतकऱ्याला मिळावें म्हणून सरकार देशी भाषेंत पुस्तकें पत्रकें प्रसिद्ध करून गांवोगांव वांटीत आहे. त्यांमध्यें जमिनींची व बियांची निवड, कोणतीं नवीन पिकें कोठें काढतां येतील, कोणतीं नवीन आउतें ( जसें वाफेचा नांगर ) इकडे उपयोगांत आणितां येतील, धान्य आणि जनावरांचे रोग व त्यांवरील उपाय, उत्तम खतें, उदीमांवरील कीड घालविण्याचे उपाय, दुभत्याच्या जनावरांची जोपासना, मलई काढण्याचें यंत्र वगैरेंबद्दल माहिती असते. ह्या सर्वांचें सप्रयोग ज्ञान देण्यासाठीं ठिकठिकाणीं प्रात्याक्षिकें व प्रदर्शनेंही भरविण्यांत येतात.

कातड्याच्या मोटा महाग होत आहेत, म्हणून पंप ऑईल एंजिन वगैरे-कडून यांत्रिक शक्तीनें पाणी काढण्याचें ज्ञान लोकांना देण्याची व पहारीनें थोड्या खर्चांत विहिरींना पाणी कसें लागेल ह्याची माहिती देण्याची खटपट ॲग्रिकल्चरल एंजिनीअर करतात. ह्यासंबंधानें व्यवहार्य योजना सादर करण्यासाठीं सरकारनें एक कमिटी नेमिली आहे. कुणब्याच्या दृष्टीनें जमिनीच्या इतकेंच महत्वाचें भांडवल गुरेंढोरें होत; म्हणूनच तो जमिनीला आई आणि गुरांना लक्ष्मी म्हणतो. गेल्या तीस वर्षांत जनावरांची किंमत दुपटीवर गेली, आणि साठ रुपयांच्या खालीं चांगला बैल मिळत नाहीं. जनावरांचे रोग बरे करण्यासाठीं लोकल बोर्ड व म्युनिसिपालिट्या ह्यांनीं ५० दवाखाने स्थापिले आहेत; आणि अद्यापि जरी ते तालुकानिहाय झाले नाहींत तरी त्यांची संख्या दिवसेंदिवस वाढत आहे व त्यांवरील डॉक्टर सवडीप्रमाणें गांवोगांव फिरतात. सर-कारच्या सिव्हिल व्हेटर्नरी खात्याची त्यांवर देखरेख आहे. शेतकी खात्याप्रमाणें या खात्याचाही शेतकऱ्यांनीं फायदा घ्यावा; आणि आपलीं जनावरें चालढकलीनें जायबंदी किंवा ठार होऊं देऊं नयेत. शेतीचीं व इतर जनावरें ह्यांची सुधारणा करण्याचें कामही ह्याच खात्या-कडे सोंपविलें आहे. ठिकठिकाणीं शेतकीसभा स्थापन करण्याला सर-कार उत्तेजन देत आहे. त्या शेतकऱ्यांच्या हरप्रकारच्या अडचणी कशा दूर करतां येतील ह्याची वाटाघाट करतात. अशा सभा आपल्या इला-ख्यांत सुमारें पन्नास आहेत. पुण्याची शेतकीसभा '**शेत शेतकरी**' नांवाचें कुणबिकीच्या माहितीनें भरलेलें मासिक पुस्तक प्रसिद्ध करते. नागपुरकडे '**किरसानी समाचार**' नांवाचें असेंच मासिक प्रसिद्ध होतें. ही जी तोंडाशीं गंगा आली आहे तिचा लाभ सर्वांनीं अवश्य करून घ्यावा; आणि ह्याखेरीज शेतीसंबंधानें लागेल ती माहिती जिल्ह्याचे ॲग्रिकल्चरल ओव्हरसियर ह्यांना विचारावी म्हणजे ते योग्य तो सल्ला देतील.

सहानुभूतिविरहित अशा परप्रांतीय सावकारांच्या द्रव्यलोभानें आणि

स्वतःच्या गैरसावधपणानें कुणबी कफल्लक झाला असें सरकारच्या नजरेस येऊन हिंदुस्थान सरकारनें त्याला सांवरण्याकरितां दाक्षिणेंतील शेतकऱ्यांस ऋणमुक्त करण्याचा कायदा सन १८७९ सालीं पास केला; आणि सरकारांतून त्याला कर्जाऊ रकमा देण्यासाठीं सन १८८३ सालचा १९ व १८८४ चा १२ असे आणखी दोन कायदे पास केले. शेतकरी कायद्यामुळें सावकाराच्या घेण्याचा हिशोब पाहून त्यावर योग्य व्याज आकारून त्याचे फेडीबद्दल कोर्टाला हप्तेबंदी करितां येते. तसेंच, खरेदीचा व्यवहार गहाणाचा आहे कीं काय हें पहातां येतें. सावकारांनीं कुळाला हिशेब, पावत्या दिल्या पाहिजेत असें सदर कायद्यानें फर्माविलें आहे. वर सांगितलेला शेतकी कायदा रद्द करून सरकार दुसरा कायदा करीत आहे. त्यांत विशेष हा आहे कीं, शेतकऱ्यांशीं घेणें देणें करणारांनीं जमाखर्च ठेवून त्याची नक्कल कुळांना दिली पाहिजे. पंप, विहिरी वगैरे पाण्याचीं कामें, नापेर अगर दलदलीची जमीन वहितींत आणणें, संरक्षक कामें, इत्यादीसाठीं जमीन तारण घेऊन लांब मुदतीचें भारी कर्ज सन १८८३ सालच्या जमीन सुधारण्याच्या कायद्याप्रमाणें मिळतें; आणि ह्या कर्जानें केलेल्या सुधारणेनें जर जमिनीची किंमत वाढली, तर तिजवर सरकार जास्त आकार बसवीत नाहीं. सन १८८४ सालच्या कायद्याला शेतकऱ्यांना कर्ज देण्याचा कायदा म्हणतात. त्याच्या आधारानें बैल, बीं, चारा, खावटी वगैरेसाठीं थोड्या मुदतीचें हलकें कर्ज सरकार शेतकऱ्यांना जामिनी अगर जामिनाचें तारण घेऊन देतें. या कर्जावर पूर्वीं दरसाल दरशेंकडा ५ टक्के व्याज पडे. अलीकडे व्याजाचा दर शेंकडा ६। टक्के झाला आहे. कित्येक गांवांला पोळासाठीं सरकारनें तगाई दिली आहे. सरकार शेती सुधारण्यासाठीं याप्रमाणें जें कर्ज देतें त्याला तगाई, तकावी, किंवा तकवाई असें म्हणतात. राजांनीं शेतकऱ्यांना मदत म्हणून कर्ज देण्याचा प्रघात हिंदुस्थानांत प्राचीन काळापासून आहे. ह्या कर्जाला ते तगाई म्हणत. इंग्रज सरकारनें तोच प्रघात आणि

तेंच नांव चालविलें. तगाई हा मोठा अर्थपूर्ण शब्द आहे. तगणें म्हणजे कष्टानें जीव धरून राहणें. थकवा आल्यावर जी थोडीशी हुषारी येते तिचें नांव तकवा. कुतंगळ कुळाला तकवा आणण्यासाठीं जें कर्ज सरकार देतें तें तगाई. हा अर्थ लक्षांत आणून जर कुळें आपल्या गरजेपुरतें कर्ज काढतील तरच सरकारचा हेतु सफल होईल. पण लोक ओढगस्त असल्यामुळें ज्या कामासाठीं कायद्यानें तगाई देतां येत नाहीं त्यासाठीं पैसे लागले तरी पाटीलकुळकर्ण्यांच्या मदतीनें कायदेशीर कारण दाखवून तगाई काढतात, आणि त्यामुळें तगाईनें शेतसुधारणा किंवा शेतीचे कामाला मदत होण्याचें एकीकडेच राहून कर्जबाजारीपणा मात्र पुष्कळ ठिकाणीं वाढला आहे. असली फसवाफसवी करून आपण मोठी चूक करतों, असें लोकांना मनापासून वाटत नाहीं. कुणब्याला वाटतें कीं, आली गरज भागविली पाहिजे, आज थोड्या व्याजानें रक्कम मिळते ती घेऊं, आणि बरा दिवस आला म्हणजे फेडून टाकूं; ती मिळण्याकरितां खोटें बोलावें लागलें आणि लांचलुचपतही द्यावी लागली तरी त्यांत मोठेंसें कांहीं गैर नाहीं. कोणाचीही गरज भागविण्याला मदत करणें पुण्य आहे, शिवाय वेळेवर उपयोग केल्याचा उपकार कुळांवर होतो, तेव्हां तेवढ्यासाठीं थोडेंसें लबाड बोललें म्हणजे पाप लागेल असें नाहीं असें पाटीलकुळकर्ण्यांला, कुळाचे जामीनदारांला, किंवा त्याच्या शेताचा व कल्पित शेत-सुधारणेचा कयास करणाऱ्या पंचांना वाटतें. आपले मदतीशिवाय तगाई मिळत नाहीं हें ध्यानांत आणून हे लोक आपली कसर जाऊं देत नाहींत; निदान तगाईचे कागद करण्यासाठीं अगर जाबजबाबासाठीं ठाण्यांत किंवा अंमलदारांच्या स्वारींत, पाटील, कुळकर्णी, जामीनदार, पंच वगैरेंना जाणें पडलें तर सर्वांचा वाटखर्च व भोजनखर्च तरी कुळांवर बसतोच बसतो. तगाई वांटण्याचे दिवसांत तालुक्याच्या ठाण्यांत हलवायाची भट्टी पेटलेली असते; कारण सोकावलेल्या मंडळींना ओल्या कोरड्या दशम्या भाकरी जात नाहींत, मिठाई लागते. कुणब्याला असें

होतें कीं कोणीकडून तरी पैसा गाठूं या, मागें पुढें पाहण्यांत हंशील नाहीं. पूर्वी सरकारचें कर्ज काढण्याला लोक कचरत; आपणांकडून वेळेवर हप्ते जाणार नाहींत, आणि जमिनीचा लिलांव होईल असें त्यांना वाटे. परंतु सन १८९६ च्या दुष्काळानंतर तगाई रगड वांटली. तेव्हांपासून बेधडक तगाई घेऊं लागले. पहिल्या पहिल्यानें तरी पुष्कळांनीं ती वाजवी कामांकरितां काढली नाहीं, अगर वाजवी कामांकडे लाविली नाहीं. आपला दाम खोटा असें ते ओळखून होते, म्हणून त्यांनीं लांचलुचपतीची खैरात केली असली पाहिजे. त्यांनीं जी वाट पाडली तिच्यामुळें वाजवी कामांसाठीं ज्यांना तगाई पाहिजे होती, अशा लोकांनासुद्धां तगाईसाठीं भूयसी द्यावी लागली. मिशनरींच्या अनुकूलतेनें ख्रिस्ती शेतकऱ्यांना मात्र दक्षिणेशिवाय तगाई मिळाली. पण ह्या लोकांनीं सुद्धां ती वाजवी कामाकडे खर्च केली कीं नाहीं याबद्दल जबरदस्त शंका आहे. कारण त्यांच्याकडेही पुष्कळ तगाई थकली आहे, आणि त्यांपैकीं बरेच जण इतर कुणब्यांप्रमाणेंच पावसाच्या नांवानें खडे फोडतात. सरकारच्या नजरेला वरील दोष येऊन तगाई देण्याच्या पद्धतींत आतां पुष्कळ सुधारणा झाली आहे, व लांचलुचपत न होऊं देण्याविषयीं सर्व अंमलदार दक्ष असतात. जुजबी जमीनदाराला तगाई देण्यांत हात आंखडावा असेंही धोरण अलीकडे अमलांत येऊं लागलें आहे. इतर सावकारांप्रमाणें सरकारचें भांडवल मर्यादित नसल्यामुळें सरकारला हवी तितकी रक्कम तगाई देतां येते. जसें तारण आणि शेत-सुधारण्याचें काम तशी तगाईची रक्कम मिळते, आणि तिची फेड हप्त्याहप्त्यांनीं होते. तगाईला स्टांप व नोंदणीच्या खर्चाचीही सवलत आहे. सावकारी कर्जाप्रमाणें वसुलांत व हिशेबांत घोंटाळा असण्याचें कारण नाहीं. कुणब्याला सालोसाल खातें-उतारा सरकारनें दिला तर तो बराच जागा राहील. तेव्हां जर कुणब्यांनीं वाजवी कामासाठीं जरूर तितकी तगाई काढली, आणि तिचा यथातथ्य उपयोग केला, व वायद्याप्रमाणें हप्ते भरले तर सावकाराकडून पैसे काढण्यापेक्षां तगाईनें पैसे काढण्यांत

त्यांचा कमींत कमी दुपटीचा तरी फायदा खात्रीनें आहे, आणि त्यांनीं तो अवश्य करून घ्यावा.

तगाईपेक्षां शेतकऱ्यांना सर्वतोपरी उपकारक अशी सरकारी योजना म्हटली म्हणजे ठिकठिकाणीं स्थापन होत असलेल्या परस्परसाह्यकारक मंडळ्या किंवा पतपेढ्या होत. ह्यांसंबंधानें हिंदुस्थान सरकारनें सन १९१२ चा कायदा अंक २ पास केला आहे. शेतकरी, कारागीर थोड्या उत्पन्नाचे लोक ह्यांच्यामध्यें **काटकसर** व **स्वावलंबन** वाढावें हा ह्या कायद्याचा उद्देश आहे, आणि त्याप्रमाणें सहकारी मंडळ्या चालवून उपरिनिर्दिष्ट लोकांनीं तो सफल केल्यास त्यांत त्यांचें निरंतरचें कल्याण आहे. खेड्याच्या दुकानदारीकडे वर वर पहाणाराला सुद्धां हें कळून येईल कीं, शेतकऱ्याचा सर्व प्रपंच उधारीनें चालला आहे, आणि त्याला हरहमेष किरकोळ कर्ज काढावें लागतें. ही उधारी आणि हें कर्ज रासमाथ्याला चुकतें करण्याची तो बोली करतो, म्हणजे त्याला थोड्या मुदतीपर्यंत थोडें थोडें कर्ज लागत असतें. अहमदनगर जिल्ह्यांत साधारण तपासाअंतीं असें समजतें कीं, बरे म्हणविणाऱ्या कुणब्यांमध्यें शेंकडा २५ जणांना बियाण्यासाठीं, १० ना जनावरांसाठीं, १७।१८ ना शेतसाऱ्यासाठीं व शेतीच्या आउतासाठीं, आणि १०।१२ ना कपडालत्ता, धान्य वगैरेसाठीं सालोसाल कर्ज काढावें लागतें. अलीकडे मजुरीचा दर फार वाढल्यानें खुरपणी–कापणीच्या वेळीं बऱ्याच शेतकऱ्यांना पैसा उचलावा लागतो. ह्या व अशा प्रकारच्या नडींसाठीं लागणारें थोड्या मुदतीचें किरकोळ कर्ज हलक्या व्याजानें मिळालें आणि त्यांना रोखीनें माल घेतां आला, तर सावकारांना द्यावें लागणारें जडीप व्याज वांचून त्यांचा पुष्कळ फायदा होईल, आणि ते ऋणमुक्ततेचा मार्ग चालूं लागतील. हाच नियम साळी, कोष्टी, चांभार, ढोर वगैरे कारागीर, कारखान्यांतले मजूर, भंग्यांसारखे धंदेवाले ह्यांना लागू पडतो. रोकड जवळ असणारे शेतकरी, कारागीर व मजूर फार थोडे ही गोष्ट खरी, पण सुदैवानें ती ज्यांच्याजवळ असेल त्यांनीं पतपेढी स्थापून,

तिच्यांत ती गुंतविली तर तिच्यावरचें व्याज पदरांत पडून वेळीं अवेळीं स्वतःलाही हलक्या व्याजानें कर्ज काढतां येईल. अमुक रकमेपर्यंत एकंदर कर्ज द्यावयाचें असा ठराव पास करून विलायतेंत स्कॉची ॲग्रि-कलचरल क्रेडिट सोसायटीनें ज्याप्रमाणें आपली जोखीम नियमित केली, त्याप्रमाणें इकडील सहकारी मंडळ्यांनाही करतां येईल; आणि अनियमित जबाबदारीचा जो कित्येकांना बागुलबुआ वाटतो तो नाहींसा होईल. तेव्हां एक अगर एकाहून अधिक गांवच्या अब्रूदार, सत्यवादी, निग्रही ह्मणजे वायदा टळूं न देणारे आणि हें माझें हें लो-कांचें अशी प्रतारणा नसणारे शेतकरी, कारागीर अगर मजूर ह्यांनीं एकचित्त व्हावें, आपले शक्त्यनुसार भांडवल जमवावें आणि सहकारी मंडळी स्थापन करावी. प्रवेश–फी, देणग्या, ठेवी, व दुसऱ्या सहकारी मंडळ्या व पेढ्यांकडून कर्ज इत्यादि साधनांनीं सहकारी मंडळ्यांना भांडवल गोळा करतां येतें. पतपेढी स्थापन करण्यासंबंधाचे सर्व-साधारण नियम सरकारनें प्रसिद्ध केले आहेत. त्याबद्दलची माहिती तालुक्याचे मामलेदार सांगतील. शिवाय या कामांत सल्लामसलत देणारे गृहस्थ अनेक जिल्ह्यांत आहेत, तेही योग्य ती मदत देतील. प्रथम छापलेले नियम मागवावेत, मग लहानशी सभा भरवून त्यांत त्यांची चर्चा करावी व पेढीचा व्यवहार कशा रीतीनें चालवावयाचा हें मुक्रर करावें, आणि बहुमतानुरोधानें स्थानिक स्थितीला योग्य ते फेर-फार करून त्यांवर बारा इसमांनीं सह्या करून मे. रजिष्ट्रारसाहेब कोआपरेटिव्ह सोसायटी, पुणें, यांजकडे सदर सहकारी मंडळी नोंदविण्याबद्दल अर्ज करावा. मंडळी नोंदल्यानंतर अर्जदारांनीं व त्यांखेरीज मंडळींत येऊं इच्छिणाऱ्या लायक गृहस्थांनीं सभा भरवावी, आणि तिच्यांतून व्यवस्थापक मंडळी, अध्यक्ष, कागदपत्र व हिशेब ठेविण्यासाठीं एक सेक्रेटरी व त्याचा पगार वगैरेसंबंधानें ठराव करून कामास सुरुवात करावी. मंडळीची शिल्लक पोस्टाचे सेव्हिंग ब्यांकेंत राहते. किरकोळ खर्चासाठीं ह्मणून सेक्रेटरीजवळ १० रुपये

असतात. मंडळीच्या पेढीवर जे ठेवी ठेवितात, त्यांना चालू ठेवीवर दरसाल दरशेंकडा १८९ आणे, सहा महिने मुदतीच्या ठेवीवर ३८२ आणे, आणि वर्षावरील मुदतीच्या ठेवींवर ६८४ व्याज मिळतें. जे सभासद पेढीवर कर्ज काढतात, त्यांना दरसाल दर शेंकडा ९।१० टक्के व्याज पडतें. मंडळीचे हिशेब दरसाल सरकारचे हिशेबनीस तपासतात; शिवाय त्यांजवर लहानमोठ्या सर्व अमलदारांची नजर व तपासणी असते. मंडळीचे दस्तैवजांस स्टँप व नोंदणीफी सरकारनें माफ केली आहे, आणि कोर्टमार्फत व पंचायतमार्फत घेणें उगविण्याच्या कामींही विशेष सवलती दिल्यामुळें मंडळीचें कर्जवसुलाचें काम साधारण सावकारी दाव्यांप्रमाणें दिवसगतीवर न पडतां तडकाफडकी होतें. हिंदुस्थानांत सन १९१३ सालपर्यंत १२३२४ अशा मंडळ्या झाल्या असून सदर सालांत त्यांचे सभासद ५७३५३६ व भांडवल पांच कोटी रुपयांवर होतें. ह्याचा फायदा सुमारें साठ लक्ष लोकांनीं घेतला आणि हलकें व्याज व सचोटीचा हिशेब ह्यांमुळें त्यांची एका वर्षांत वीस लाख रुपयांची बचत झाली. गेले सालीं मंडळ्यांची संख्या १५६७३ झाली, व भांडवल सात कोटी एकाहत्तर लक्षांवर जाऊन त्यांस सुमारें २५ लक्ष ४७ हजार नफा मिळून सालअखेर त्यांजवळ साडे पसतीस लाख शिल्लक उरली. गुदस्तसालपर्यंत मुंबई इलाख्यांत ६९८ मंडळ्या स्थापन झाल्या, त्यांचें भांडवल रु. ६६१३१३५ म्हणजे अर्धकोटीवर असून त्यांत सभासद ६६७०४ होते; आणि त्यांना दरसाल शेंकडा सहा टक्के व्याज सुटलें. त्यांपैकीं शेतकऱ्यांच्या सहकारी मंडळ्या ५६८, सभासद ३८६२१ व भांडवल रु. २८०३८४९ आणि विणकराच्या मंडळ्या २९ व भांडवल रु. १०६४९० होतें. नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या माहितीवरून असें समजतें कीं, १९१५ चे मार्चअखेर मुंबई इलाख्यांत अशा मंडळ्यांची संख्या ८१७ पर्यंत गेली आहे. त्यांची फोड येणेंप्रमाणें आहेः शेतकऱ्यांच्या मंडळ्या ६३१, बिनशेतकऱ्यांच्या १०३, कोष्टयांच्या २९, शेतकी सरंजाम पुरविणाऱ्या २३, धान्यभांडारें २५, सेंट्रल बँका ५, व फिडरेशन १.

परस्परसहकारी मंडळ्यांचा मुख्य फायदा हा कीं, कुणबी, हलके धंदे-वाले व मजूर ह्यांना सावकारापेक्षां हलक्या व्याजानें कर्ज मिळतें, जमा-खर्चांत भोळें राहत नाहीं, व लुच्चेगिरी होत नाहीं. सावकारी कर्जाचें व्याज सावकार आणि तगाईचें व्याज सरकार घेतें. तें कांहीं परत गांव-कऱ्यांच्या घरांत जात नाहीं. पतपेढीच्या व्याजाची गोष्ट तशी नाहीं. तें सहकारी मंडळीच्या सभासदांच्या म्हणजे रयतेच्या पदरांत पडतें. तिची संपत्ति वाढते म्हणजे कर्ज मिळाल्यानें गरज भागते आणि पुन्हा त्याचा नफाही खावयास सांपडतो. तगाई मिळण्यास पाटील–कुळकर्णी, जामीन-दार यांचे जाबजबाब, मुलकी अधिकाऱ्यांची चौकशी वगैरे गोष्टींमुळें कालावधि लागतो. त्वरित पैसा पाहिजे असल्यास तगाईनें वेळ मारून नेतां येत नाहीं. पुष्कळ प्रसंगीं वेळ निघून गेल्यावर तगाई भेटते. पैसा पाहिजे असतो आज व तगाई मिळणार महिना पंधरा दिवसांनीं. तेव्हां कित्येक वेळां भारी व्याज कबूल करून लोक पैसा काढतात, आणि तगाई मिळाल्याबरोबर तो चुकवितात. पतपेढीचा पैसा मिळण्यास इतकी दिरंगाई लागत नाहीं. तगाई कोणत्या कामांसाठीं घ्यावयाची तीं कामें ठरलीं आहेत. त्यांखेरीज इतर कामासाठीं तगाई मिळत नाहीं. पत-पेढीची गोष्ट तशी नव्हे. ज्या कामासाठीं तगाई मिळत नाहीं अशा अनेक योग्य कामांसाठीं पतपेढीला आपल्या सभासदांना कर्ज देतां येतें. पुरातन काळापासून सावकार आणि कुळें ह्यांचें नातें सेव्य–सेवकाचें होऊन बसलें आहे. त्यामुळें सावकारांत अरेरावी व जुलूम, कुळांमध्यें मिंधेपणा व गुलामगिरी, आणि दोघांमध्येंही कपटाचरण शिरलें आहे. दुसरें असें कीं, जो तो आपल्या पायापुरतें पाहतो, एकंदर गांवाच्या किंवा समाजाच्या हिताकडे लक्ष देऊन वर्तन करीत नाहीं. त्यामुळें ‘हलवायाच्या घरावर तुळशीपत्र ’ ठेवण्याची बेजबाबदार खोड आपल्या लोकांना लागली आहे. एकाद्याला जर कोणाकडे कर्ज काढावयाचें असलें आणि कर्ज देणारानें जर विचारलें कीं, असामी कशी आहे, तर कर्ज घेणारा वाईट असला तरी आपले शब्दानें त्याचें काम होत अस-

ल्यास हा खुशाल त्याची शिफारस करणार. त्यांतून ह्यानें जर कां कर्ज घेणारापासून पानसुपारी खाल्ली असली अगर तो ह्याच्या नात्यांतला असला तर मग शिफारस म्हणजे सोळा आणे उतरावयाची. समाजाच्या ह्या वर्तनानें सावकारांना फाजील दक्ष रहावें लागतें, आणि आपल्या पैशा-साठीं शिकस्तीची मजबुती करून ठेवावी लागते. व्याजाचे दर भारी होण्यास किंवा सावकारी हिशेबांत खोटेपणा शिरण्यास आमच्यांतली नेकीची वाण हें एक कारण असावें. जेव्हां पैसा एकट दुकट साव-काराचा नसतो आणि जनसमूहाचा समाईक म्हणजे सार्वजनिक असतो, तेव्हां तो वाटेल तसा वेडावांकडा खर्च करण्याची लोकांना दिक्कत वाटत नाहीं. त्यांत कोणी कासाविशी करूं लागला तर त्याला धडधडीत म्हणतात कीं, 'वाहत्या गंगेंत हात धुवून घे, खर्चणाराचें खर्चतें आणि कोठवळ्याचें कां पोट दुखतें ?' ह्याचा अर्थ इतकाच कीं, पैसा स्वतःचा नसला म्हणजे त्याच्या योग्यायोग्य खर्चाकडे कोणी प्रामाणिकपणानें व बारकाईनें पाहूं नये. म्हणूनच आमच्या सार्वजनिक व्यवहारांत ठोकरी बसतात. ही खेदजनक स्थिति नाहींशी करण्याला पतपेढी ही उत्कृष्ट दवा आहे. तिचें वर्मच हें कीं, उच्चनीच भाव न धरितां एकमेकांस नडीच्या वेळीं कर्ज देऊन साह्य करावयाचें, आणि बोलीप्रमाणें पैसा बिन-तक्रार परत करावयाचा, म्हणजे सर्वांनीं बंधुत्वानें समसमान वागावयाचें. कुळाची लायकी, ऐपत ह्यांचा विचार कर्ज देतांना किंवा वसूल करतांना न केला तर स्वतःचे भांडवलाला धक्का बसणार. तेव्हां मिंधेपणा, कोडगे-पणा आणि परवित्ताविषयीं औदासीन्य वगैरे जे वैयक्तिक व सामाजिक दुर्गुण आमच्या बहुजनसमाजाच्या हाडांमासांत खिळले आहेत ते पत-पेढ्यांमुळें नाहींसे होऊन लोक स्वाभिमानी, दक्ष आणि जरूरीप्रमाणें स्पष्टवक्ते व नेटदार झाल्याशिवाय राहणार नाहींत अशी उमेद धर-ण्यास पुष्कळ जागा आहे.

व्यापारी कसबाकडे आमच्या लोकांनीं दुर्लक्ष केल्यामुळें आमची निष्कांचन स्थिति झाली आहे. ज्या वर्गाची व्यापारी दृष्टि समूळ नाहींशी

झाली आहे, त्यांत कुणबी हो अग्रगण्य आहे. तेव्हां जसजशा सहकारी मंडळ्या जास्त निघतील तसतसा एकंदर लोकांत विशेषतः कुणब्यांत व्यापारी शिक्षणाचा व कौशल्याचा जास्त फैलाव होईल. आणि हें शिक्षण जगांत जे आज शंभर नंबरी व्यापारी इंग्रज लोक त्यांच्याकडून प्रत्यक्ष मिळणार आहे ही गोष्ट ध्यानांत ठेविली, म्हणजे आम्ही जितक्या अशा मंडळ्या लवकर काढूं तितकें इष्टच आहे. ह्या मंडळया स्थापन झाल्यानें त्यांच्या सभासदांचा फायदा होईलच होईल. पण त्यांच्या उदाहरणानें एकंदर जनतेचा फायदा झाल्यावांचून राहणार नाहीं. दक्षिणेंतले कुणबी काय आणि इतर जाती काय, कोणालाही व्यापारी पोंच किंवा पेंच बिलकुल नाहींत. चांगल्या षट्शास्त्र्यांच्या प्रपंचाची हातोटी पाहिली तरी 'आंधळे दळतें आणि कुत्रें पीठ खातें' अशांतलीच. बाजार कसा काय आहे, पेठेंत जिनसांचे भाव काय आहेत, आपल्या गांवचा उदमी काय दरानें विकतो, ह्याबद्दल माहिती मिळविण्याची खटपट न करतां फार तर गांवचे गांवांत पडताळा पाहून माल घ्यावयाचा, व खातें मांडून घ्यावयाचें, आणि पैसा अगर शेतमाल हातीं येईल तेव्हां तो देऊन खातें चुकतें करावयाचें ही पद्धति वेदविद्येंत किंवा कारकुनी कसबांत निपुण अशा पुष्कळ ब्राह्मणांची दिसून येते. खातें फुगलें म्हणजे चांगले वैदिक, गोसावी, पुराणिक मुलुखगिरीला निघत, हजार पांचशें मिळवून आणीत व वाण्याच्या घरीं तसेंच गांठोडें रिचवीत, आणि पुन्हां खातें सुरू करीत; असा परिपाठ बऱ्याच ठिकाणीं नजरेस आला. कुळकर्णी वगैरे लोकांचीही सर्रास हीच वहिवाट आहे, हें त्यांच्या मुशाहिऱ्याच्या वेळीं मामलेदार-कचेरीच्या आजूबाजूला घिरट्या घालणाऱ्या उदम्यांना पाहून कोणालाही ताडतां येईल. कलम बहाद्दर ब्राह्मणसमाजाची ही परवड तर मग इतर निरक्षर समाजांची काय अवस्था असते हें प्रत्यक्ष शब्दांनींच वर्णिलें पाहिजे असें नाहीं. व्यापारपटु गुजराती, मारवाडी, लिंगायत वगैरे समाज आमचेमध्यें शेंकडों वर्षे राहत असून 'सोन्याचा गुण सवागीला' बिलकुल लागला नाहीं. त्यांचा व्यवहार, धूर्तपणा, मितव्यय वगैरे आम-

त्यांत कांहींएक आला नाहीं, आणि व्यापारी कलेंत आम्ही अजून अगदीं वन्यावस्थेंत राहिलों. त्यांनीं आम्हांला भिकारी केलें म्हणण्यापेक्षां श्रीमंत कसें व्हावें, संपत्ति कशी जतन करावी व वाढवावी हें आम्ही त्यांच्या मूर्तिमंत उदाहरणानें देखील शिकलों नाहीं, असें म्हटलें तरी चालेल. हा आमचा दोष आहे. एक तर व्यापाराकडे आमचें आनुवंशिक दुर्लक्ष आणि दुसरें असें कीं, पाण्यांत पडल्याशिवाय पोहतां येत नाहीं. आम्हीही आपण होऊन व्यापारांत पडलों नाहीं, आणि परप्रांतीय व्यापाऱ्यांनींही आम्हांला बोलावून आपले गोटांत घेतलें नाहीं. व्यापारांत पडण्याची जी संधि आजवर आली नाहीं ती पतपेढी आज आमच्या मुठींत आणून देत आहे.

शिल्लक टाकण्याला प्रपंचाची पुष्कळ ओढाताण करावी लागते. सहकारी मंडळींत भांडवल घालावें असा निर्धार केला म्हणजे कांहीं तरी शिल्लक पडावयाचीच. निश्चयाचें बळ । तुका म्हणे तेंचि फळ ॥ ही साधूक्ति त्रिकालीं खोटी होणार नाहीं. तेव्हां पैसे सांचविण्याला शिकणें हा पहिला धडा सहकारी मंडळीपासून शिकतां येईल. शिल्लक पडलीच तर ती सुरक्षित व किफायतशीर ठेवण्याला जागा नाहीं. पोस्टाच्या बँकेंत ठेवावी तर व्याज कमी मिळतें, आणि पोस्टें तरी गांवोगांव आहेत कोठें ? दागिन्यांत गुंतलेल्या पैशाला व्याज नाहीं, व ते झिजतात, आणि विकण्याच्या वेळीं आडवून कोणी त्यांची पुरी किंमत देत नाहीं. ह्या सर्व गोष्टी थोड्या फार कानावरून गेल्या असल्या तरी देखील लोक दागदागिने करतात. ह्याचें कारण असें कीं, अडचणीच्या प्रसंगीं रक्कम उभी राहते. पतपेढीवर ठेविलेली रक्कम जर चालू ठेवींत असली तर तीही अशीच वाटेल तेव्हां मिळेल, व शिवाय तिजवर थोडेंसें व्याजही मिळतें. व्याज मिळविण्याची गोडी एकदां लागली, म्हणजे मनुष्य ओघाओघानें व्याजाच्या आशेनें काटकसरी बनून शिल्लक टाकूं लागतो. व्याज खाणें म्हणजे काय ? हें पिढ्यान्‌पिढ्या ज्या लोकांना माहीत नाहीं अशांना व्याजाची चटक सहकारी मंडळीनें लावली तर हा केवढा मोठा लाभ आहे

बरें ? कोणता इसम वायदा चुकविणारा नाहीं, शब्दाचा धड कोण नाहीं, थापाथुपीवर पैसा मिळविणारा कोण आहे, पैसा बुडविणारा कोण आहे, केव्हां तगादा केला असतां पैसे निघतील, पैसे काढण्यास काय काय उपाय योजावेत इत्यादि गोष्टींकडे सहकारी मंडळीच्या सभासदांना अतिशय बारीक नजरेनें पाहिलें पाहिजे. अशी नजर गुजराती, मारवाडी ह्यांना असल्यामुळें ते तरले आणि ती दक्षिणी मंडळींत नसल्यामुळें त्यांचीं दुकानें बसलीं. गुजराती–मारवाड्यांच्या पोटांत शिरून आम्हीं ह्या गोष्टी शिकावयास पाहिजे होत्या, पण पोकळ घमेंडीमुळें शिकलों नाहीं. आतां सरकारचे देखरेखी व शिकवणीखालीं सहकारी मंडळीच्या सभासदांना त्या आयत्या शिकायला सांपडतील व स्वतःचे पैसे बुडण्याची भीति असल्यामुळें सभासद त्या लवकर शिकतील. तसेंच, सार्वजनिक पैशाच्या व्ययाकडे कानाडोळा करण्याची जी दुर्बुद्धि आमच्यांत शिरली, ती केवळ स्वहितामुळें लयास जाईल, आणि चारचौघांनीं मिळूनमिसळून एकमेकांचें हित कसें साधावें ह्याचेंही उत्तम वळण लागेल. वेळच्यावेळीं पैसे भरण्याची संवय आम्हांला नसल्यामुळें आम्हांला व्याजही जास्त पडतें आणि आमची ही संवय हिशेबांत धरूनच व्यापारी पुष्कळसा नफा घेतात. आपली नापत होईल, नुकसान होईल, या भीतीनें पतपेढीचे कर्जदार सभासद आपले हप्ते वेळच्या वेळीं भरतील, आणि मंडळीही स्वहितरक्षणासाठीं त्याजबद्दल खबरदारी घेईल. सहकारी मंडळी म्हणजे गांवांत नीतिमान् स्त्रीपुरुष बनविणारा एक परीस होईल, व तिच्याजवळ गांवच्या नैतिक गणतीचा आंकडा चटकन् मिळेल. तिच्यामुळें आमच्या भोपळसुती स्वभावाला आळा पडेल. तिच्यापासून दुसरा कोणताही नफा झाला नाहीं, आणि वायदा टळूं न देण्याची संवय जरी तिनें आम्हांला लाविली तरी देखील आमचें कोटकल्याण तिनें केलें, असें समजण्याला हरकत नाहीं.

सहकारी मंडळीनें देण्याघेण्याखेरीज एक गोष्ट ताबडतोब हातीं घेण्यासारखी आहे. कुणबी आपला माल एक सट्टा न विकतां जशी गरज पडेल तसा त्याचा मोबदला करतो. तसेंच खरेदीही तो एकदम न

करतां तात्कालिक जरूरीप्रमाणें करतो. आज अमुक जिन्नस लागला, उपस कणगींतील धान्य आणि घे तो, दुकानदाराचा किंवा सावकाराचा तगादा आला तर घाल त्याला धान्य, आज एका धान्याचें बीं आणिलें, उद्यां खत आणिलें, परवां घोंगडी घेतली, असा त्याचा क्रम चालतो. ह्यामुळें तो विकतो त्या मालाला भरपूर किंमत येत नाहीं व घेतो त्याला मात्र अडून जबर किंमत द्यावी लागते. ह्यापेक्षां गांवचे कुणबी मिळून सर्वांचा माल एकदम विकण्यास काढतील, आणि आपल्याला सर्वसाधारणपणें लागणारे जिन्नस जर घाऊक खरेदी करतील तर त्यांना त्यांच्या मालाची भर किंमत मिळेल, आणि खरेदी जिनसाही पुष्कळ नफ्यानें मिळतील. एक सट्टा माल खरेदीला थेट मोठ्या पेठेचें गिऱ्हाईक गांवीं येऊन उतरेल, आणि पुष्कळ माल मिळतो म्हणून देववेल तितकी जास्त किंमत चढाओढीनें देईल. तसेंच, कुणब्यांना एकदम पुष्कळ जिनसा घेणें असल्या म्हणजे मोठें गिऱ्हाईक म्हणून व्यापारीही सवलतीनें माल देतील. त्यामुळें खेड्यांतील लोक आणि पेठ ह्यांच्यामध्यें व्यापार करणाऱ्यांच्या ज्या अनेक पायऱ्या आहेत, त्या मोडून त्यांचा नफा कुणबी व कसबी ह्यांच्या पदरांत पडेल. कुणबी गांवचा वाणी अगर हळकरी ह्यांच्या आड, तो पेठेच्या उदम्याच्या आड, तो शहरच्या उद-
याच्या आड, तो मुंबईच्या व्यापाऱ्याच्या आड, असें ह्याच्या आड तो त्याच्या
बिचारा चरत चरत सर्व लोणी उडतें, आणि अखेर कुणब्याला अगर
अवस्था घट्ट ताकसुद्धां राहत नाहीं. व्यापार कितीही वाढला तरी हा
ठिकाठि. रा. ' ज्याचें त्याला आणि गाढव ओझ्याला ' अशी त्याची
किंवा शी देसून येते; त्याच्या लंगोटीच्या जागीं पंचासुद्धां येत नाहीं. तेव्हां
घ काणचे व्यापारी व आडत्ये जो अधर फायदा घेतात, तो कुणब्यांच्या
कसब्यांच्या हातीं पडल्यास ते सुसंपन्न कां होणार नाहींत?
विक्री-खरेदी करून खेड्यांतल्या सहकारी मंडळ्यांना
ाऊक मालाची विक्री-खरेदी करून खेड्यांतल्या सहकारी मंडळ्यांना
हा नफा थोड्या श्रमानें मिळेल, व त्याकडे त्यांनीं अवश्य लक्ष द्यावें.

१ संगमनेर येथें पतपेढीच्या दुकानांतून साळ्यांना सूत पुष्कळ पटीनें भावांत स्वस्त व गुणांत सरस मिळूं लागलें आहे.

# फसगत.

गांवमुकादमी उर्फ वतनी ग्रामव्यवस्थेचा वरवर विचार केला तरी एकत्र कुटुंबव्यवस्थेची आठवण झाल्यावांचून रहात नाहीं. एकत्र कुटुंबांतील बायकामुलांसुद्धां झाडून सारीं निदान बहुतेक माणसें जर अंग मोडून काम करणारीं, आजें दुजें न पाहणारीं, एकदिलाचीं, शहाणीं, व दक्ष असलीं तर एकत्र कुटुंबव्यवस्थेसारखी व्यक्तीचें, त्यांनीं बनलेल्या कुटुंबाचें, व एकंदर समाजाचें, हित साधणारी दुसरी संस्था क्वचितच दाखवितां येईल. एकटा मनुष्य कोठें कोठें डोकें देईल ? रोजच्या व्यवहारांत देखील त्याला दुसऱ्याचें साह्य घेतलें पाहिजे. मग प्रपंच चालविण्यास किंवा प्रपंचासाठीं साध्य तो धंदा करण्यास त्याला मदत व सहकार्य पाहिजे हें स्वयंसिद्ध आहे. लांकडाच्या तंगडीचें व कुबडीचें नेट घेऊन चालणारापेक्षां ज्याचे हातपाय आंगचेच आहेत तो कित तरी सुखानें, अवसानानें व जलद चालतो ? त्याचप्रमाणें आपलीं सपिंड नात्यागोत्याचीं, लाभावीण प्रीति करणारीं, जातिवंत कनवळ्याचीं माणसें दूर करून धंद्यांतील सामान्य हितापेक्षां ज्यांचा दुसरा संबंध नाहीं अशा माणसांच्या बळावर धंदा करणें धोक्याचें म्हणून तोट्याचें आहे हें कोणीही कबूल करील. हजारों वर्षांपासून आमच्यांत हुन्नरी लोक प्रचंड कारखानदार नसून घरच्याघरीं आटोपसर धंदा करणारे झाले आहेत; आणि आम्हीं मजुरांच्या पुरवठ्याचा बिकट प्रश्न एकत्र कुटुंबव्यवस्थेच्या जोरावर बराचसा सोडविला आहे. वांटणी झाली म्हणजे सर्व वांटणीदार चाकर न राहतां मालक होतात, आणि एक तर मालकीची सर्व जोखीम त्यांच्यावर पडून त्यांना जरूर तितकी अंगमेहनत होत नाहीं, अगर मालकाचें वारें त्यांच्या अंगांत शिरून त्यांना स्वतः राबण्यापेक्षां हुकमत चालविण्याची जास्त हौस वाटते; व अशा प्रकारें अंगमेहनतीला घरचीं माणसें अपुरीं पडलीं म्हणजे बाहेरचीं लावणें भाग

पडतें. एवंच मजुरांचा प्रश्न उपस्थित होतो. जुनें गेलें आणि नवें हातीं आलें नाहीं, म्हणून सध्यां खेड्यांत काय किंवा शहरांत काय मजुरांच्या तुटवड्याची तीव्रता कशी जाणवत आहे हें सर्वश्रुत आहे. मजुरी अगर अंगमेहनत चुकविण्याची व दुसऱ्याकडून ती करून घेण्याची प्रवृत्ति वांटण्याबरोबरच, किंबहुना त्यांपूर्वीं व त्यांपेक्षां जास्त प्रमाणावर अलीकडे बळावत चालली आहे. तिजमुळें अल्पशा रोजावर 'काम द्या, काम द्या' म्हणणारीं माणसें ज्या देशांत रेलचेल आढळत, तेथेंच आतां 'मजूर नाहीं काय करावें, हें काम पडून राहिलें, त्यांत मजुरीनें कांहीं हातीं लागूं दिलें नाहीं' अशी हाकाहाक ऐकूं येते. एकत्र कुटुंब म्हणजे सेव्य-सेवकभावाचा सर्वतोपरी अत्यंत सुखकर व उत्तेजक म्हणून स्पृहणीय संगम होय. वांटणीपूर्वीं–एक(कर्ता)मालक आणि बाकी चाकर–असें जरी नातें असतें, तरी कुटुंबाच्या लाभालाभांत सर्वांचेंच हिताहित प्रत्यक्ष असल्यामुळें मालक तोच चाकर आणि चाकर तोच मालक असें आशापूर्ण व जबाबदार ममत्व यच्चयावत् कुटुंबीयांमध्यें निर्माण होतें. परंतु हें विसरून घरचीं बहुतेक माणसें कामाची आंच न धरितां कुचराई, चालढकल करूं लागलीं, त्यांच्या मनांत प्रतारणेचा प्रवेश झाला, व तीं आपल्या पोळीवरच तूप ओढूं लागलीं, अवश्य तितकें ज्ञान त्यांमध्यें नसलें, 'जाईल तर सर्वांचें जाईल, माझें एकट्याचें त्यांत कितीसें जाणार, गळफांस लागला तर कर्त्याचे नरडीला, आपल्यापर्यंत येतो कोण,' अशी, एकमेकांविषयीं व कुटुंबाच्या समायिक हिताविषयीं बेपर्वाई सुरू झाली, तर एकत्र कुटुंबाची काय गति होते? एकीकडे त्यांतली मैंद, चुकारतट्टू व खुशालचेंडू मंडळी सावलींत व आरामांत दिवस काढते; तर दुसरीकडे त्यांतले जे मेहनती, शहाणे स्त्रीपुरुष असतात, त्यांना हाडांचीं काडें आणि रक्ताचें पाणी करावें लागतें; कमी पडेल तेथें त्यांनाच उडी घालून खांदा द्यावा लागतो, व प्रसंगानुसार खर्च करून कुटुंबाचें नांव राखावें लागतें, आणि कुटुंबीयांची गैरसोय, हाल दूर करावे लागतात. इतकें करून पुनः भार ना उपकार. 'आमचेच होते

म्हणून आमच्यासाठीं धांवले ह्यांत जगविरहित काय केलें, सावध इसमांनीं कुतंगळांना आपंगिलें म्हणून काय झालें,' असलें तर्कट चालविण्याला सर्व बैठे तयार असतात; आणि अखेर वांटणीची वेळ आली म्हणजे समसमान हिस्सा न घेतां, 'आम्ही अडाणी, आमच्यानें काम होत नाहीं,' असें रड-गाणें गाऊन खर्च व कर्ज दुसऱ्यांवर ढकलून रुसून फुगून ते जास्त हिस्सा उपटण्याला टपलेले असतात. जेव्हां आपला व्यवहार आपल्या आपल्यां-तच होता, परप्रांतीय व परदेशीय लोकांशीं आपला नानाविध संबंध जडला नव्हता, तोंपर्यंत जेथला दाणा तेथेंच राहून कणसुकाळ होता, माणसांचें घर सुटत नसे, व दूरवर कोणी जात नसे. त्यामुळें एकमे-कांचें एकमेकांना अगत्य पडे, व घरच्या, गांवच्या लोकांची दहशत सर्वांना वाटून जो तो कांहीं तरी मर्यादेनें राही. तेव्हां साध्या भोळ्या घरकोंडच्या काळांत हा एकत्र कुटुंबव्यवस्थेचा पांगूळ गाडा ओढणें फारसें जाणवलें नाहीं. आतां तशी स्थिति उरली नाहीं, आणि पूर्वीपेक्षां जो तो अज्ञानानें म्हणा, अनुकरणानें म्हणा, किंवा चिथावणीनें म्हणा, आपल्यापुरतें पाहूं लागला आहे. धाकट्या भावाला थोरल्या भावांतून फोडून त्याला दौलत मिळवून देतों, अशा थापेवर खोटा भरणा दाख-वून त्याच्या मिळकतीची पोकळिस्त खरेदी करून वांटणी झाल्यावर ती पोकळिस्त खरेदीदारांनीं खुशाल गिळंकृत करून 'जोग्यांनीं जोडलें, आणि कुत्र्यांनीं तोडलें' अशा प्रकारचे दाखले शेंकड्यांनीं मोजतां येतील. हें एक उदाहरण झालें, व ह्यावरून दुसरीं सहज ताडतां येतील. तात्पर्य, एकत्र कुटुंबव्यवस्थेचा काळ गेला. आयबहुपायी करून आतां पूर्वी-प्रमाणें तिला सरीस चिकटूं म्हटलें तर कुटुंबांत आळशी, बेजबाबदार लोक जास्त निघून घरच्या दारच्या आपमतलब्यांचें आयतें साधतें व साधेल; आणि 'मेहनती दिलगीर व चोरटे हुशार' अशांतली आपल्या समाजाची स्थिति होईल. एकत्र कुटुंबव्यवस्थेचे आद्य हेतु पुढें ठेवून अलबत चाला, मनुष्य परिपूर्ण प्राणी नाहीं हें ध्यानांत धरून कुटुंबी-यांची कसूर क्षम्य मर्यादेंत आहे तोंपर्यंत ती मनांत आणूं नका, त्यांना

कळकळीनें हात द्या, जिव्हाळ्याच्या स्वकीयांना विनाकारण डावलून परकीयांना जवळ करूं नका, आणि एका दिव्याखालीं दहाजण इमानें-इतबारें आनंदानें नांदा. पण केवळ स्वकीय आहेत म्हणून त्यांना निरुद्योगी ठेवून त्यांचा भार युगेंच्या युगें वाहण्यानें व त्यांच्या दुर्गुणांवर पांघरूण घालीत राहण्यानें नुसती कुटुंबहानिच होते असें नाहीं तर समाजावनतिही होते, ही गोष्ट पक्की लक्षांत ठेवा.

गांवगाडा म्हणजे एकंदर गांवचें एकत्र कुटुंब; त्यांत कुणबी हा कारभारी, स्थायिक वतनदार हे कुटुंबीय, आणि फिरस्ते सोयरे किंवा इष्टमित्र असा थाट दिसून येतो. वेळीं अवेळीं परदेशस्थ-प्रवाशी आमच्या गांवगाड्याचे फार स्तुतिपाठ गात आले आहेत, आणि त्यावरून आम्ही आपली अशी समज करून घेतों कीं, एका काळीं आमचा गांवगाडा म्हणजे मानवी चातुर्याची पराकाष्ठा होती; आणि आतां इनामदार, वतनदार, जातधंदे, वतनें नाहींशीं होत चालल्यामुळें त्यांत बिघाड झाला आहे. गांवमुकादमानींत कांहीं वतनदारांची योजना सरबराईकडे असे. कोणी पांथस्थ आला तर त्याची बरदास्त गांवखर्चानें होई. त्याला शिधापाणी द्यावयाचें, व घोडे, गाडी, म्याना, वाटाडे, भोई वगैरे देऊन आपले हद्दींतून त्याची रवानगी करावयाची हा धारा असे. गांवचें उत्पन्न बहुतेक सर्वांना वांटलें जात असे, व गांवांतच अनाथ-अपंगांच्या अन्नवस्त्राची सोय लागे. तेव्हां 'दामाशिवाय काम नाहीं' अशा देशांतल्या पांथस्थांना फुकटच्या पाहुणचाराचे ढेकर देतांना आमचा गांवगाडा स्पृहणीय दिसला, तर त्यांत आश्चर्य तें कोणतें? 'उपर खूप बने, अंदर राम जाने.' गांवकींतील काम व दाम ह्यांचा त्यांनीं जरा हिशेब पाहिला असता तर त्यांना असें आढळून आलें असतें कीं, गांवचा सर्व भार कुणब्यानें आपल्या माथीं मारून घेतला व अडाण्यांच्या कामाचा हिशेब न घेतां तो त्यांचा योगक्षेम चालवीत आहे, आणि काम केलें केलें, न केलें न केलें, अशा बेजबाबदारीनें ते कुणब्याच्या जिवावर दिवस काढीत आहेत. एकत्र कुटुंबांतील कर्ते स्त्रीपुरुष व त्यांच्या छत्राखालचे नातलग ह्यांचा जो संबंध

तोच कुणबी आणि अडाणी ह्यांचा होता व आहे. एकत्र कुटुंबांत नाहीं म्हणण्याला जिव्हाळ्याचीं, आंतड्याकातड्याचीं माणसें तरी असतात. गांवगाड्यांतील खुंटांत फूट पाडण्यास कुटुंबभेद, जातिभेद, हितभेद वगैरे किती तरी स्फोटक कारणें आहेत. घटकाभर असें मानलें कीं, गांव वसविणारे कुणबी आणि त्यांचे अडाणी सहकारी अगदीं जिवास जीव देणारे होते, तरी हा भाव त्यांच्या वंशजांत किती पिढ्या, किती शतकें टिकणार हें गांवगाड्याच्या अभिमान्यांनींच प्रांजळपणें ठरवावें. 'तुझें तें माझें आणि माझें तें तुझें' ह्या भावनेच्या आंखावर गांवगाडा भरला, आणि कुणबी व अडाणी ह्यांची शेत-उत्पन्नांत सरकत ठरली. ही भावना जस-जशी कमजोर होईल किंवा युगांतरानें कुणब्याला अडाण्यांचा उपयोग कामकमतरतेमुळें, कसबकमतरतेमुळें किंवा कामकुचराईमुळें जसजसा कमी होईल तसतशी ही सरकत तुटली पाहिजे, किंवा तिची आणेवारी तरी फिरली पाहिजे. स्वराज्यांत गांवच्या दरएक बाबतींत जरी सबंध गांव एकजथ्यानें जबाबदार धरला जात असे, तरी त्यांत जे कोणी धेंडें असतील ते पुढें होऊन सर्व भार भिडस्त कुणब्यावर घालून गांवची जबाबदारी पार पाडीत. 'गांवापुढें कोठें जावें' असें म्हणून तो स्वस्थ बसे, आणि त्याला कोणी बोल बोलूं देत नसे. कधीं असेंही होई कीं, राजाधिकारी, धर्माधिकारी किंवा बंडखोर एखाद्या गांवकऱ्याबद्दल किंवा सबंध गांवाबद्दल गुन्हेगारी अगर लूट गांवच्या पुढाऱ्यांपासून घेत, आणि इतर हिस्सेरशीनें त्याची भरपाई करीत. पण ' राखील तो चाखील ' ह्या वहिवाटीप्रमाणें पुढाईतांच्या पदराला खार न लागतां अशा बाबतींत त्यांचा उलट लाग लागे. त्याचप्रमाणें कांहीं गांवकीचा खर्च निघाला तर तो यथान्याय सर्वच देत, असें घडत नव्हतें. संभावितावर त्याचा भार पडावयाचा आणि कलभांड निसटून जावयाचे, असली त्याची हिस्सेरशी सामान्यतः होत असे. कुणबी आणि अडाणी ह्यांच्या बोजांची वांटणी बहुधा कुणब्याला प्रतिकूल होत असे. त्याचें उत्पन्न डोळेफोड असल्यामुळें त्याला हरभऱ्या-च्या झाडावर चढवून देऊन बहुधा अलाय-बलाय अडाणी त्याच्यावर

लोटीत. वतनदारांकडे नजर फेंकल्यास हाच नमुना दिसेल. पाळीप्रमाणें पाटील किंवा कुळकर्ण्याची नेमणूक होते, आणि नेमलेला पाटील किंवा कुळकर्णी वाकबगार नसला तर नातलग म्हणून कांहींएक मोबदला न घेतां त्याचें काम त्याच्या हुषार भाऊबंदास ओढावें लागतें, आणि त्याजवर पांघरूण घालावें लागतें. पाटीलकुळकर्ण्यांची जबाबदारी नेमलेले इसमावर तरी असते. महारजागल्यांची जबाबदारी समस्त महारजागल्यांवर असते. त्यामुळें त्यांपैकीं जे विशेष कुचर असतात, त्यांचा घाव जे सालस व भिऊन वागणारे असतात, त्यांना सोसावा लागतो. सुतार, लोहार, चांभार, कुंभार, न्हावी हे असाम्या वांटून घेतात. तथापि त्यांमध्यें जे विशेष तरबेज असतात त्यांच्याकडे त्यांच्या गैरहुषार भाऊबंदाच्या असाम्या जातात, आणि आपलें काम नीटनेटकें करून घेतात. त्याबद्दल त्यांना पूर्ण मोबदला मिळतो किंवा त्या त्यांच्या असाम्या होतात असें नाहीं. भाऊबंदकी पेशामुळें त्यांना तसें करतां येत नाहीं. गांवच्या परगांवच्या कोणाही असामीला ते साफ सांगतात कीं, आम्ही जर आज दुसऱ्याचे वतनावर पाय दिला तर तोही आमच्यावर देईल. मात्र अशा कुळांच्या शेतांत गेल्यास तीं त्यांना ठराविक बलुत्याचा कांहीं अंश देतात. कारण मामूल बलुतें–आलुतें त्यांना आपल्या वांट्याच्या कारूनारूंला दिलेंच पाहिजे. बहुतेक गांवांना लोहार, सुतार, चांभार, मांग असतांनाही घिसाडी, शिकलकर, कंजारी, कुंचीवाले ह्यांच्या टोळ्यांच्या टोळ्या गांवगन्ना हिंडतात, आणि वर लिहिलेल्या बलुतदारांचे जातधंदे करून आपलें पोट भरतात. ह्या वस्तुस्थितीवरून हें उघड होतें कीं, बलुत्यापरी बलुतें घेऊन बलुतदार आपली जबाबदारी न ओळखतां कामाची हेळसांड करतात; आणि असामीदारांना आपली गरज त्रयस्थाला पैसे अगर धान्य देऊन भागवून घ्यावी लागते. नांवाजलेले कुंभार, न्हावी, परीट आसपासच्या गांवांत गिऱ्हाईकी करून धान्य अगर पैसे कमावतात. तेव्हां कामासंबंधानें पहातां कारूनारूंच्या अडाणीपणामुळें, कुचराईमुळें, अगर व्यापारवृद्धीमुळें त्यांचें कुणबीकीचें काम कमी पडलें तरी त्यांच्या बलुत्याअलुत्याचा जो मामूल धारा

पडला त्याबरहुकूम ते तें चापून घेतात; आणि आपलें काम वेळेवर किंवा चांगलें होण्यासाठीं कुणब्यांना आपल्या असामीदारांखेरीज गांवच्या किंवा बिछाइती कारागिरांना धान्य अगर पैसे द्यावे लागतात. मुख्य मुद्दा असा आहे कीं, पूर्वग्रहविरहित मनानें विचार केला तर असें कबूल करणें भाग आहे कीं, जातधंद्यावर उभारलेल्या वतनपद्धतींत दामाची, कामाची आणि जबाबदारीची वांटणी, समतोल झाली नाहीं, आणि कधीं काळीं झाली असल्यास ती गांवगाड्यांत तशी राहिली नाहीं. तिचें पारडें केव्हांच झुकलें आणि म्हणून खेड्यांतील बहुजनसमाज जो कुणबी त्याला नाहक बुडावें लागतें.

वतनपद्धतीनें वतनदारांचीं मूळ कामें व हक्क त्यांच्याकडे अव्याहत सर्वांशीं चालूं राहिले असते तरी म्हटलें असतें कीं, 'ताटांत सांडलें काय आणि वाटींत सांडलें काय एकच.' पण तसेंही झालें नाहीं. समाईक जबाबदारीची समतोल वांटणी न झाल्यामुळें 'बाराभाईच्या खेती'प्रमाणें वतनदारांची दक्षता कमी होऊन ते स्वहितालासुद्धां पुरते जागले नाहींत. गांवगाड्याचा उपाध्याय ग्रामजोशी व तो ब्राह्मण असतो. सर्व शास्त्रांचें अध्ययन, अध्यापन करण्याचा ब्राह्मणधर्म असल्यामुळें ब्राह्मण सरस्वतीचे कट्टे उपासक झाले. लोक त्यांना प्रतिभूदेव मानीत असल्यामुळें स्वतःचें ज्ञान आणि समाजाचा पाठिंबा ह्यांच्या जोरावर बाकीच्या जातीप्रमाणें ते बहुशा अक्षरशत्रु राहिले नाहींत. तेव्हां शिक्षणानें येणाऱ्या ज्ञानामुळें त्यांनीं आपली उपाध्यायवृत्ति अछेद्य ठेवण्याला आणि तिची किफायत दुसऱ्या जातींच्या घरांत जाऊं न देण्याला कांहीं हरकत नव्हती. परंतु त्यांच्या हातून असें झालें आहे काय? पाश्चात्यज्ञानरवीच्या प्रकाशानें पाऊलवाट दिसूं लागून जातिजातींत नवीन निर्माण होणारे आधुनिक उपाध्याय वगळले तरी प्रत्येक जातीनें व धर्मानें ब्राह्मणाच्या वृत्तीचे मागेंच तुकडे करून ते आपण तोंडांत टाकल्याचें दिसून येतें. ब्राह्मणाच्या काय आणि कोणाच्याही काय वतनाचा लचका काढण्याला तो काढणाऱ्याला रग, ओघ किंवा हिकमत असली पाहिजे, हें सांगणें

नको. 'गोमा गणेश पितळी दरवाजा' हा मार्ग आमच्या स्वराज्याप्रमाणें स्वधर्मालाही लागूं पडतो. करामत लढवील त्या 'नराला' आम्ही तेव्हांच 'नारायण' करतों. नखाला माती न लागूं देतां देवाच्या नांवावर षोडशोपचार भोगण्याचा धंदा म्हटला म्हणजे तो उपाध्येपणाचा होय; ही गोष्ट सर्व जातींच्या गळीं उतरली, आणि हिकमती ब्राह्मणेतरांनीं निरनिराळ्या देवतांचें व भक्तांचें स्तोम माजवून उपाध्यायपण पटकविण्याला आरंभ केला. कालांतरानें त्यांचे निरनिराळे संप्रदाय ठरून अमुक देवाची अर्चाही अमुक जातीनें अगर पंथानें करावी अशी वहिवाट पडली. शिवाची पूजा गुरव, गोसावी, जंगम ह्यांनीं; विष्णु, हनुमानाची पूजा बैराग्यांनीं; देवीची पूजा भुत्ये, आराधी, गोंधळी, हिजडे ह्यांनीं; बहिरवाची भराडी, कुणबी, माळी ह्यांनीं; खंडोबाची वाघ्यामुरळ्यांनीं; मरेआईची महारामांगांनीं; कृष्णाची मानभवांनीं; कान्होबाची मुसलमानांनीं कमाविली. **राशीन**च्या देवीच्या देवळांत देवीपर्यंत मुसलमान जहागिरदार जातात, आपल्या हातानें प्रसाद अंगारा देतात व देवळांत आपला हक्क उगवतात. पिरासंबंधानें ब्राह्मणापासून तों यच्चयावत् सर्व हिंदूंचें उपाध्येपण मुसलमानांनीं पटकाविलें. हिंदु हिजड्यांचा मागता मुसलमान मुंढ्या आणि हिजडे व कसबिणींचा गुरु सवागी (सौभाग्य देणारा) फकीर झाला. (सवागी फकीर आपले स्वतःच्या हातांत हिरव्या बांगड्या भरतात आणि यच्चयावत् कसबिणींकडून दर पलंगामागें कमींत कमी सवा रुपया दक्षिणा घेतात.) आपच्यांतल्या तेहतीस कोटी देवांची व अगणित साधूंच्या समाधींची पूजा सर्वत्र ब्राह्मण किंवा वर वर्णन केलेल्या वर्गांकडेच आहे असा प्रकार नाहीं. स्थानपरत्वें ती ब्राह्मणांपासून तों भिल्ल, कोळी, रामोशी, महार मांग, मानभाव, मुसलमान यांचेकडेही आहे. या स्थाईक उपाध्यायांशिवाय तिरमल, पांगूळ, वासुदेव, कानफाटे, सुपहलवे, गोसावी, बैरागी, मानभव, फकीर वगैरे फिरस्ते उपाध्याय व भिक्षुक निराळे. सारांश, असा एकही धर्म किंवा ज्ञाति नाहीं कीं जी हिंदूंच्या उपाध्येपणांत व भिक्षुकींत घुसली नाहीं. दरएक जातीचे भिक्षुक प्राचीन काळापासून वंशपरंपरेचे

पुजारी किंवा उपाध्ये, म्हणजे वतनदार बनले आहेत. दर गांवीं असल्या वतनदारांचें व्यक्तिशः उत्पन्न साधारणतः ग्रामजोशाइतकें तरी असतें. ब्राह्मण ग्रामोपाध्यायांचें उत्पन्न व ब्राह्मणेतर भिक्षुकांचें उत्पन्न अशीं वेगळालीं काढलीं तर ब्राह्मणांपेक्षां इतर जातींचे भिक्षुक हिंदूंचा विशेषतः कुणब्यांचा पैसा कितीतरी पटीनें ओढतात, अशी खात्री झाल्यावांचून राहाणार नाहीं. ब्राह्मणवृत्तीकडून वैश्यवृत्तीकडे वळल्यास असें दिसून येतें कीं, दक्षिण प्रांतीं वतनदार शेट्ये, महाजन, नाईक वगैरेंच्या वृत्तीवर लिंगायत, मारवाडी, गुजराती ह्यांनीं जे हल्ले चढविले ते त्यांना उलटवितां आले नाहींत, आणि आज रोहिल्यांनीं सर्वांना मागें टाकलें आहे. लोहार, सुतार, चांभार, या वतनदार कारूंचीं कामें घिसाडी, शिकलकर, बुरूड, कटारी, मोची वगैरे करतात, आणि जो पैसा वर लिहिलेल्या कारूंच्या घरांत जावयाचा तो ते ओढीत आहेत असें नजरेस येतें. भिल्ल, कोळी, रामोशी, महार, मांग, नाईकवाडी, हवालदार वगैरे वतनदार हे पूर्वी गांवचें लष्कर व पोलीस होतें. त्यांनीं चोर, दंडेल, भटकणारे ह्यांच्यापासून गांवाचें रक्षण करावयाचें. तें त्यांच्याकडून न झाल्यामुळें अनेक परस्थ भिल्ल नाईक, तडवी ( मुसलमान भिल्ल ), ठोके, तोडागिरासिये, व भटकणाऱ्या चोर जाती गांवच्या वतनदार बनल्या; आणि जें उत्पन्न गांवकरी ग्रामरक्षकांना मिळावयाचें तें दुर्जनांना व बंडखोरांना मिळूं लागलें. इतकीं उदाहरणें पुरीं आहेत. अशी अवस्था होण्याचें मुख्य कारण हें असावें कीं, अडाणी वतनदारांना वाटलें कीं, कोणताही बोजा पहिल्यानें कुणब्यावर पडणार, व आपल्यांला कांहीं दिनचर्येची फिकीर नाहीं. दुसरें कारण असें दिसतें कीं वतनदारांत जूट व तिनें येणारी संघशक्ति राहिली नाहीं, त्यामुळें त्यांना एका मुसंडीनें आपल्या व एकमेकांच्या वृत्तीवरचे मारे परतवितां आले नाहींत. तिसरें कारण, काम येवो अथवा न येवो व तें कारू अगर नारू करो अथवा न करो त्यांच्या पोटापाण्याची निचिंती असल्यामुळें त्यांचें ज्ञान मंदावत गेलें; आणि वतनदारांच्या प्रकारांत अपरिमित भरती झाल्याच्या योगानें पहिल्यानें कुणब्याचें व मागाहून आपलें स्वतःचें किती

नुकसान आहे ह्याचें धोरण त्यांना राहिलें नाहीं. कांहीं असो, एवढें मात्र खरें कीं, गांव-गाडा मुस्तकीम राखण्यासाठीं आम्हीं हा जो वतनदारांचा कोट रचला, आणि दुसऱ्याचा आंत रिघाव होऊं द्यावयाचा नाहीं असा बेत केला, तो सर्व ढासळला.

गांवगाड्याला याप्रमाणें फटी पडत गेल्या आणि त्यांत निष्कारण कोंदाकोंदी व घुसडाघुसड पुष्कळ झाली. तसेंच त्याला मूलभूत जी एकत्र-कुटुंबव्यवस्था तिच्यांतही ओघानेंच द्वैत शिरलें. सर्व सपिंड आप्तांनीं एकजुटीनें उद्योग करावा; मिळालें तें एके ठिकाणीं करावें आणि सर्वांनीं सुखासमाधानानें एकत्र राहून त्याचा उपभोग घ्यावा; हा मूळचा कयास. परंतु आमच्या वांटण्यांना निर्बंध नाहीं. पैपर्यंत जंगमाची वांटणी आणि वीतभर तुकड्यापर्यंत स्थावराची वांटणी होते. एकत्र-कुटुंब-व्यवस्थेमुळें कुटुंबांत रिकामटेकडे पुष्कळ झाले; आणि जात, धर्म, वतन ह्यांनीं कामें परोपरीनें वांटून टाकल्यामुळें गांवांत बहुतेक अडाण्यांना पुरतेंसें काम राहिलें नाहीं. त्यामुळें गृहकलह, कलागती व कपटी मसलती ह्यांना चांगला अवसर मिळाला. पूर्वीं मुख्य वांटण्या वतनाच्या किंवा स्थावराच्या हात. त्या जितक्या जास्ती होतील तितकें कारूनारूंना अधिक आय मिळणार. गांवगाडा व कुटुंबव्यवस्था अखंड व अभेद्य चालविण्यासाठीं जातिभेदाच्या अनुरोधानें वतनें आस्तित्वांत आलीं. सर्वांचा ग्रह असा ठाम झाला कीं, वतनदारांचें हित-अनहित परस्परांशीं व कुणब्यांशीं जखडून टाकलें म्हणजे त्यांच्याकडून अयोग्य भेदाला मदत होणार नाहीं. परंतु जग इतकें सात्विक नाहीं, व मनुष्यस्वभाव चंचल असतो, हें आम्ही विसरलों. 'जिकडे घुगऱ्या तिकडे उदय उदय.' तेव्हां ज्या पक्षाकडून जास्त नफा त्या पक्षाला बहुतेक वतनदार मिळत; आणि घर फोडीत. जे. डी. मेनप्रभृति युरोपियन ग्रंथकारांचा असा तर्क आहे कीं, जितक्या वांटण्या जास्ती तितकीं श्राद्धें जास्ती झोडण्याला मिळतील, म्हणून घरभेद होण्यास मुख्य कारण ब्राह्मण झाले. किफ़ायतीवरच जर हा कार्यकारणभाव ठेवावयाचा असेल

तर, विभक्त कुटुंबांतून ब्राह्मणांपेक्षां इतर कारूंना पुष्कळ अधिक बलुतें मिळतें. ब्राह्मणाच्या बलुत्यास किंवा दक्षिणेस टंगळमंगळ केली तर चालते, पण इतरांशीं तसें करून चालत नाहीं. काम अडतें किंवा नुकसान होतें. हा फरक लक्षांत ठेवला तर वांटण्या होण्याला जास्त उत्तेजन ब्राह्मणेतर कारूनारूंकडूनच मिळालें असलें पाहिजे असें बोलणाराचें तोंड धरवणार नाहीं. कोणाच्या आपमतलबानें वांटण्यांना प्रोत्साहन मिळालें हा प्रश्न गौण आहे. शेत राखण्यासाठीं कुपाटी केली व तिनें शेत खाल्लें कीं काय असें विचारल्यास होच म्हणावें लागेल. एकत्र–कुटुंब–व्यवस्था कधींही मोडूं नये म्हणून वतनदार गोळा केले, आणि त्यांच्याकडून स्वार्थामुळें ह्या आद्य हेतूचें पालन झालें नाहीं, हें वतनांच्या आणि वांटण्यांच्या घडामोडी व त्यांत वतनदारांनीं दाखविलेली पक्षांधता ह्यांवरून सहज सिद्ध होण्यासारखें आहे. एकत्र–कुटुंब–व्यवस्थेचें मूळ आमच्यांत व्यक्तिशः व समुच्चयानें हरएक बाबींत अगदीं पाताळापर्यंत गेलें होतें. एकत्र राहण्यानें एकमेकांची एकमेकांना अतिशय माया लागते; व स्वकीय दुर्गुणी असला तरी त्याला सांवरून धरणें, त्याचें उणें पडूं न देणें हा आपला धर्म आहे असें लोक समजतात. वांटणी करण्यानें कर्त्याचा नादानपणा दिसतो, व कुळाचें नांव जातें, असें सर्वजण मानतात. ह्या व अशाच इतर कारणांमुळें आमच्यांत फार वांटण्या झाल्या नाहींत. सबब कितीही रखडपट्टी झाली तरी एकवट रहावें असें अजून देखील आम्हांस वाटतें, व डोळ्यावर कातडें ओढून आमचीं कुटुंबें एकत्र राहिलीं आहेत, ह्याचें श्रेय वतनपद्धतीकडे किंवा जातिभेदाकडे फारसें येत नाहीं.

वतन संपादन करणारे गुणाढ्य असले पाहिजेत, ह्याबद्दल वाद नाहीं; आणि पुत्रवात्सल्यानें त्यांना असेंही वाटलें असावें कीं, आपले सर्व गुण यावच्चंद्रदिवाकरौ आपल्या संततींत अबाधितपणानें उतरतील व वाढतील. पण त्यांची ही आशा सृष्टिनियमाविरुद्ध आहे असें मानवी अनुभव सांगतो. गुणोत्कर्षाला महत्त्वाकांक्षा लागते, आणि महत्त्वाकांक्षेला चढाओढीचा लकडा व बक्षिसाचें आमिष लागतें. निव्वळ क्रियेसाठीं विद्या

आणि गुणासाठीं गुण कमावणारा म्हणजे नांवासाठीं मरणारा अवतारी पुरुष विरळा. जात व वतन ह्यांचा आणि चढाओढीचा पुरता दावा आहे. आपली भाकर आपल्याला वंशपरंपरेनें मिळणार, ती कोणी काढून घेत नाहीं, अशी मनाची खात्री पटल्यावर आपला हात, आपलीं हत्यारें, आपला स्वभाव, सुधारण्याची खटपट व दगदग कोण करतो ? बरें, मेहनत करून कसब संपादिलें आणि सुधारणा केली, तरी मामूल वहिवाटी-पेक्षां गुणांप्रमाणें जास्त बलुतें देऊन गुणांचें चीज कोण करणार ? अंधेर नगरी बेबंद राजा, टक्का शेर भाजा और टक्का शेर खाजा या दोहऱ्यांत वतनी पद्धतीच्या मेहनतान्याचें चांगलें वर्णन आहे. दुनियेभर निरखाच्या बाबतींत लोक वहिवाटीलाच धरून बसतात, आणि मामूलपेक्षां कोणी जास्त मागूं लागला तर विचार न करितां ते रागावतात. युरोपियन बुटाला लोक ५।६ रुपये देण्यास कुरकुरत नाहींत. पण कातडें महाग झाल्यामुळें गोविंदा चांभारानें जोड्याबद्दल अनादि काळापासून चालत आलेल्या किं-मतीपेक्षां चार दोन आणे जास्त मागितले कीं लोक लागले त्याची निर्भ-त्सना करण्याला, कां तर दोघेही वतनदार. ह्याचा परिणाम कसबी लोक आणि त्यांचे धनी या दोघांनाही म्हणजे सर्व देशाला अनिष्ट झाला आहे. कला कुस-री वाढेल तर माणसांच्या सुखांत भर पडेल. ती वाढविण्याला कसबी लोकांना लकडा व आमिष नसल्यामुळें आमचे ज्ञानाला रुणा लागला, आणि प्रत्येक पिढी असें गाणें गात राहिली कीं वडिलांचें हरएक बाबींत ज्ञान, सामर्थ्य, अधिकार कोणीकडे ? आतांच्या दिवसांत तसे पुरुष राहिले आहेत कोठें ? पुराणांतल्या कथा खऱ्या मानल्या तर अशी कबुली द्यावी लागेल कीं, आमचे कौशल्याला व शक्तीला एकसारखी उतरती कळा लागली, आणि ह्याचें कारण जातिधर्मांत व वतनी पद्धतींत मनुष्याचा आळशीपणा, आशाळूपणा, आपमतलबीपणा वगैरे हीन गुणांचा पुरता हिशेब धरला नाहीं, हें असावें. गतकुळी पड जमिनीची कोणी निगा करीत नसल्यानें ज्याप्रमाणें तिच्यांत एकादें झाड चुकून वाढतें, पण बाकी सर्व मूठ मूठ वीत वीत उंचीचीं झुडपें दिसतात; त्याप्रमाणे दैन्य व अपेष्टा पत्करून चढा-

ओढ नसतां केवळ उपजत अंगस्वभावानें ज्यांनीं गुण संपादन करून कीर्ति मिळविली असे हरीचे लाल वतनदार कसबी लोकांमध्यें फार थोडे निघाले. आम्हांला कोठें जावयाचें आहे राजधानींत? वडिलांची वाकळ खाऊन खेड्यांत मरावयाचें, वडील काय कमी शहाणे होते? जेवढी शक्य तेवढी चतुराई व सुधारणा त्यांनीं करून ठेविली आहे, त्यांनीं पोटापुरतें शिकविलें तेवढें बस्स आहे, असें म्हणणारे बहुतेक निघाले व निघतात. त्यांना वाड-वडिलांचें चातुर्यसुद्धां जतन करण्याची मारामार पडली, तर नवीन कोठून येणार? त्यामुळें झालें काय कीं आमची शेती, तिचीं आउतें, आमचें सामानसुमान आणि कसबी वतनदारांचीं हत्यारें हीं हजारों वर्षें जशींच्या तशीं राहिलीं, किंबहुना तीं एकसारखीं कमकस होत गेलीं; पण त्यांत सुधारणा म्हणून झाली नाहीं हें मात्र खात्रीनें सांगतां येईल. ही अधोगति येथेंच थांबती तरी बरें होतें. आमच्यांत सुधारणा झाली नाहीं इतकेंच नव्हे तर दुसऱ्यांनीं केलेली सुधारणा हस्तगत करण्याची ही मारामार होऊन बसली. सुधारलेले नांगर, पंप, शेतकरी कां घेत नाहींत व श्रीमंत होत नाहींत ह्या गोष्टीचा आम्ही डोकें खाजवून खाजवून विचार करतों. पैसा कोणाला नको आहे? पण शेतकरी विचार करतात कीं, ह्या सनंगांचा खिळा निघाला तर तो बसविण्याची पात्रता गांवच्या वतनदार मिस्तरींत नाहीं; तेव्हां उठल्या बसल्या कोठें जा मुंबईस? त्यांत असली पात्रता नसली तरी त्याचें बलुतें कमी पडत नाहीं. मग त्यानें तरी ती अंगीं आणण्याची यातायात कां करावी? ज्या शक्तीचा किंवा अवयवांचा प्राणी उपयोग करीत नाहीं ती शक्ति व ते अवयव केवळ निरुपयोगानें लोप पावतात, असा सिद्धांत आहे. तेव्हां हजारों वर्षें जर आम्हीं आपली कल्पना चालविली नाहीं, तर ती लुप्त झाली; आणि आमच्यांमध्यें नवीन शोध, कल्पना, योजना बहुतकाळ झाल्या नाहींत व होत नाहींत, आणि दुसऱ्यानें केलेल्या सुधारणांचें आकलन व ग्रहण आमचेकडून होत नाहीं, ह्यांत नवल मानण्यासारखें कांहीं नाहीं. घाण्याभोंवतीं जसा डोळे बांधून बैल एकसारखा फिरतो, त्याप्रमाणें जातकसबी लोक वडिलांनीं दाखविलेल्या वाटांनीं चालत

आले आहेत. सुधारणा घडून येण्यास व्यक्तिवैचित्र्यास पूर्ण वाव पाहिजे. तो संप्रदाय-प्रधान वतनी पद्धतींत कसा मिळावा ? वडिलांनीं जें हत्यार पांच बोटांनीं धरलें तें जर कोणी तीन बोटांनीं धरूं लागला तर बाकीचे त्याचा उपहास करतील, इतकेंच नव्हे तर त्याला पाण्यांत पाहून वेळेला जातीबाहेर टाकतील, अशी वतनी कसब्यांची स्थिति आहे. मातकामाला वड्डरांचीं हत्यारें चांगलीं असें सर्वजण पाहतात. परंतु इतर जातींचे लोक मातकाम परंपरेच्या निकामी हत्यारांनीं करतात. सरण डोक्यावरच महारांनीं वाहिलें पाहिजे, अशी रूढि आहे. तेंच दुसऱ्या जातींच्या गरीब मजुरांनीं किंवा गाडींत घालून नेलें तर वाहतूक कमी पडेल. पण तसें करतां येत नाहीं. दोन शिंवांशेजारच्या गांवांत आणि घराशेजारच्या घरांत भिन्न रूढि दिसते, आणि ती पिढ्यानुपिढ्या पाळावी लागते. तिच्याविरुद्ध चालतां कामा नये. जातिधर्मानें हिंदी समाजाला रूढीचे गुलाम केलें व वतनपद्धतीनें हा दोष जुलूम वाढविला. सर्कस व जादूगिरीचें उदाहरण घेऊं. गोपाळ, कोल्हाटी, ह्या कसरती जाती, वाघ अस्वलांचा खेळ करणारे दरवेशी, बैलांचा खेळ करणारे तिरमल, व माकडांचा खेळ करणारे कुंचीवाले, चित्तर वगैरे पाखरांचा खेळ करणारे फांसपारधी, नाग, धामीण, व नजरबंदीचा खेळ करणारे मदारी व मांगगारोडी ह्या आमच्यांतल्या सर्कस व जादूगिरी करणाऱ्या वतनदार जाती होत. ह्यांशिवाय मराठे, मुसलमान, चाबुकस्वारीचें काम करतात. विचार करा कीं, व्यक्तिवैचित्र्याला पूर्ण मुभा असती, तर युरोपियन सर्कसचीं सर्व कामें करण्यास ह्यांना कितीसे अधिक श्रम करावे लागले असते ? पण ती नसल्यामुळें युरोपियन व एतद्देशीय सर्कसवाले खोऱ्यांनीं पैसे ओढतात, आणि हे गांवोंगांव खळीं मागत व चोरीत हिंडतात. आमच्या घरांतला पैसा परप्रांतीं किंवा परमुलखीं खेंचणाऱ्या कोणत्याही कला घ्या. त्या आमच्यांत नाहींत, असें नाहीं. त्या आमच्यांत आहेत. पण निःस्नेह वतनी पद्धतींत व कोंदट जातिधर्मांत व्यक्तिगुणाचा परिपोष हजारों वर्षें न झाल्यामुळें आमच्यांत त्या अगदीं निकृष्ट व जर्जर

स्वरूपांत आहेत, आणि इतर राष्ट्रांमध्यें चढाओढ व योग्य मोबदला ह्यांनीं त्यांचा परिपोष केल्यामुळें त्यांना जोमदार व मोहक स्वरूप प्राप्त झालें आहे असें दिसून येईल.

गांवगाड्याची भरती करण्यामध्यें असा प्रधान हेतु स्पष्ट दिसून येतो कीं, सर्व प्रकारच्या हुन्नरी लोकांना स्थावरामध्यें गुरफटून घेऊन, व गांवांत वंशपरंपरेचें उत्पन्न मिळण्याची त्यांची तरतूद करून देऊन ज्याचें त्याचें अखंड लक्ष आपापल्या कलेकडे लावावें म्हणजे गुणपोषण व गुण-वृद्धि साधेल, आणि त्यांचा फायदा गांवाला मिळेल. वतनवृत्ति देऊन गांवगाड्यानें सर्व हुन्नऱ्यांना निर्धास्त केलें खरें, पण आद्य हेतूप्रमाणें ते चालतात किंवा नाहीं ह्याची चाळणा करण्याचें सोडून दिलें. ह्या हल-गर्जीपणामुळें कामकऱ्याकडे लक्ष न पुरविणाऱ्या धन्याचे चाकर ज्याप्रमाणें काम न करतां आपला रोज मात्र खरा करतात, तशी गांवगाड्याची अवस्था झाली, व खेड्यांतले हुन्नरी बहुतेक कवडीमोल झाले. आपल्या कसबांत ज्यांला डोकें काढतां आलें त्यांच्या गुणांचें चीज गांवांत होईनासें होऊन ते गांव सोडून द्रव्यार्जनासाठीं परगांवीं जाऊं लागले. 'ज्या गांवीं भरेल पोटाचा दरा तो गांव बरा.' पूर्वीच्या अमदानींत आतां-प्रमाणें व्यापाराचा फैलाव नव्हता, तेव्हां चांगले कसबी बहुतेक राजधान्यांत लोटत. तेथें त्यांना राजाश्रय व महदाश्रय मिळे. ह्या वैश्ययुगांत राजाश्रयाची जागा व्यापाऱ्यांनीं पटकावल्यामुळें आतां खेड्यांतले चुण-चुणीत व खणखणीत लोक शहरचा रस्ता सुधरतात, व ज्याच्या अंगीं विशेष वकूब नाहीं, असेच लोक खेड्यांत राहून आपला प्रपंच करतात. वतनाच्या आमिषानें खेड्यांत कसबी लोक डांभून ठेवून कसब जतन करण्याचा व तें वाढविण्याचा जो आद्य हेतु तो कदीमपासूनच नष्ट झाल्या-सारखा आहे. कर्तव्यो महदाश्रयः ह्या तत्त्वाचें अवलंबन करून पाटील कुळकर्णी ग्रामजोशी ह्यांनीं शहरें पाहिलीं. सोनार, सुतार, लोहार, कासार, कुंभार, चांभार, महार, मांग वगैरे सर्वांनीं हाच पंथ धरला. खेडें सोडलेल्या लोकांना जास्त पैसा मिळतो एवढें मात्र खेड्यांत राहिलेल्या

लोकांना चटकन् दिसतें, पण त्यांची करामत—मेहनत मात्र पुरती दिसत नाहीं. खेड्यांत राहून त्यांच्या बरोबरीनें आपली किफायत कशी होईल, ह्या विवंचनेंत ते सदैव चूर असतात. खेड्यांत राहूनही गुणश्रेष्ठत्वानें मनुष्य भरभराटीस येईल. परंतु फार काळापासून खेड्यांत तळावर गळाठा राहत आला आहे. त्यांच्यांत सद्गुण यावेत कसे व कोठून ? गोकळ अष्टमीच्या सुमारास कांहीं ठिकाणीं उंच लटकावलेली दहीं—हंडी फोडण्याचा उत्सव होत असतो. तेथें चढून जाऊन दहींहंडी पहिल्यानें फोडण्याचा मान मिळण्यासाठीं पुष्कळ तरुण लोक धडपड करतात. ती अशी:—जो पुढें चढून जाऊं लागतो, त्याला खालीं ओढून दुसरा वर जाऊं लागतो. याचप्रमाणें तिसरा चवथा पांचवा करतो, आणि अखेर सर्वांना खालीं आणून चढून जाण्याचें ज्याला साधतें, तो सदरहू मान पटकावतो. हाच नमुना खेड्यांतले लोकांचा दिसून येतो. सर्व कारूनारूंमध्यें आपसांत भांडणें चालूं असून हा त्याचें घर घ्यायाला पाहतो, व तो याचें घर घ्यायाला पाहतो. त्यांची भाऊबंदकी इतरांनाही भोंवते. गांवांत तट पडून दुष्टावा सुरू होतो, आणि परगोटां-तल्या लोकांच्या आगळिकी चालतात. ह्यांत त्यांचा सर्व काळ जाऊन ते आपापलीं कामें नीट व वक्तशीर करीत नाहींत. ज्यांचें काम न केलें तर उत्पन्न बुडेल अशी भीति असते, तेवढ्यांचेंच काम कारूनारू करतात, आणि गरीब बिनबोभाट्यांच्या असाम्यांना धाब्यावर बसवितात. अगोदरच कसब कमी, त्यांत चांगले कसबी शहरांत जातात, आणि राहिलेल्या गळंग्यांत आळस चुकारपणा ह्यांची भर पडल्यावर—खेड्याचा ज्ञानप्रवाह कसा जिवंत राहणार ? तो केव्हांच आटला आणि आमच्या पूर्वजांनीं किती दिवसांपूर्वीं तरी आम्हांस बजावून ठेवलें कीं यदीच्छासि मूर्खत्वं ग्रामे वस दिनत्रयं । नवीनस्यागमोनास्ति श्रुतपूर्वं विनश्यति ॥ तळ्या-मध्यें खडा टाकला म्हणजे जरी पहिलें वर्तुळ खड्याभोंवतीं होतें, तरी त्याच्याभोंवतीं दुसरें, त्याच्या भोंवतीं तिसरें असें होतां होतां अखेर सर्व तळ्याभर वर्तुळें होतात. तीच स्थिति समाजाची आहे. समाजाच्या

निरनिराळ्या अवयवांतील गुणावगुण सर्व समाजभर पसरतात. 'आपलेच ओठ आणि आपलेच दांत' व 'तोंड दाबून बुक्क्यांचा मार' असली तक्रार झाडून सर्व जातींचे व सर्व धंद्यांचे गांवढेकरी परस्परांविरुद्ध करतात. ज्यांना पोटभर काळी आहे, असे कुणबी थोडे. तितकी नसणारे फार. अशांमध्यें ज्यांना जास्त प्राप्ति मिळण्याचा संभव आहे, ते गांव सोडतात, आणि बाताबेताच्या अकलेचे गांवीं राहतात. आपणांला जरी ते खेड्यांच्या इतर लोकांप्रमाणें साधे, भोळे, भाबडे, आर्जवी, बावळट, व कमअकली दिसले तरी त्यांच्या विशिष्ट कसबांत ते त्यांप्रमाणेंच दगलबाजी करतात, आणि भाऊबंदी पेशानें (मत्सरानें) त्यांना पूर्ण पछाडलें आहे. सारांश, फुकटखाउपणाचे सर्व अवगुण अडाण्यांत जसे शिरले तसे अखेर ते कुणब्यामध्येंही उतरले. चौकोनी चिरा बनविण्यासारखी परिस्थिति जातिधर्मानें व वतनी पद्धतीनें गुदमरली म्हणून कुणबी व अडाणी ह्यांचें सर्वसामान्य ज्ञान अगदीं शून्यावर येऊन बसलें. तसेंच अनेक शतकांच्या गुलामगिरीमुळें दुसऱ्याच्या पागोट्यावर नजर ठेवण्याची खोड त्यांना लागली, आणि स्वाभिमान व प्रामाणिकपणा नष्ट झाला. शेतकऱ्यांचे दावे आपसांत तोडण्यासारखे लवाद गांवमुनसफ खेड्यांत मिळत नाहींत ते ह्यामुळेंच. हा त्यांचा दोष नव्हे. जातिधर्म व त्याचें अपत्य वतनपद्धाति ह्यांचा हा दोष आहे. साध्याभोळ्या समाजापुरतेच कां होईनात, पण तितके सुद्धां समाजिक व वैय्यक्तिक गुण असणारे सुधे लोक खेड्यांत आढळत नाहींत. तेव्हां वतनपद्धतीची चाळणा करून गुणश्रेष्ठ लोकांना त्यांच्या गुणांप्रमाणें शक्य तितकी किफायत खेड्यांत होईल, अशी परिस्थिति निर्माण केल्याशिवाय खेडीं ऊर्जितावस्थेस येणें अशक्य दिसतें.

इतकें असूनही वतनपद्धति जर स्वस्त असती तर अजूनदेखील तिला ओव्या गायल्या असत्या. पण तशांतलाही प्रकार नाहीं. वतनदार पाटील–कुळकर्णी ह्यांचें काम सरकारला थोडेंसें स्वस्त पडत असलें, तरी त्यांजकडून वेळच्या वेळीं पाहिजे तसें काम बिलकुल होत नाहीं. म्हणून

मुदतशीर, चांगलें व खरें काम करणारे लोक त्यांच्या जागीं आले तर त्यांत एकंदर जनतेचा व सरकारचा निरंतरचा फायदा होईल. महार-जागल्यांचा रयतेला आतां तादृश उपयोग नसतांना ते फुकट पोसावे लागतात; आणि त्यांनीं जें काळीपांढरीचें राखण मामूलप्रमाणें करावयाचें तें सिंधी, कोल्हाटी वगैरेंकडून मोलानें करून घ्यावें लागतें. कारूनारू जें काम करतात, तें रोकडीनें केलें असतां किती बचत होईल, ह्याबद्दल **बलुतें—आलुतें** ह्या प्रकरणामध्यें माहिती दिली आहेच. साधारणतः नवीन सनंगें करण्याला जितका खर्च येतो, तितक्या किंमतीचें मुख्य बलुतें कारूनारूंना डागडुजीप्रीत्यर्थ वर्षानुवर्ष द्यावें लागतें. रोखीनें हजामत केली तर दर डोकीला खेड्यांत सरासरीनें सहा तें दहा आणे साल पडतें; पण त्याच कामासाठीं न्हाव्याला बलुतें रुपया सवा रुपयावर द्यावें लागतें. एका गृहस्थानें आपले गड्याला सुतारकी लोहारकी शिकविली. त्याला हीं कामें बलुत्यापेक्षां फार स्वस्त पडतात असें कळतें. कारूनारू चालढकल व चाळवण्या करतात तें खेरीज. रोखीनें कोणी कुऱ्हाड करण्यास किंवा हजामत करण्यास किंवा आसूड सांधण्यास आला तर लोहार, सुतार, न्हावी, चांभार असाम्यांचें काम एकीकडे सारून रोकडीच्या गिऱ्हाइकाचें अगोदर करतील. कारूनारू आपल्या असाम्यांचें व गांवकीचें जें काम करतात त्याला ‘ गांवगुंडकी ’ किंवा ‘बोभाटा’ म्हणतात. त्यांचें आपापल्या कामांत किती लक्ष असतें, व त्याची योग्यता ते किती समजतात, हें या शब्दांवरून सिद्ध होतें. गांवगुंडकी म्हणजे फसवेगिरी आणि बोभाटा म्हणजे तक्रार. तेव्हां ज्या कामावर आपलें पिढ्यानुपिढ्या पोट चालतें, तें मन लावून काळजीकाळ्यानें न करतां तक्रार न होण्यापुरतें करावयाचें अशी त्यांची पिढीजाद समजूत आहे. किरकोळ बाबतींत कोण तक्रार करतो ? त्यामुळें त्यांचें आयतेंच साधतें. आणखी असें आहे कीं, सर्व कारूनारू आपापल्या कामांत बहुधा तरबेज नसतात, आणि असाम्यांची पिढ्यानुपिढ्या रखडपट्टी व उधळपट्टी चालते. कुग्रामवस्ती नको म्हणतात ती एवढ्यासाठींच. पैसा व श्रम ह्यांत कमी पडत नाहीं.

उलट सरसकट हिशेब जुळविला तर अधिकच पडतें अशी खात्री होईल. पण मोबदला मात्र कारूनारूंकडून अगदीं खोटा व महागाचा मिळतो. त्यांना सध्यां जी प्राप्ति होते ती त्यांच्या अकलेच्या, उद्योगाच्या मानानें बरीच अधिक आहे. ह्याला प्रत्यंतर, हक्क सोडून रोखीनें काम करण्याला एकही वतनदार कबूल नाहीं. लोहार, सुतार, चांभार, न्हावी वगैरे बलुतें सोडण्याला नाकबूल आहेत. त्याचप्रमाणें पाटीलकुलकर्णी (दुमाला गांवचे) व महार जागले. दुष्काळापासून कुणबी खरकला तो सांवरत नाहीं. कारूनारूंची स्थिति कुणब्यापेक्षां पुष्कळ बरी आहे, इतकेंच नव्हे तर त्यांपैकीं कित्येकजण सावकारी करून आहेत. सावकारांना विचारतां पाटीलकुळकर्ण्यांशिवाय कारूनारू क्वचित् कर्जबाजारी आहेत असें समजतें. दुष्काळांत सुद्धां कुणब्याइतकी त्यांची गाळण झाली नाहीं. दिसतांना आपल्याला महारांची इतकी केविलवाणी स्थिति दिसतेना ? पण एकंदरींत कुणब्यापेक्षां ते पुष्कळ हात राखून आहेत. सन १९०५–०६, १९११–१२ सालच्या दुष्काळांत सरकारी जंगलांतलें गवत कापण्याला माणूस मिळेना; व महारमांग कांहीं केल्या गांव सोडून तिकडे जाईनात. पूर्वीं एंजिनियर खात्याकडे महारमांग कामकऱ्यांची गर्दी असे. आतां त्या खात्याच्या कारकुनांना गांठचा विसार देऊन महारवाड्यांत जोडे फाडावे लागतात तरी पुरेसे रोजंदार मिळत नाहींत. जनावरांच्या हाडकांकातड्याला किंमत आल्यापासून महार गांवोगांव सुधारलेले दिसतात. ढोरामागें हाडकें चरबी व कातडें ह्यांचे सरासरी वीस पंचवीस रुपये येतात. तरी त्यांना वास्तविक मिळावा तितका नफा मिळत नाहीं; कारण हाडकें, कातडीं, तरवडाची साल ह्यांचा पेठेचा बाजारभाव त्यांना माहीत नसतो. ज्याप्रमाणें रस पिणारा पिऊन जातो आणि चरकाचें तोंड देखील पुरतें माखत नाहीं, त्याप्रमाणें त्यांची गत झाली आहे.

---

१ पनवेलच्या महारांनीं अजमासें १०० रुपये सालाप्रमाणें हाडकाकातड्यांचा हक्क मिस्तर याकुबभाई नांवाच्या गृहस्थास दिला आहे. महार वर्षानुवर्ष त्यांस हाडकें कातडीं देतात, आणि भाईसाहेब लक्षाधीश झाले आहेत असें ऐकतों!

त्यांना ह्या जिनसा फुकट मिळत असल्यामुळें त्यांजवळन त्या व्यापारी जाती हलक्या दरानें घेतात. तेच व्यापारी त्या भारी दरानें चांभाराला विकतात. ह्यामुळें चांभारकाम फार महाग पडूं लागलें आहे. कांहीं दिवसांपूर्वी कुणबाऊ जोडयाला आठ आणे तें सवा रुपाया पडे; त्याला आतां दोन तें तीन रुपये पडतात. मोटेची किंमत साडेपांच रुपयांपासून १५–२० रुपयांपर्यंत चढली आहे. तात्पर्य, ह्या बाबतींत कुणब्याला महार बुडवितात व महारांला व्यापारी, मिळून कुणब्याची दुहेरी बुडवणूक होते.

वतनपद्धति जशी महाग आहे तशी ती एक प्रकारची जुलमाचीही आहे. दुर्जन पतीशीं संसार करतांना बायका म्हणतात कीं, जसा पूर्वजन्मीं शंकर पुजला असेल तसा मिळाला. असाम्यांनाही असें म्हणण्याची पाळी येते कीं, जसे पूर्वजन्मीं कारू पूजले असतील तसे लाभले. पाटीलकुळकर्णी कितीही उपद्यापी व रयतेची बाजू मांडण्यास बेवकूब असले, तरी कायद्यानें वजा होईपर्यंत ते कशीं तरी गांवें करतात. गांवभट ठोंब्या असला, तरी दुसऱ्या जाणत्या ब्राह्मणाला बोलावून त्याला दक्षिणा देऊन खेरीज गांवभटाचा हक्क द्यावा लागतो. गांवचे महारजागले कितीही कुचर, चोरटे, गुरें–मारे असले तरी ते गांवकामगारांना व रयतेला चुकत नाहींत. कारूनारू कितीही अडाणी असले तरी त्यांच्या असाम्यांनीं त्यांच्याच हातून काम घेतलें पाहिजे. तें त्यांच्या भाऊबंदाकडून सुद्धां घेतां कामा नये. हा जुलूम नव्हे तर काय ? खंडू वारिकाची असामी जयवंतराव पाटील आहेत. खंडूजवळ हत्यारें तर नीट नाहींतच, पण त्याचा हातही जड आहे. पाटील दर खेपेला कातवतात, त्यांचीं लेंकरें खंडबा पाहिले कीं पळतात व हजामतीचे वेळीं रडतात. खंडूचा भाऊ पांडू जरी चांगला कारागीर असला तरी पाटलाला खंडूला नको म्हणून पांडूला बोलावतां येत नाहीं. हीच स्थिति

सुतार, लोहार, चांभार ह्यांच्यासंबंधानें असते. पैसा अगर धान्य देऊन आपले पसंतीच्या कारूनारूंकडून काम घेण्याची असाम्यांना मुभा न ठेवल्यामुळें कारूनारू कसबांत कमी पडूं लागले व शिरजोरही झाले.

वतनपद्धतीमुळें एक अति मोठा समाजविघातक अवगुण आमच्यांत शिरला; तिनें सर्वांला अरेरावी, भिक्षुकी आणि चोर चाळे शिकविले. तिचा अंमल जारी असता तर आगगाडीचीं तिकिटें वर्षानुवर्ष खपलीं नसतीं, आणि वतनदार व त्यांचा माल फुकट न्यावा लागता; आणि इंग्रज सरकार ज्याप्रमाणें दुष्काळांत चाऱ्याच्या वाहतुकीबद्दल भाडें भरपै करतें तसें कांहीं एक लाभलें नसतें. घोडे, गाडी पाहिजे असली कीं, ज्याजवळ गांवांत असेल त्याला त्याचे ग्रामबंधु तगादा लावतात. तुळशी, फुलें, केळीचीं पानें हवीं असलीं कीं, ज्याजवळ तीं असतील त्याकडे मागतात, व त्यांनीं दिलीं नाहींत म्हणजे रागावतात आणि वड्याचें तेल वांग्यावर काढतात. मागणें नको आणि रागावणें नको म्हणून कांहीं लोक हौसेच्या जिनसा जवळ बाळगीत नाहींत किंवा नामांकित उदीम करीत नाहींत. गुऱ्हाळघरची हकीकत मागें आलीच आहे. फळफळावळांपासून तों लोणकढे तुपापर्यंत वाणगी मिळावी अशी इच्छा सार्वत्रिक असते. खेड्यांतले श्रीमंत सुद्धां विचारतात कीं, तुमच्याकडे आंबे, शेंगा, कोबी झाली पण आमच्याकडे वानवळा आला नाहीं. एकटे दुकटे कुणबी किफायतशीर पीक करीत नाहींत तें एवढ्यासाठीं कीं, एकट्यानें केलें म्हणजे तें

१ एका कुळकर्णी वतनदार मामलेदारांनीं आपल्या घराचें सुतारकाम गांवच्या सुताराला दिलें. त्यानें सागवान गैरहिशेबीं कापलें, तेव्हां कळून आलें कीं हा रद्दी कारागीर आहे. म्हणून त्याला रजा देऊन दुसरा सुतार पाहूं लागले. तों बारा कोसांत कोणीही काम घेण्याला धजेना ! तालुक्याच्या ठाण्यांत देखील एका परटाकडे धुणें जाऊं लागलें आणि नंतर त्यानें कपडे फाडले, चोरले, अगर त्यापेक्षां दुसरा काम चांगलें करतो असें कळून आलें तरी पहिल्याला काढून दुसऱ्याला लावतां येत नाहीं, व दुसराही अदावतीच्या भीतीनें पहिल्याचें काम धरीत नाहीं !! हा अनुभव पुष्कळ उपऱ्या नोकरांना असेल.

सर्व वाणगीवारी व शेरणीवारी खपतें. एखाद्याला कां पुरें दिलें नाहीं कीं तो दंश धरतो, आणि तो हलक्या वर्गांतला असला तर तें चोरून नेतो[1]. ह्या फुकटाफुकटीचा परिणाम रास्त कामावर होत गेला. गिऱ्हाइकानें काम करून घ्यावें, काम करणारानें वेतनासाठीं हेलपाटे घालावेत आणि कसब्यानें चाळवाचाळवी व कुचराई करावी, असले दुर्गुण (ह्याला गांवगुंडकी कसब म्हणतात.) सर्वांमध्यें पांगले. येतां येतां हक्काला भिडेचें व भिकेचें स्वरूप आलें. मला अमुक गुण येतो, व त्याचा मोबदला अमुक घेईन, असें गुणीजन म्हणत नाहींत; आणि आपणांला काय द्यावें लागणार ह्याची कल्पना उपभोक्त्यांस नसते. वैद्यानें औषध द्यावें आणि संभावना काय होते ह्याची चिंता करीत बसावें. मालकापुढें हजरी द्यावयाची तुम्ही शिरपाव द्या किंवा नका देऊं असें म्हणून गोपाळ-कोल्हाटी खेळ करतात, आणि ऐपतीप्रमाणें कांहीं दिलें तरी खूष होत नाहींत. बरें, त्यांचीं जिवावरचीं कामें पाहावयाला शेंकडों जमतात, पण थाळी फिरण्याची वेळ आली कीं गर्दी ओसरते; आणि खेळकरी ओरडतो कीं जाईल त्याचें तोंड काळें. रोख पैसे देऊन आपली गरज किंवा हौस पुरविण्याचा सराव खेड्यांत अजिबात मोडल्यासारखा झाला आहे. निदान कामाच्या मानानें रास्त पैसे देणारे घेणारे लोक क्वचित् दिसतात. ह्या सार्वजनिक खोडीमुळें काम नासतें, कारागिरांच्या गुणांचें चीज होत नाहीं, व उधड हिशेबानें होणारे दाम मालकाच्या हातून सुटत नाहींत. म्हणून कामगारांत टंगळमंगळ व चोरटावा माजून राहिला आहे, आणि हे अवगुण अकलेंत मोडूं लागले आहेत. कामाचे किंवा सौद्याचे अगोदर आणि नंतर जी चहूंकडे ओढाताण घासाघीस चालते, तिचें कारण 'रोख भाई ठोक' ह्या व्यवहाराला आम्ही फार दिवसांपासून पारखे झालों हें होय.

येथवर आपण गांवगाड्याच्या समाईक हितासंबंधानें वतनपद्धतीचा

---

१–प्रवरा कालव्याच्या किनाऱ्याच्या एका गांवीं एका जागल्याला चोरून धोसाळीं काढतांना मळेकऱ्यानें पाहिलें. मळेकरी रागावून बोलला आणि दुसरे दिवशीं पाहतो तों वेल खुडलेले !

विचार केला. आतां त्यांतील वतनदारांच्या हितानहिताचा त्यांच्या त्यांच्या पुरता विचार करूं. खेड्यांतले अघाडीचे वतनदार पाटील-कुळकर्णी. खानदेशांत अशी म्हण आहे कीं, 'शेतांत नसावा कुंदा आणि गांवांत नसावा निसुंदा' ( कुळकर्णी ). शेतांत कुंदा कालवला म्हणजे जसें पीक वाढत नाहीं तसा गांवांत कुळकर्णी राहिला म्हणजे लोक सधन होत नाहींत. 'कर्त्याची किंवा करील त्याची पाटिलकी आणि भोगील त्याची संपदा' ही म्हण सर्वत्र प्रचारांत आहे. 'पाटलाची घोडी' हा भाषणसंप्रदायही बराच रूढ आहे, व त्याचा अर्थ असा आहे कीं, पाट-लाच्या गोठ्यांत गवताची काडी नसतां घोडीवर मात्र लिंबू ठरत नाहीं; म्हणजे ती दुसऱ्याच्या शेतांत फुकट चरते. ही लोकांमध्यें पाटीलकुळ-कर्ण्यांची योग्यता! ह्या वरील म्हणींना अपवाद असतील; पण वतनदार पाटीलकुळकर्ण्यांच्या मुशाहिऱ्याच्या सध्यांच्या स्थितींत कानांत तुळशी-पत्र घालून राहणें असंभाव्य दिसतें. वाढत्या महागाईत मुशाहिऱ्यामध्यें प्रपंच भागला नाहीं, तर कोठें तरी पैसे मारलेच पाहिजेत. स्वराज्यांत राजरोष पैसे खाण्याची रूढि पडल्यामुळें पैसे खाऊन पचविण्यांत मोठी शहामत व भूषण मानीत. पैसे खाल्ल्याबद्दल किंवा दुसऱ्याच्या डोळ्यांत धूळ टाकल्याबद्दल एकमेकांना वतनदार सहसा दोष देत नाहींत; न खाणारांना मात्र शेळीचे गलूल (अजागळ) म्हणून हांसतात. ज्याचें नुक-सान होतें तो अगर त्याचे आप्त मात्र ओरडतील; परंतु नुकसान करणाराला दूषण ठेवणारे खेड्यांत विरळा. तेव्हां परद्रव्यापहारासारख्या पातकाबद्दल साधारण लोकांना कांहीं वाटूं नये, व तें कसब गणलें जावें हा नैतिक अधःपात कमी आहे काय ? 'जमेदारकी नरमाई,' गुरमाई उपयोगी नाहीं असेंही म्हणतात. मिंधेपणा असला म्हणजे बाणेदार वर्तन राहत नाहीं. खेड्यांत गेलें असतां पाटीलकुळकर्णी तर हांजी हांजी करणारे दिसतातच, पण त्यांच्या लहान लहान मुलांत सुद्धां पाणी दिसून येत नाहीं. त्यांच्या अंगांतही फाजील लवचीकपणा बाणतो. जनहिताच्या दृष्टीनें स्वाभिमान नाहींसा होणें बरें नाहीं. शिक्षणाची सोय खेड्यांत

नसल्यामुळें व मुलांना परगांवीं ठेवण्याची ऐपत फार थोड्या वतनदार पाटीलकुळकर्ण्यांना असल्यामुळें त्यांमध्यें अज्ञान फार असतें, आणि तें सर्व गांवाला नडतें. निरक्षर पाटील अनेक प्रसंगीं परबुद्धीनें चालून आपल्यांला व आपल्या निरक्षर बंधूंना खोड्यांत टाकतात. तेव्हां पाटीलकुळकर्णी आपल्या मुलाबाळांच्या पदरांत वतनाची दौलत म्हणून दारिद्र्य, अज्ञान व दुर्गुण ह्यांखेरीज दुसरी कोणती टाकणार आहेत ? उद्योग न करतां व चोरीच-पाटीनें कुणब्याचा माल घरांत घालून संसार करण्यांत भिल्ल, कोळी, रामोशी, महार, मांग वगैरे निकृष्ट जातींच्या हलके गांवनोकरांना आज बरें वाटतें. पण ही स्थिति किती दिवस टिकेल ? सर्व जग कांहीं आतां डोळे मिटून बसलें नाहीं. चोरी–चपाटीनें, आळसानें किंवा लोचटपणानें प्रपंच चालवावा अशा भावनेनें त्यांच्या सबंध समाजाला घेरणें ही मोठी नैतिक हानि आहे. उद्योग न करतां प्रपंच चालतो म्हणून ते आपल्या मुलांना शाळेंत घालीत नाहींत, व हुन्नर शिकवीत नाहींत, हें अत्यंत शोचनीय आहे; आणि यांत ते भावी पिढीचें मोठें नुकसान करीत आहेत. बाजेवतनदारांचीही हीच स्थिति. कामापेक्षां व अकलेपेक्षां जास्त नफा पुष्कळांना मिळतो, यामुळें जास्त उद्योग करावा व ज्ञान संपादन करावें अशी ईर्षा ते धरीत नाहीत. वडिलांनीं पोट भरलें तसें आपणही गांवावर पोट भरूं अशी त्यांची खातरजमा असते, आणि त्यामुळें प्राथमिक शिक्षणाचा सुद्धां ते फायदा घेत नाहींत. वास्तविक त्यांचीं कामें मोठ्या कसबांचीं आहेत. हीं कसबें जगांत झपाट्यानें वाढत आहेत, आणि परकी लोकांच्या त्यांवर उड्या पडत आहेत. सुतार, लोहार, चांभार, न्हावी, परीट वगैरे जीं हत्यारें आजकाल वापरतात त्यांकडे पाहिलें म्हणजे असें दिसून येतें कीं, सर्वांजवळ परदेशी हत्यारांचा भरणा झाला आहे. तीं सर्व आपल्या देशांत, नव्हे, गांवोगांव होत होतीं. पण कारूनारूंच्या अज्ञानामुळें व निरुद्योगामुळें त्यांत सुधारणा झाली नाहीं, व तीं मागें पडलीं. हीच अवस्था त्यांच्या कसबांच्या कामांची होऊन बसली. कारूनारूंनीं तयार केलेलीं आउतें निरुपयोगी ठरून कुणबी सुधारलेली आऊतकाठी घेण्याच्या मागें

आहेत. चांभाराचे जोडे मागें पडून जिकडे तिकडे देशी परदेशी बूट फैलावत आहेत. पण गांवच्या चांभारबोवांना कांहीं तें काम सुधरत नाहीं; इतकेंच नव्हे तर मावळी चांभाराच्या वहाणा घाटी चांभारांना करतां येत नाहींत. जगाच्या आजच्या गरजा भागविण्यासारखे कारूनारू तयार करण्याची सोय खेड्याखेडयांनीं होणें दुरापास्त आहे. त्यांनीं खेडीं सोडलींच पाहिजेत, आणि नवीन विद्या शिकून आपला माल योग्य नफा घेऊन गांवकऱ्यांना मिळेल अशी तजवीज केली पाहिजे. तर त्यांचें पुढें चालेल. सारांश, कोणत्याही वतनदारांना आजच्या स्थितींत वतनापासून कायमचा फायदा आहे असें म्हणतां येत नाहीं.

वतनपद्धतीमुळें वतनदारांचें व्यक्तिशः फार नुकसान झालें आहे. त्यांतील होतकरू मंडळीपैकीं जरी कित्येक गांव सोडून अन्यत्र आपल्या बुद्धिवैभवावर आजपर्यंत कमाई करीत आले, तरी पुष्कळांची गति शेवग्याच्या झाडाच्या गोष्टीप्रमाणें झाली आहे. एक श्रीमंत कुटुंब दरिद्रावस्थेप्रत पोहोंचलें. त्यांच्या अंगणांत एक शेवग्याचें झाड होतें. त्याच्या शेंगा गुजरींत स्वतः विकल्या तर आब जातो म्हणून त्या रात्रीं काढून ते एका माळ्याला विकीत, आणि गुपचिप तो देईल त्या किमतीवर गुजराण करीत. कुटुंबांत चार पांच भावांचा विस्तार होता. तेव्हां पाळीपाळीनें कित्येकांना उपवास काढावे लागत. एक दिवस त्यांचा सोयरा रात्रीं मुक्कामाला आला. त्याला व लहान मुलांना जेवण्यास बसाविलें, व बाकीच्यांनीं भूक नाहीं म्हणून वेळ मारून नेली. सोयरा निजला असें पाहून कारभाऱ्यानें नित्यक्रमाप्रमाणें शेंगा माळ्याला दिल्या, आणि त्यांचे दाम घेतले. सोयरा जागा होता. त्याला सर्व अवस्था अगोदर माहीत होतीच, आणि हा प्रकारही त्यानें पाहिला. चार पांच धडधाकट भाऊ आज जे उपवास काढतात, ते या शेवग्यामुळें अशी त्याची खात्री झाली; आणि त्यानें जिकडे तिकडे सामसूम झाल्यावर रात्रींतून झाड कापून काढलें व कोणाला न विचारतां आपले घराची वाट धरली. सकाळीं घरांत जिकडे तिकडे हाःहाःकार झाला.' हगवणीला बायको आणि नागवणीला सोयरा' असें

म्हणतात. ह्या सोयऱ्यानें तर दहा पांच मण धान्य पाठविण्याच्या ऐवजीं अर्ध कोर भाकर देणारा शेवगाही तोडला, म्हणून सर्व त्याला शिव्याशाप देऊं लागले. तो दिवस कसा बसा गेला, आणि रात्रीं सर्व कुटुंब एकत्र जमून त्यांनीं विचार काढला कीं, आतां घर सोडलें पाहिजे. सर्व भाऊ घरंदाज व चांगले असल्यामुळें त्यांना रोजगार लागले, आणि वर्ष दोन वर्षांत घर सुधारलें. नंतर सर्वजण दिवाळीला घरीं जमलेले पाहून तो सोयराही मुद्दाम तेथें आला, तेव्हां सर्वांनीं त्याचे पाय धरले, व कबूल केलें कीं, तुम्हीं झाड तोडलें नसतें तर आम्हांला घर सुटतें ना व आमचें दारिद्र्य जन्मभर फिटतेंना. ही गोष्ट लागू पडणार नाहीं, असें वतनदारांचें एकही घर सांपडणार नाहीं. घरच्या घरीं राहून शक्य असेल तें तेथल्या तेथें मिळवून कसा तरी कालक्षेप करावा, 'अर्धी सोडून सगळीच्या मागें जाऊं नये', ही प्रवृत्ति पुष्कळ होतकरू वतनदारांत बलवत्तर असते. ह्यामुळें त्यांच्या गुणांचा फायदा त्यांनाही मिळत नाहीं, आणि एकंदर जनतेलाही मिळत नाहीं. ठशांचें काम करणारा एक गुणवान् वतनदार तांबट पाहिला. तो जर मुंबईसारख्या शहरांत असता, तर चार पांच रुपये रोजाखालीं जाता ना. पण त्याच्या वतनाच्या गांवीं त्याला अंग झांकण्याइतकें सुद्धां वस्त्र भेटेना. गांव कां सोडीत नाहीं म्हणून प्रश्न केला तेव्हां तो म्हणाला, गांव सोडलें आणि वहिवाट मोडली म्हणजे माझ्यामागें पोराबाळांना कोणी विचारणार नाहीं. वतनदार पाटीलकुळकर्णी व कारूनारू ह्यांच्या घराण्यांत आज किती तरी उमेदवार सुगुण लोक याप्रमाणें खिजबत पडले आहेत ! पूर्वींच्या दामदुकाळ काळांत हुषार लोकांचें अशा प्रकारें होणारें व्यक्तिशः नुकसान जाणवत नसे. आतां तें ज्याचें त्याला तर जाणवतेंच, पण लायक लोक मागें राहून नालायक लोक त्यांची जागा घेतात हें पाहून अतिशय वाईट वाटतें. वतनपद्धतीचे अभिमानी यावर असें म्हणतील कीं, हें सर्व जरी खरें मानलें तरी एकंदरींत वतनपद्धति फार सोईस्कर आहे. रोखीनें व्यवहार करण्यासाठीं कुणब्याजवळ अगर इतर गांवकऱ्यांजवळ वेळेवर धान्य किंवा पैसा असतो कोठें ? कुणब्याचा

किंवा गांवढेकऱ्यांचा उधारीचा व्यवहार फायद्याचा असेल तर गोष्ट वेगळी; पण तो तसा नसेल तर तो जितके लवकर बंद होईल आणि तो बंद करण्याच्या कामांत ज्या येतील त्या अडचणी जितक्या लवकर दूर करूं तितकें बरें. वाण्यांना किंवा बलुतदारांना नांवें ठेवून कुणब्याची स्थिति सुधारते असें नाहीं. त्याची स्थिति सुधारण्यासारखी परिस्थिति निर्माण केली पाहिजे. वतनपद्धति अल्प खर्चाची नाहीं, आणि असेल तर जो तो या वैश्ययुगांत आपल्या कसबाप्रमाणें पैसे चोपून घेत असतांना वतनदारांना तरी कमी वेतनावर काम करण्यास कां भाग पाडावें ? पूर्वीं-प्रमाणें ह्या राज्यांत वतनदार गांवाला अगर वतनाला जखडलेले नाहींत. त्यांना पोटापाण्यासाठीं वाटेल तेथें जाण्याची मुभा आहे. अर्थात् त्यांना गांवीं डांभण्याचा कोणालाही हक्क नाहीं. पूर्वींच्या काळीं वतनपद्धतीचा कितीही उपयोग झाला असला तरी ह्या काळांत ती चालविणें कोणालाही हितकर नाहीं. एकाद्या श्रीमंत जहागिरदारानें आपल्या भोंवतीं मोठा थोरला परिवार जमवावा आणि पुढें संपत्ति नाहींशी झाल्यावर व परिवारापैकीं पुष्कळांचें काम नाहींसें झाल्यावरही तो तसाच ठेवावा हें जसें भोपळ-सुती आहे, तितकेंच प्रस्तुत काळीं सर्व कारू—नारू गांवगाड्यानें ह्मणजे कुणब्यानें पोसणें आहे.

# सारासार.

विवेकें क्रिया आपुली पालटावी । अती आदरें शुद्ध क्रीया धरावी ॥

**रामदास.**

वर्णाश्रमधर्म, जातिधर्म व वतन ही परंपरा आहे. वर्णाश्रमधर्म-व्यवस्थेंत व्यवसाय जन्मसिद्ध झाले, आणि तादितर व्यवसाय करण्याला लोक अधर्म मानूं लागले. वर्णाश्रम आतां नांवाला आहे, असें म्हटलें तरी चालेल. व्यवसायांत बारीक बारीक पोटभेद पडून ते संकीर्णवर्ण, जाती, पोटजाती व आर्येतर जमाती ह्यांच्या गळ्यांत पडत गेले; आणि वर्णा-श्रम-धर्माचीं सहस्रावधि शकलें जाति-धर्माच्या रूपानें दृष्टीस पडूं लागलीं. ह्याप्रमाणें समाज अतिशय विभागला जाऊन, जो तो विभाग आपा-पल्या तोऱ्यांत राहून अमर्याद एककली व एकधोरणी बनला. ह्याचा ढोबळ परिणाम असा झाला आहे कीं, हिंदु समाजाचा अष्टपैलूपणा गेला, आणि आत्मसंरक्षणाच्या कामीं तो लुला पडून त्याची स्वयंपूर्णता नष्ट झाली. आपला विशिष्ट व्यवसाय खेरीज करून बाकीच्या धंद्यास कांहीं कांहीं जाती अजिबात आंचवल्या, आणि एकंदर हिंदु समाज कांहीं धंद्यांना पूर्णपणें मुकून तो दररोजच्या व्यवहारांत देखील परधर्मीयांच्या कह्यांत गेला आहे. जो समाज हरहुन्नरी नाहीं, किंवा वेळ पडेल त्याप्रमाणें धंदा करण्याची ज्यांत सवड ठेविली नाहीं तो मृत-प्राय हीन दीन अवस्थेप्रत कधींना कधीं पोंचलाच पाहिजे. ब्राह्मण तल-वारीची परवा करीतनासे झाले, आणि क्षत्रिय तागडीला तुच्छ मानूं लागले. ऐटींत आल्यावर अजून सुद्धां मराठ-बिंडा म्हणतो पोकळ धोत्र्या ब्राह्म-णाच्या लेखणीला किंवा ढेरपोट्या वाण्याच्या तागडीला कोण हातीं धरतो ? आणि ब्राह्मण म्हणतो लेखणीपुढें तलवारीची काय मात-ब्बरी ? सर्व साक्षर व कलासंपन्न जातींत राकटपणा नाहींसारखा झाला आहे. शारीरिक श्रम पाहिजेत अशा सर्व धंद्यांत ह्या जातींना

माघार घ्यावी लागते. श्रमसाहिष्णु जातींनीं जर ह्यांचें किरकोळ साधें पण आंगमेहनतीचें काम टाकलें तर ह्यांची मोठीच अडवणूक होते व होणार. खेड्यांतल्या कणखर जातींचे लोक मामळभटाच्या शरीर-दौर्बल्याचें सोंग मोठ्या गमतीचें व बोधप्रद आणतात, आणि वर्णनही रसभरित करतात. शेत असून नांगर धरण्याची संवय नसल्यामुळें ब्राह्मणाला शेतीचें उत्पन्न भरपूर मिळत नाहीं. व्यापारी सद्गुणांचा त्यांच्याठायीं लोप झाल्यानें मारवाडी गुजराती त्यांना पातींत घेत नाहींत. मराठा व मुसलमान ह्यांखेरीज इतर दक्षिणी हिंदु जातींना सरकार पलटणींत नुसतें खोकूं देत नाहीं. कारण त्यांतले लष्करी गुण झडून गेले आहेत. गुजरात खानदेशाकडे सावकार लोक गाय-तोंड्या हिंदूंपेक्षां अवसानबाज मुसलमान तगाद्याच्या कामासाठीं जास्त पसंत करतात. चिकाटीच्या व धाकदडपीच्या धंद्यांत हिंदूपेक्षां मुसलमान व पार्शी अधिक यश संपादितात. ताशेवाले, गाडीवान, आतार, दरवेशी, बहुतेक मुसलमान आहेत. गायकसाई सर्व मुसलमान आहेत. वड्डर, कोल्हाटी, कैकाडी, भामटे वगैरे हिंदु जाती डुकरें पाळतात, पण जातिधर्मामुळें त्यांचें मांस विकण्याचा किफायतशीर धंदा ख्रिस्ती लोकांच्या हातांत गेला आहे.

हिंदुसमाजाचा अष्टपैलूपणा नाहींसा होऊन तो ऐहिक व्यवहारांत पराधीन झाला, इतकेंच नव्हे तर धार्मिक बाबतींतही तो पाहुणा झाला आहे. आले वेडसर पाहुणे । ते तों जगाचे मेहुणे ॥ ह्या श्रीसमर्थ-उक्तीप्रमाणें जो उठला तो हिंदूनाच दोन गचांड्या देत सुटला, व तेही मागासलेल्या जातींतल्या मेहुण्याप्रमाणें त्या सोशीत राहिले. हा दोष त्यांच्या युक्तायुक्तविवेकशून्यतेचा व धर्मभोळेपणाचा आहे. हिंदूंच्या धर्मकृत्यांवर महमदीयांनीं चढविलेले हक्क, आणि नाथ, अगाखानी, सुफी इत्यादि पंथ, उच्चरवानें सांगतात कीं, धर्मांतसुद्धां हिंदूंना स्वतःचें म्हणून कांहीं निर्भेळ उरलें नाहीं. हिंदु दैवतांना (देवी, खंडोबा, बहिरोबा, जोतीबा) कंदोरी करावयाची असते; पण तत्प्रीत्यर्थ बकरें मारण्याला व त्याला फात्या देण्याला बहुतेक सर्व हिंदु जातींना मुसलमान मुजावर लागतो.

तेव्हां असा प्रश्न उद्भवतो कीं, आधीं कोण? हीं दैवतें कां मुजावर? मुर्दाड मांस न खाण्याचें कारण मलीक ( पीर ) तसें करूं देत नाहीं असें मांसाहारी हिंदू सांगतात; आणि पीर क्षोभतो म्हणून मुलान्याकडून जनावर हलाल न करवितां स्वतःच तें मारून खाणाऱ्या फांसपारध्यांसारख्या जातींना इतर लोक पांढरींत राहूं देत नाहींत. हलक्या जातींच्या बहुतेक हिंदूंच्या देव्हाऱ्यांत पिराचें ठाणें आहे. भडोच, शहागड, उद्धपूर वगैरे पंच पिरांना मानभाव कुलस्वामी समजतात. गांवीं फकीर नसला तर हिंदू वर्गणीनें परगांवचा फकीर आणून ताबूत करतात, व मोहरमांत फकीर होतात. ताबुतांला नवस करून त्यांच्याखालीं पोरांचें नाक कान टोंचणारे हिंदू वरिष्ठ जातींत सुद्धां आहेत. अशा वेळीं सोनारांची नाहक्क पोळी पिकते. पिराला किंवा दर्ग्याला लोटांगण घालतांना मुसलमान दृष्टीस पडत नाहीं; परंतु दुखण्यांतून उठले म्हणजे हिंदू लांबवर पिराला दंडवत घेत जातात; व लग्नकार्य झालें म्हणजे ब्राह्मणांबरोबर फकिरांना दक्षिणा शिधा देतात, आणि पिराला ओहर-यात्रा करतात. ( दंपत्यें वाजत गाजत जाऊन नैवेद्य करतात. ) सर्व जाती पिराला मलिदा ( नैवेद्य ) नेतात, व मुजावराचा त्यावर फात्या घेतात. कांहीं ठिकाणीं ब्राह्मण कुटुंबें सुद्धां दावलमलिकाला हांजल निघून काळें फडकें गुंडाळून हातांत फावडी घेऊन दोम दोम करीत घरोघर झोळी फिरवितात. ताबूत आणि पिरांचे नवस ह्या प्रसंगीं सर्व जातींचे हिंदू फकीर जेवूं घालतात. हिंदु लोक देवाला नवसानें गाई, पोळ सोडतात; आणि त्यांनीं शेतांत किंवा बाजारांत कशांतही तोंड घातलें तरी त्यांना कोणी वारीत नाहीं. बकरीं पिकांना फार अपाय करतात, त्याच्या तोंडचा ठोम म्हणून फुटत नाहीं. पिराच्या देव्हाऱ्याला हिंदूंनीं डोकें लवविल्यापासून पोळांच्या जोडीला पिराचे बोकड मिळाले, आणि दोघेही बाजारांत व शिवारांत धुमाकूळ घालतात. **वांद्र्याच्या ख्रिस्तमातेला** ख्रिस्ती लोक बहुधा नवस करीत नसावेत, परंतु हिंदूंचे मात्र येथें नारळ फुटतात. सारांश, सर्व व्यवहारांत एकमेकांतून बहुतांशीं फुटून निघा-

लेल्या जातींची ‘ धान्याला बोळा व दरवाजा मोकळा ’ अशी स्थिति झाली. प्रत्येक जात, पोटजात व पंथ इतर जातींशीं व्यवहार आंखडीत व बंद करीत जाऊन आपापलीं धारीं झांकण्यांत गर्क झाले; पण सार्वजनिक दरवाजा मोकळा पडून त्याचा बंदोबस्त कोणालाही करतां आला नाहीं. स्वसमाजस्थैर्यासाठीं इतर जातींशीं फटकून राहण्याची जी चाल जातिभेद निर्माण करणारांनीं धर्माच्या नांवावर पाडली ती हिंदुधर्म व त्यांतून निघालेले दुसरे आचारप्रधान धर्म ह्यांच्या अनुयायांच्या मुळावर आली. जी ती जात किंवा पोटजात आपापल्यापुरतें पाहूं लागली. समाजाचे लहान लहान तुकडे पडून कालांतरानें परस्परांचें संघट्टन जसजसें कमी होत गेलें, तसतसें ते एकमेकांना दूर धरूं लागले; इतकेंच नव्हे तर दुसऱ्याचें कांहीं झालें तरी माझें तात्पुरतें काम भागलें म्हणजे बस्स, असा वीट येण्यासारखा आपपर भिन्नभाव सर्वत्र वाढत गेला. कातडीं रंगवितांना घाण सुटते. तीं रंगविण्याचे जागेबद्दल ढोर, चांभार व इतर जाती ह्यांच्या तक्रारी नेहमीं चालूं असतात. हीच स्थिति कुंभार, लोणारी, परीट ह्यांच्या धंद्यासंबंधानें दृष्टीस पडते. मांग लोक केकताडाचा वाख करतात. त्यासाठीं तें पाण्यांत भिजूं घालून सडवावें लागतें. तें पाण्यांत भिजूं घातलें म्हणजे पाणी नासून त्याला दुर्गंधी येते, आणि असें ऐकिवांत आहे कीं, जर तें विहिरीसारख्या कोंडपाण्यांत भिजत घातलें तर तसलें पाणी पोटांत गेल्यानें जनावरें दगावतात. लांब कोण जातो म्हणून मांग बेधडक एखाद्या कुणब्याच्या विहिरींत किंवा पाणोथ्याला केकताड भिजूं घालतात. जीवदान देण्यांत हिंदू व जैन पुण्य मानतात आणि तत्प्रीत्यर्थ शक्त्यनुसार पैसा खार्चितात, म्हणून फांसपारधी पांखरें धरून आणून मुद्दाम हिंदू-जैनांकडे नेतात व आठ चार आणे उपटून तीं सोडून देतात. सर्व जातींचे लोक मुद्दाम गबर जैन

१–चोपडें येथें श्रीमंत जैन व्यापारी आहेत. सन १९०७ सालीं त्यांच्या उपवासाचे दहा दिवसांत गावांत हत्त्या होऊं नये, म्हणून त्यांनीं हिंदु धीवरांना पंचवीस रुपये आणि मुसलमान खाटकांना सातशें रुपये दिले. १९०८ सालीं खाटकांनीं सदरहू दिवसांत जनावरें न मारण्यासाठीं सदरहू लोकांजवळ हजार रुपये मागितले ! !

किंवा हिंदू गांठून कसाबाला गाय विकण्याची हूल दाखवितात आणि तसें न करण्यासाठीं त्यांजवळून पैसे घेऊन अखेर करावयाचें तेंच करतात. कायदा न मोडतां ज्याला जो धंदा करतां येतो, तो तो करणारच. त्यापासून त्याला पराङ्मुख करण्यासाठीं इतर त्याची मूठ कोठवर दाबणार ? ह्याप्रमाणें सार्वजनिक हित व एकमेकांचा परामर्ष ह्यांविषयीं बेपरवाई वाढत गेली; आणि वीत वीत टीच टीच जमातींनीं भरलेला राष्ट्रपुरुष आत्महत्त्येच्या पंथास लागला. पायाजवळ पाहून प्रत्येक जात शाबूत ठेवण्याच्या भरांत सर्व समाजाची मजबुती अंतरली, व अखेर सर्वांना सर्वांचें एकदिल साह्याचें नेट न पोंचून सर्वच संघ मोडकळीला आले, आणि समाजाच्या हितानहितावर नजर पुरविण्याइतकी दीर्घदृष्टि व समाजाला सर्व बाजूंनीं सांवरून धरण्याचा आंवाका कोणा एकाही समाजविभागांत उरला नाहीं.

वतनपद्धति ही जातिधर्माच्या अपार कुंडाचा गांवापुरता एक लहानसा हौद आहे. तिनें जसें वतनदारांना व्यक्तिशः व समुच्चयानें तुटक, स्वार्थी, व कमजोर करून एकंदर गांवगाड्याचा विचका केला, तीच गति जातिधर्मानें एकंदर हिंदुसमाजाची केली. जें आडांत तेंच पोहऱ्यांत येणार. जे धंदे ज्या जातीच्या हातीं पडले ते तिच्या बाहेर जाऊं नयेत, ह्या धोरणानें जातधंदे धर्माच्या पदवीस चढविले. धंदेवाल्या जातींतील व्यक्तींचा लोभ वाढून त्यांना असें वाटूं लागलें कीं, कांहीं प्रदेशापुरता कां होईना जातधंदा आपल्या विवक्षित कुळांच्या बाहेर जाऊं देऊं नये. त्यांच्या ह्या आपमतलबी धोरणानें वतन निर्माण केलें. वतनांत राजाधिकाराचा अंश प्रमुख व जातिधमात धर्माधिकाराचा अंश प्रमुख असतो; तथापि दोघांनाही समाजाचें पाठबळ लागतें व होतेंही. ज्या कारणांनीं वतनी धंदे खालावले आणि अव्वल वतनदारांच्या हातून गेले, त्याच कारणांनीं अव्वलच्या जातधंद्यांची तटबंदी ढासळली. जात-धंदा आणि वतन ह्या संस्था लोकसंग्रहाच्या आटोपसर बाल्यावस्थेमध्यें समाजस्थिति कशीबशी सांवरून धरण्याला कितीही उपकारक असल्या तरी त्या

जातीजातींमध्यें व व्यक्तीव्यक्तींमध्यें सामाजिक जबाबदारी समतोल वांटून देण्याला, व्यक्तिगुणपोषणाला, आणि त्याच्या द्वारें समुच्चयानें सर्व प्रकारच्या कौशल्यवृद्धीला पूर्णपणें असमर्थ आहेत. वतनदारीपेक्षां जातिधर्माचा व्याप फार मोठा असल्यामुळें त्याचे परिणामही फार खोल व दूरवर गेले आहेत. धंद्यांत जें धर्माचें वारें शिरलें, त्याचा फायदा घेऊन जी ती जात आपलया धंद्यांतला गलिच्छ किंवा कंटाळवाणा भाग तोडून टाकूं लागली; इतकेंच नव्हे तर त्याला निषिद्धत्वाचा डाग देण्यास देखील धीटावली, आणि असलीं कामें करणारांच्या स्वतंत्र पण कमी दर्जाच्या जाती बनल्या. धंद्याची प्रतिष्ठा सर्वत्र आहे, आणि जगांत जोंपर्यंत हाताचीं पांच बोटें लहानमोठीं असणार म्हणजे मनुष्याच्या कर्तुकींत तफावत पडणार तोंपर्यंत माणसांबरोबर धंद्यांचीही प्रतिष्ठा राहणार. धंदा करण्यास आवश्यक अशा शारीरिक, मानसिक व नैतिक गुणांवर त्याची प्रतिष्ठा साधारणतः अवलंबून असते, आणि ती त्याच्या उपयुक्ततेवर टिकते. उपयुक्तता देशकालपरत्वें बदलत जाते. तेव्हां गुण व उपयुक्तता ह्या दुहेरी कसानें धंद्यांच्या शेजेंत चढ–उतार होत गेला, तर तो समाजशाश्वतीस फायदेशीर होतो. एक धंदा दुसऱ्यापेक्षां प्रतिष्ठित ठरला तरी जर एक इसम त्यांना पुरून उरण्यासारखा असला तर तो ते दोन्ही हातचे जाऊं देत नाहीं. ते दोन्ही एकट्याला करतां येणें अशक्य झालें किंवा दोन्ही करण्यापेक्षां एक करण्यांतच त्याचा अधिक फायदा असला, तर तो ते दोन्ही धंदे करण्याच्या भरीस पडत नाहीं आणि श्रमविभागाच्या तत्वानें एकाच धंद्याला हात घालतो. आपल्या देशांत धंद्यांचे सिद्ध व निषिद्ध हे विभाग आणि पोट–जातींपरत्वें दिसून येणारे पोट धंदे हे गुण व उपयुक्तता किंवा श्रमविभाग ह्यांपेक्षां सोंवळ्याओंवळ्यावर बसविले आहेत, असें वर वर पाहणारालासुद्धां कबूल करावें लागेल. कामाला बाट नाहीं, हात बाटत नसतात, हें सत्य आम्हीं केव्हांच झुगारून दिलें, आणि भरपूर काम असो वा नसो अमकें काम निषिद्ध म्हणून झोंकून देऊन रूढीनें ठरविलेलें सूक्त तेवढें करून

राहिला वेळ हातपाय जोडून बसत आलों. ठोंब्या ब्राह्मणाला कोळ्याप्रमाणें टोणग्यावर पखाली वाहून पैसे मिळवितां येईनात किंवा चलाख महाराला लेखणी चालवून डोकें काढतां येईना. ह्याप्रमाणें कोणालाच आपापल्या मगदुराप्रमाणें परजातीचा धंदा करतां येईना. धंदा करणारांच्या बायकांना सुद्धां धंद्याचें काम पडूं लागलें म्हणजे त्या धंद्यांतलें काम वाढलें असें म्हणतां येईल. ह्या मापानें मोजूं गेलें तर महाराष्ट्रांत तरी तशी स्थिति बरींच शतकें नसावी. ‘ सगळी बायको साळ्याची, अर्धी बायको माळ्याची आणि ऋणकरी बायको ब्राह्मणाची’ ही म्हण फार जुनी आहे; आणि ती असें सांगते कीं, विणकाम व बागाईत शेती ह्या दोन धंद्यांतील लोकांपेक्षां इतरांना भरपूर काम पडत नव्हतें. श्रमविभाग झाला पाहिजे; पण तो तोंडाकडील भाग पवित्र व शेंपटाकडील अपवित्र, म्हणून वरिष्ठ जातीनें तोंडांकडून व कनिष्ठ जातीनें शेपटाकडून निमानिम करावा असला नसावा. आमच्यांतील पुष्कळ एक हातीं होण्यासारखीं कामें जातधंद्यांनीं विभागून दिल्यामुळें तिकसतिंगा झाला आहे. सबंध सनंग एक हातीं किंवा एकतंत्रीं म्हणजे एकापायाळूच्या ( दर्दी ) नजरेखालीं तयार झालें तर त्याचे सर्व भाग प्रमाणशीर करून तें सर्वांग बळकट व उपयुक्त बनविण्याकडे कारखानदाराला लक्ष्य देतां येतें. जातधर्मानें ही घडी मोडली, आणि जाती व पोटजाती परस्परावलंबी धंद्यांत गैरवाकब राहून त्यांची एकहाती दोरी सुटली. परदेशगमनाला अटकाव करून पुढें प्रांताप्रांतांचें दळणवळण जातिभेदानें संपुष्टांत आणिलें. सिद्ध-निषिद्धता व स्थानिक रूढि ह्यांच्या चरकांत कसब सांपडून अनुकूलता असतांनाही एक जात दुसरीचा धंदा करीनाशी झाली, इतकेंच नव्हे तर अरूढ पद्धतीनें तो करणाराला वाळींत टाकण्यापर्यंत जातगंगा छळूं लागली. अशा रीतीनें आमच्यांत व्यक्तिस्वातंत्र्य, व्यक्तिवैचित्र्य, चढाओढ हीं पार जिरून गेलीं, व संघटनाशक्ति लुप्तप्राय झाली; आणि जो देश एका कालीं सर्व प्रकारच्या ज्ञानांत, कलांत व सुधारणांत अग्रगण्य होता, त्याचें वैभव इति-

हासांतर्गत झालें. लोकांत धंद्यांची संख्या घटली, व जे हुन्नर जातिधर्माच्या गाळणींतून राहिले ते गचांड्या खात खात बहुतेक तळपायरीवर येऊन पडले आहेत. गेल्या खानेसुमारींत असें प्रमाण निघालें आहे कीं आधुनिक सुधारणेनें जरी वाटेल तितक्या नवीन धंद्यांना जन्म दिला आहे, तरी आमच्यांत शेंकडा ९० लोक शेती व तिच्या भोंवतालच्या खेड्यापाड्यांतून दृष्टीस पडणाऱ्या सोप्या व रासवट अशा अवघ्या सव्वीस धंद्यांत काय ते गुरफटून राहिले आहेत.

धंद्यांची जातवार परोपरी वांटणी झाल्यामुळें लहानशा कामासाठीं सुद्धां दहा घरीं जोडे फाडावे लागतात, व तितक्यांची बोळवण करावी लागते. म्हणून एकंदर खर्चही अधिक येतो, आणि कधीं कधीं कामाच्या निषिद्धत्वामुळें काम अडून पडतें, व अतोनात गैरसोय होते. हल्लीं जी ती जात नीच मानलेलीं कामें टाकून देण्याच्या विचारांत आहे. जात म्हणून तीं कामें करण्याला तिला भाग पाडणें हें सभ्यांच्या समतेच्या युगांत कोणालाच उचित नाहीं. बरें, दुसऱ्या जातीच्या इसमानें तें केलें तर त्याला त्याची जात वांकडें लावते. महारमांग गांवोगांव रस्ते साफ करण्याचें सोडून देत आहेत. भंग्यांचा पुरवठा मुबलक नाहीं. शिक्षण व किफायतशीर धंदे ह्यांचा प्रसार जों जों अधिक होईल तों तों आजपर्यंत गदळ, ओंगळ, म्हणून नीच मानलेले धंदे करणाऱ्या जाती आपलीं पिढीजाद कामें सोडून आपल्या पसंतीच्या धंद्यांत पडतील, आणि समजाचीं आवश्यक कामें पुरातन जातधंद्याच्या व्यवस्थेवर पुढें चालविण्यास बेसुमार खर्च येऊन वेळेला कामकरीही मिळणार नाहींत.

एक जात दुसरीच्या धंद्याला निव्वळ पारखी झाल्यानें जातकसबाचा मोठा बाऊ होऊन बसला आहे; तो इतका कीं, परजातीचा धंदा आपल्याला कांहीं केल्या येणार नाहीं असें सर्वांना वाटूं लागलें आहे, एवढेंच नव्हे तर तो त्यांना त्याज्यही वाटूं लागला आहे. पहाडांत राहणाऱ्या ठाकूर जातीचा माणूस मेला म्हणजे जात जमते आणि प्रेताला म्हणते, " ब्राह्मणाचे जन्माला जाशील तर लिहूं लिहूं मरशील, वाण्याच्या ज-

न्माला जाशील तर तोलूं तोलूं मरशील इत्यादि; पण ठाकराच्या जन्माला जाशील तर जंगलचा राजा होशील. ” आणि जंगलचें राज्य कोणतें म्हणाल तर ना अन्न ना वस्त्र; जंगलांतले कंद आणावेत व खावेत. सोप्या हुन्नरांविषयीं सुद्धां लोक म्हणतात ‘जेनो काम तेनो थाय बिजा करे तो गोता खाय’. दिवसभर ढोरासारखी मेहनत करणारा कुणबी म्हणतो ‘छे, घडीभर बसलें तर कमरेला टिपरूं लागतें आणि हातापायाला कळा लागतात. बसून बसून माणूस उबून जाऊन फटफटीत पडावयाचें. ब्राह्मणांनींच प्रहरानुप्रहर मान वांकवून लिहीत बसावें.’ कोल्हाट्या उड्या, दोरावर चालणें वगैरे कसरतीचीं कामें करणाऱ्या कोल्हाटणी म्हणतात ‘ घटकाभर तमाशा करून आम्ही दिवसभर बसून खायाला सोकलों, तेव्हां आमच्यानें दळणकांडण, खुरपणीखोडणी, कसची होते ?’ परीट म्हणतात कीं दिवसभर भट्टीजवळ बसून रक्त जाळणें आमच्यानें होणार नाहीं, आणि सुतार म्हणतात कीं बसून बसून चांभाराच्या टिऱ्या कशा डेऱ्यासारख्या होतात त्या पहा. हुन्नरी जाती परजातींच्या धंद्याबद्दल तरी नालायकी कबूल करतात. परंतु आयतखाऊ कारूनारू, भिकारजाती, रातोरात ५०–६० मैलांवर दरोडा मारून परत येणाऱ्या चोरट्या जाती साफ म्हणतात कीं, आमच्याच्यानें हुन्नर किंवा धंद्याचे कष्ट होते तर देवानें ज्याचा जन्म त्याला कशाला लावला असतां ? धंद्याची पात्रता

---

१ एंजिनियर खात्याच्या हमेषच्या दुष्काळी कामावर महार, मांग, भिल्ल, रामोशी वगैरे उडाणटप्पू जातींचें काम मापांत भरपूर पडून त्यांना पगारही चांगला सुटतो. सन १९०६ सालच्या मे महिन्याच्या सुमारास **विसापूर** तलावाच्या दुष्काळी कामानजीकच्या एका गांवांत सुमारें ५०।७५ मांगगारोड्यांची एक टोळी उतरली. काळीपांढरींत हे लोक भीक मागण्याला आले, तर त्यांना कांहीं दाणाचारा देऊं नये अशी आसपासच्या गांवकऱ्यांना समज मिळतांच त्यांनीं त्याप्रमाणें केलें; व दुष्काळी अधिकाऱ्यानें दररोज दुसांज पालांत जाऊन हटकणी लावली कीं, तुम्ही कामावर

[ पुढील पान पहा. ]

कांहीं जन्मसिद्ध नाहीं. जातधंद्यांची जातींत कोंडी होऊन त्यांतली कूस इतरांना न कळल्यामुळें 'हातचें सोडून पळत्याच्या मागें' जाण्याचे नादास इतर जाती लागत नसाव्या. पण ह्या आंधळे गारुडाचा परिणाम असा झाला कीं, धंद्यांना ऊर्जित दशेस नेण्यासाठीं नव्या जोमाचीं माणसें मिळालीं नाहींत, आणि ते सांचलेल्या डबकाप्रमाणें नासून व आटून गेले. सर्व जाती परजातींच्या धंद्यांस अंतरल्या, आणि कर्तुकीच्या माणसांना हातपाय हलवायाला व पसरावयाला जागा राहिली नाहीं, व मिळेल तें जातधंद्यांत मिळवून ओली कोरडी भाकर खाऊन हरि हरि म्हणत बसावें लागतें. आणि कोणत्याही धंद्यांत माणसें जास्त

---

[ मागील पानावरून. ]

आलां तर दुष्काळी कानूप्रमाणें सर्वांना काम मिळेल, आणि लहान मुलें, थकलीं भागलीं माणसें, दुखणाईत व बाळंतिणी यांना फुकट भाकरी व औषधपाणीही मिळेल. त्यांच्याजवळची खावटी तिसऱ्या दिवशीं संपली; आणि तो दिवस कसाबसा काढून चवथ्या दिवशीं ते कामावर आले. हे लोक केंस वाढवितात. त्यामुळें डोक्यावर घमेल्यांतून ओझें न नेतां पहिल्यापहिल्यानें घोंगड्यांत बांधून पाठीवर नेत. लवकरच त्यांना कामाचा सराव होऊन सर्वांनीं सप्टेंबरपर्यंत आनंदानें काम केलें. त्या वेळेचे नगरचे कलेक्टर नामदार **मि. जे. पी. ऑर** ह्यांच्या प्रगमनशील व सहानुभूतिपूर्ण कारकीर्दीकडे ह्या प्रयोगाचें श्रेय प्रामुख्यानें आहे. १९०७ सालीं तिरमल्यांच्या एका टोळीला गांवकऱ्यांनीं अशी अट घातली कीं, निंमी माणसें जर गांवचा निवडुंग काढतील तर बाकीच्यांना खळीं मागूं देऊं. याप्रमाणें त्यांनीं तीन दिवस चांगला निवडुंग काढला, व गांवावर निवडुंगपट्टी बसली होती, तिचा अंक कमी करावा लागला. ह्याचा दुसरा इष्ट परिणाम असा झाला कीं, भिकार भिकाऱ्यांच्या मागें झेंगट लागतें, अशी आवई ऐकून आसपास भिकार येणें कांहीं दिवस बंद पडलें. एका मामलेदारांनीं भिल्लांचे खावटीसाठीं वर्गणीनें धान्य जमा करून त्यांना पडीत नंबर लावणीस देवविले व पहिले सालीं इर्जिक घातली. त्यामुळें शेतचोऱ्या कमी होऊन कुणब्यांचा इतका फायदा झाला कीं, ते दुसऱ्या सालींही वर्गणी घेऊन भिल्लांच्या बंदोबस्ताचा तगादा करूं लागले.

असोत कां कमी होवोत, त्या वधघटीचा फायदा एकंदर जनतेला मुळींच मिळाला नाहीं.

आपल्या समाजांत रूढीचें प्राबल्य फार असल्यामुळें एखाद्या धंद्याची उपयुक्तता वाढली तरी त्याचा व तो करणारांचा दर्जा व प्रतिष्ठा वाढण्यास मारामार पडते. वतनदारांच्या ओळींप्रमाणें जातिधर्मानें निरनिराळ्या धंद्यांच्या किंवा त्यांतील पोटधंद्यांच्या प्रती लावल्या आहेत. त्यामुळें जातींना व धंद्यांना कृत्रिम महत्त्व आलें, आणि देशकालमानानें अव्वलच्या प्रतिष्ठित धंद्यांची उपयुक्तता हटली तरी लोकांचा ओघ उपयुक्त धंद्यांपेक्षां प्रतिष्ठित धंद्यांकडे जास्त वळतो. आमच्यांत ब्राह्मणी धंदे, विशेषतः उपाध्यायपण व कारकुनी, मानार्ह गणले आहेत. ग्रामजोशी हा तिसऱ्या ओळीचा बलुतदार असून त्याला लोहार-चांभारांपेक्षां उत्पन्न कमी मिळतें. ही स्थिति डोळ्यांनीं पहात असतांही उपाध्यायपण पटकावण्याकडे जितका ब्राह्मणेतरांचा ओढा दिसतो, तितका जास्त उपयुक्त व किफायतशीर पण कमी प्रतिष्ठित गणलेल्या हुन्नरांकडे दिसत नाहीं. सुतार, गवंड्याला १-१।· रोज पडतो; आणि त्यांची हजरी टिपणाऱ्या कारकुनांना ८४-८५ आणे रोज पडतो. तरी कारकुनी मिळविण्यास ब्राह्मण जितके आतुर दिसतात, तितके सुतार गवंडी कामाला दिसत नाहींत. शारीरिक दौर्बल्य हेंही ह्याचें कारण असेल, पण तें मुख्य खास नाहीं. विहिरी बांधण्यांत कुशल म्हणून ४००-५०० रुपये साल पाडणाऱ्या एका महाराचा ख्रिस्ती धर्म स्विकारलेला मुलगा ६-७ रुपयांच्या मास्तरकीवर खूष दिसला. कारण मास्तरचा मान गवंड्याला नाहीं. एका काळीं अप्रतिष्ठित मानलेल्या धंद्यांची उपयुक्तता व पैदास वाढली असूनही ते धंदे करणारांची समाजांत निष्कारण मानखंडना होते; त्यामुळें सध्यां सदर धंदे करणाऱ्या व प्रतिष्ठित पण कुचकामाचे धंदे करणाऱ्या जाती ह्यांच्यामध्यें विनाकारण जळफळाट वाढतो, आणि प्रतिष्ठित धंद्यांत दाटी व उपयुक्त धंद्यांत पैस, अशी स्थिति उत्पन्न होऊन एकंदर समाजाचें सांपत्तिक व बौद्धिक नुकसान होत आहे.

ढोर , चांभार, महार, होलार, मांग, हलालखोर, मांगगारोडी वगैरे जाती प्रमुखत्वें अस्पृश्य गणल्या आहेत. ह्यांखेरीज इतर कांहीं जाती अ-स्पृश्य समजत, पण त्यांचा विटाळ पुष्कळ कमी झाल्यामुळें त्यांचा नाम-निर्देश करीत नाहीं. हिंदुस्थानांत अस्पृश्य जातींची लोकसंख्या जवळ जवळ सात कोटी आहे. ह्या जातींतले लोक ख्रिस्ती किंवा मुसलमान झाले म्हणजे त्यांचा विटाळ उडतो; व वरिष्ठ जातींचे लोक त्यांना आपल्या घरांत वागूं देतात. परंतु जोंपर्यंत ते हिंदू असतात तोंपर्यंत त्यांना ते शिवत नाहींत, व दाराबाहेर उभें करतात. स्पृश्य पर जातींच्या हातचें पाणी ज्यांना आंघोळीला खपत नाहीं, त्यांना देखील आतिशूद्र मानलेल्या जातींच्या लोकांनीं पाणी भरलेल्या बाटल्यांतलें सोडावाटर पिण्याला चालतें. अस्पृश्य जातींत स्पृश्य जातींचीं बहुतेक आडनांवें व देवकें आढळतात; इतकेंच नव्हे तर पंडीत, साठे, दळवी, काळे, गोरे, भांगरे, पानसरे, पाटणकर, भालेराव वगैरे ब्राह्मणांचीं आडनांवेंही त्यांमध्यें आढळतात व सर्वांचें एकत्व नसलें तरी ममत्व व्यक्त करतात. स्पर्शास्पर्शदोषाचें वास्तविक मूळ कांहीं असलें तरी तो आतां चालू ठेवणें उभयपक्षीं अनिष्ट आहे. त्यामुळें अस्पृश्य जातींचा निरंतरचा पाणउतारा होतो, त्यांना आपल्या शारीरिक व मानसिक पात्रतेप्रमाणें सर्व धंद्यांत पडतां येत नाहीं,

---

१ कार्य निर्विघ्नपणें पार पडावें म्हणून लग्नमंडपाच्या मुहूर्त–मेढीला अगर देवघरांत देवक बांधण्याचा किंवा ठेवण्याचा कुलाचार महाराष्ट्रकर्नाटकांत ब्राह्म-णांमध्यें तुरळक व ब्राह्मणेतरांमध्यें सार्वत्रिक आहे. तो कांहीं कांहीं गुजराती जातींतही आढळतो. उपजीविकेचीं हत्यारें, सनंगें, पशुपक्षी, पाणी, मासे इत्यादींचें देवक असतें. जी वस्तु ज्या कुळीची देवक असते तिला ती कुळी देवाप्रमाणें भजते, तिचा उपमर्द होईल असें कोणतेंही कृत्य करीत नाहीं, आणि लग्नकार्यांत देवप्रतिष्ठेपासून तों मांडवपरतण्यापर्यंत पूजते. गोत्र व देवक ह्यांचा उपयोग सारखाच आहे. सगोत्रांयांचें जसें लग्न होत नाहीं, तसें ज्या दोन कुळ्यांचें देवक एकच असतें, त्या आपणांला भाऊबंद समजून प्रायः एकमेकांशीं शरीरसंबंध करीत नाहींत.

आणि कामाची कोंडी होते. अस्पृश्य जातींतही एक जात दुसरीचा विटाळ धरते. चांभार महाराचे पाणोथ्याला जात नाहींत, महार मांगाच्याला जात नाहींत, इत्यादि. स्पर्शास्पर्श दोष कमी होऊं लागल्याला शेंकडों वर्षे झालीं. इर्जिकींत डफ वाजविणाऱ्या मांगाचा विटाळ कुणबी धरीत नाहींत. बाजारांत, आगगाडींत किंवा जेथें हजारों मजूर जमतात, अशा एंजिनियरी कामावर ब्राह्मण पुरुष व ब्राह्मणेतर स्त्रीपुरुष शिवताशीव धरीत नाहींत. ब्राह्मण स्त्रिया मात्र ब्राह्मणेतर सर्व जातींचा विटाळ धरतात, परंतु पातळें चिटें वगैरेंनीं तो संपुष्टांत आणिला आहे. स्पर्शास्पर्शतेचा दोष धर्मभयानें वाढविला तसा कमीही केला आहे. देवीचे भक्त, आराधी पोतराज, महार-मांग असले तरी ब्राह्मणेतर स्त्रीपुरुष त्यांना शिवतात, कुंकूं लावतात, आणि हाताला हात लावून एकत्र देवीचीं गाणीं म्हणतात. कारण विचारतां ते असें सांगतात कीं, देवी विटाळ धरूं देत नाहीं. शाक्तांत मांगिणीची पूजा आहे. कित्येक ठिकाणीं ब्राह्मणेतर हिंदू ताबुतांत फकीर होऊन मुसलमानांच्या हातची कच्ची रसई खातात; आणि अहमदनगराकडे मढी, जानपिराची यवलवाडी येथें हिंदूमुसलमानांची एक पंगत होते. जीवनकलह व शिक्षणप्रसार ह्या दोहोंच्या माऱ्यामुळें स्पर्शास्पर्शभाव व्यवहारांत दिवसेंदिवस कमी होत चालला आहे, आणि तो अजीबात नाहींसा होण्याचीं सुचिन्हें दिसत आहेत[1]. तर हीच भवितव्यता आपण होऊन लवकर घडवून आणली तर आपली आणि आपल्या मानवबंधूंची दिलजमाई होऊन हिंदुसमाज सत्वर एकजीव हाण्याच्या मार्गाला लागेल. स्पर्शास्पर्शतेच्या स्तोमानें अस्पृश्य जातींना कांहीं कामांची

---

१ दुष्काळांत गांवोगांव पिण्याचें पाणी आटलें म्हणजे चांभार, महार, मांग, ख्रिस्ती वगैरे प्रत्येक जमात पहिल्यानें निरनिराळी विहीर मागून पहाते. त्यांपैकीं उंच म्हणविणाऱ्या जातीनें आपला एक माणूस विहिरीवर ठेवावा, व त्यानें सर्वांना पाणी उपसून घालावें, अशा दुमट्यांत ते सांपडले म्हणजे वाटेवर येतात, व पृथक् विहिराची मागणी सोडून देऊन एकाच विहिरीवर पाणी भरूं लागतात !

मनाई केली आहे. त्यामुळें त्यांच्या उद्योगधंद्याचें क्षेत्र कमी झालें, व इतर जातींना एका कामकऱ्याच्या ऐवजीं अनेक लावावे लागतात; अशी उभयपक्षीं नाहक्क बुडवणूक होत आहे. ह्याखेरीज कामाच्या कोंडीमुळें वेळेला दाम देऊनही काम होत नाहीं, तें वेगळेंच. तेव्हां स्वच्छता व शुचिर्भूतपणा ह्यांच्या अनुरोधानें अस्पृश्य जातींच्या मार्गांतली स्पर्शास्पर्शतेची उटी काढून टाकून त्यांना बारा वाटा मोकळ्या केल्याशिवाय आतां गत्यंतर नाहीं. स्पर्शास्पर्शाचा छाप ज्या जातींवर बसला आहे त्यांपैकीं बहुतेकांचा जातधंदा असा आहे कीं, त्यांत सडकून अहोरात्र मेहनत करण्याचें प्रयोजन नाहीं. **बाळमित्र** भाग १ पान २०९ **'थोरांचें हृदय'** ह्या गोष्टींतील पुढें दिलेला संवाद त्यांच्या सद्यःस्थितीला पूर्णपणें लागू पडतो. " गणोजी—नंतर त्यानें माझे बेंडूस आपल्या मांडीवर बसविलें, आणि तो मला पुसतो तुमचीं मुलें काय करीत असतात. मीं म्हटलें काय करतील ? कोठें झाडाखालीं जाऊन फुलें जमा करून आणतात, आणि त्यांचे तुरे करून विकतात. नाहीं त्या वेळेस काटक्या जमा करतात. तेंही नाहीं त्या वेळेस भीक मागतात. तो म्हणाला छी छी ! हें ठीक नाहीं. अशांत जीव नाहीं. ह्यांत तीं आळशी आणि स्वच्छंदी मात्र होतील. तुम्ही मुलांस कांहीं तरी एखादा धंदा शिकवा आणि मुलींस कोठें चाकरीस ठेवा." सर्व धर्मांच्या व जातींच्या मुलांच्या परीक्षा घेतल्या, तेव्हां असें दिसून आलें कीं, अस्पृश्य जातींतल्या मुलांचें पासाचें प्रमाण इतरांहून जास्त पडतें व कांहींचा नंबरही पुष्कळ वर येतो. ह्या जाती स्वभावतः ताकददार व वस्ताद असतात. ह्या गुणांचा योग्य उपयोग करण्यासारखा रोजगार त्यांना नसल्यामुळें त्या बेलगामी, उधळमाणक्या व स्वाभिमानशून्य झाल्या आहेत. त्यांना काम दिलें तर त्या गमतात, व तें मन लावून करीत नाहींत. भिल्लरामोशांसारख्यासुद्धां स्पृश्य जातींतले लोक एकेक दिवस उपवास पडल्यावर मासे किंवा शिकार धरण्याला जातात. नियमित व पुरेसें काम करण्याचा त्यांना सराव असता तर त्यांची अशी अवस्था होतीना. असो. तेव्हां स्पृश्यास्पृश्य जातींच्या लोकांना पुरेसें काम मिळ-

ण्याची सोय झाल्यावांचून त्यांचा व एकंदर समाजाचा व्यवहार सुरळीत-पणानें चालणार नाहीं.

सर्व समाज परप्रज्ञ व रूढिबद्ध बनल्यामुळें फारा दिवसांच्या वहिवाटीनें जातिजातींच्या गैरसोयी व दोष सर्वांच्या अंगवळणीं पडत जाऊन त्यांचें त्याज्य स्वरूप कोणालाही दिसेनासें झालें आहे. रुपयाला दोन मणांची धारण होती अशा काळांत जन्मास आलेल्या तेहतीस कोटी देव-देवतांचे सण उत्सव व कुलधर्म, आणि अठरा पगड स्वधर्मी व परधर्मी भिक्षुकांचे हक्क सध्यांच्या काळीं चालविण्यांत आपण विनाकारण खोरीस येतों, आणि ऋण करून सण केल्यानें पुण्य लाभत नाहीं, असें कोणाही हिंदूला वाटेनासें झालें आहे. जातिधर्म, कुलधर्म ह्यांनीं निर्माण केलेल्या व अजूनही निर्माण करीत असलेल्या प्रतिषेधांनीं तर एकंदर हिंदु समाजाला भंडावून सोडलें आहे. त्यामुळें अनेक अडचणी सोसाव्या लागतात, आद्याची तोंडबंदी होते, आणि ढोंगीपणा व लपंडाव वाढतात, हें बहुजनसमाजाच्या मनांत सुद्धां येत नाहीं. महारमांगांखेरीज कोणत्याही जातीनें वड, पिंपळ जाळतां कामा नये; त्यामुळें वसवा एकाला आणि सरपण दुसऱ्याला अशी स्थिति होऊन महार, मांग, मुसलमान ह्यांना फुकटफाकट सरपण मिळतें. ब्राह्मणानें स्नेह विकूं नये ह्या आडकाठीमुळें घरीं खिल्लार असलें तरी हा कोरडा राहतो. गिरण्यांमध्यें तयार झालेलें रंगी-बेरंगी बुंदक्यांचें पातळ अगर हव्या त्या रंगाचें चीट ह्यांना रंगीत सुताच्या लुगड्यापेक्षां विटाळ कमी धरतात; त्यामुळें गरीब साळ्याकोष्ट्यांची गिऱ्हाइकी नाहक घटते. वैदूंनीं कंदुरीसाठीं बकरें मारलें तर त्याचें कातडें विकूं नये, तें विकणाराला विभूति लावून जातीबाहेर टाकतात; ह्यामुळें महार कसई ह्यांची चंगळ उडते. खुटेकर धनगरांना जातें, कंजारणीला सूप, फांसेपारध्यांना दिवा व जोडा, अशा अनेक अनेगा आहेत. शेवगांव तालुक्यांतील मढीच्या कान्होबाला तेल (चुना) लावलें म्हणजे मढी, निवडुंगें वगैरे गांवीं रानांत नांगर फिरत नाहीं, व बाळंतिणी देखील बाजेवर निजत नाहींत. अशा प्रकारच्या प्रत्यवायांनीं

धर्माचा अर्थाअर्थी संबंध नाहीं अशा अनेक बाबतींत जातिजातींची व गांवांची हानि व गैरसोय केली आहे. जातिजातींच्या दोषांचें ओंगळ स्वरूप कसें दिसनासें झालें आहे तें पहा. महार, मांग, हलालखोर वगैरेंना व त्यांच्या पदरांत उष्ट्या पत्रावळी टाकणारांना त्याबद्दल कांहींच दिक्कत वाटत नाहीं. उलट उष्ट्यासाठीं वरील जाती धरणें घेतात. कशानेंही ढोर मरो महारमांग त्याची 'माती' खातात; कोणीं दिली नाहीं तर आम्ही उपाशीं मेलों अशी ओरड करतात, व ह्या हक्कासाठीं थेट सरकारापर्यंत भांडतात. व्यक्तिशः खाणाराच्या आणि एकंदर जनतेच्या आरोग्याच्या दृष्टीनें हे अनाचार किती घातक आहेत बरें ? ख्रिस्ती झालेले महार मांग सुद्धां वरील अनाचार सोडीत नाहींत; व ह्या कामांत मिशनऱ्यांची सर्व विद्या व मंत्र लटपटतात, हें पाहून उमेद खचते. नानाधर्मांचे व पंथांचे शंख व सोट भिक्षुक आपलें आयुष्य भंगडपणांत, फुकटखाऊपणांत घालवितात. देवाची चाकरी करण्याला फुरसत सांपडावी म्हणून आपण भिक्षा मागतों, ही त्यांची समजूत खोटी आहे. भिक्षेलाच हे लोक धर्म आणि वतन समजतात. तसेंच अनेक देवदेवतांचे ब्राह्मणेतर भिक्षुक म्हणतात कीं, आमचें उपास्यदैवत आम्हांला भिक्षेशिवाय दुसरा धंदा सुखासमाधानानें करूं देत नाहीं, व लोकही तें खरें मानतात. हा उभयपक्षीं केवढा भ्रम आहे !

धर्मविधि म्हणून ठग द्रव्यापहार व प्राणापहार करीत, हें सर्वांना माहीत आहेच. व्यभिचारी आणि गुन्हेगार पंथ व जाती ह्या जातिधर्माच्या अतिरेकाचें अत्यंत कटु फल होत. व्यभिचारी पंथांत प्रमुखत्वें वाघ्ये, मुरळ्या, हिजडे, जोगतिणी, भाविणी येतात. अल्लडपणीं जरी त्यांना खाण्यापिण्याची व लेण्यानेसण्याची चंगळ वाटून आपल्या पंथांत कांहीं गैर दिसत नाहीं, तरी प्रौढपणीं कित्येकांना आपल्या जिण्याचा वीट येतो. ह्या विषयाकडे सरकारचें लक्ष लागलें आहे, आणि लहानपणीं मुलें देवाला वाहण्याच्या घातुक संप्रदायाचें निर्दलन होईल अशी खात्री वाटते. व्यभिचारी जातींत कोल्हाटी, हरदास, रामजानी, कसबी

गैरे जाती येतात. व्यभिचारी व गुन्हेगार जाती परजातींतलीं मुलें लहानपणीं विकत घेऊन आपापल्या जातींची भरती करतात. वरिष्ठ जातींतल्या कुमारिकेचें किंवा विधवेचें वांकडें पाऊल पडलें तर ह्या जाती तिचें बाळंतपण चोरून करतात, तिला चोळीबांगडी करून वाटे लावतात आणि मूल ठेवून घेतात. व्यभिचारी जातींत जी मुलगी वाणढाळ असते तिचें लग्न करतात, आणि जी रूपवती असते तिला नायकीण करतात. सदरहु जातींतील पुरुषांचा हा केवढा स्वार्थत्याग आहे बरें ? अ... बोलवा आहे कीं, बहुतेक ... फिरतें भिकार बदफैली आहे; पण त्यांचें कर्म 'मांडी आड' (चोरून) च...लतें. जातिधर्म व जातधंदा म्हणून व्यभिचारी जातींतल्या स्त्रिया चव्हाट्या...वर पाल ठोकतात; आणि त्यांचे आईबाप चक्क सांगतात कीं, आमचें वतन ... कसब व आमची काळी आमच्या मुली. कुटुंबांत जसा एक कर्ता निघाला कीं ... त्याला सर्व कुटुंब पोसावें लागतें, तसें नायकिणीला आपले आईबाप, भाऊ... गवजया वगैरे पुष्कळ आयतखाऊ गोत पोसावें लागतें, व तिचा घरींदारीं म...ठा बडेजाव असतो. एक कोल्हाटीण म्हणाली कीं, मीं जर धंदा सोडला तर ... म्हातारपणीं आईबाप कोठें जातील व भावांचीं लग्नकार्यें कशीं होतील ? ... धंदा अब्रूदार असता तर या मायाळूपणाला मोल नाहीं. अस्पृश्य जाती व गो...वगोतेशिवाय करून दुसऱ्या कोणत्याही जातींशीं वरील जातींच्या नायकिणी धंदा करतात. अशा स्थितींत त्यांना दुर्धर रोग होण्याची, तो पिढ्यान्‌पिढ्या अंगांत मुरण्याची व लोकांत पसरण्याची किती भीति आहे हें आजमावणें कठीण नाहीं. व्यभिचारी जातींप्रमाणें आमच्यांत सुमारें ६०।७० गुन्हेगार जाती ठरलेल्या आहेत, आणि त्या सर्व जातधर्म व जातधंदा म्हणून हक्कानें गुन्हे करतात. इतर जातींत संपत्तीवर किंवा विद्येवर लग्नें होतात. गुन्हेगार जातींत गुन्हे करण्यांत आणि त्यांप्रीत्यर्थ नाना प्रकारच्या यातना सोसण्यांत जशी ज्याची परीक्षा उतरते, तसा तो नांवालौकिकाला चढतो व त्याप्रमाणें त्याचें लग्न लवकर किंवा उशीरां होतें. 'मनमे चंगा तो काथवटमे गंगा ?' ज्याचें मन ग्वाही देतें कीं मजकडे बिल-

कुल गुन्हेगारी नाहीं, त्याला तुरुंगांत टाकलें तरी त्याच्या मनाला काडी-इतका धक्का बसत नाहीं. व्यभिचारी व गुन्हेगार जाती व पंथ ह्यांतील लोकांच्या मनाची स्थिति अशीच असते. त्यांना वाटतें कीं आपला जात-धंदा देवानेंच आपल्याला लावला आहे, आपलें आचरण जातिधर्म, कुलधर्म व संप्रदाय ह्या सर्वांना तंतोतंत धरून आहे, आणि वाडवडि-लांचा धंदा आम्हीं पुढें चालविला आहे; तो आपण केला नाहीं तर आपण कुलांगार निपजलों असें होऊन वडिलांचें नांव बुडवून आपल्या बेचाळीस कुळ्या नरकांत घातल्याचें पाप आपणांला लागेल. **शाकुन्तल-**मध्यें धीवर लख्ख उत्तर करतो कीं–' सहजं किल यद्विनिन्दितं न खलु तत्कर्म विवर्जनीयम् '. जातिधर्माप्रमाणें व्यभिचार किंवा गुन्हे कांहीं दिवस केले नाहींत, आणि जर एखादें अरिष्ट ओढवलें तर आपला धर्म आपण सोडला म्हणून देव व पितर कोपले नसतील ना ? असें व्यभि-चारी व गुन्हेगार जातींच्या लोकांच्या मनांत सहाजिकपणें यावयाचें[1]. सरकार भलें कां तुरुंगांत घालीना ! शिक्षेमुळें किंवा रोग भरल्यामुळें त्यांच्या जमातींत तर त्यांची नाचक्की होत नाहींच, पण इतर समाजांत-ही त्यांना नाळ पडत नाहीं !! आपल्या घरीं चाल बिघडली, किंवा चोरी झाली, सुडी जळाली किंवा जनावर मारलें, तर तेवढ्यापुरतीं इतर जातींच्या पोळलेल्या व्यक्तींच्याच डोळ्यांना काय तीं त्यांच्या दुष्कर्माबद्दल टिपें येतात. परंतु असला जातिधर्म समाजविध्वंसक आहे, असें कोणालाही चुकून वाटत नाहीं; मग त्यासाठीं कष्टी होण्याचें नांव कशाला ? ह्या जातीं-कडून दुसऱ्याची आगळीक झाली तर तादितर शिष्टाई करतात कीं, ' चाललेंच आहे, त्यांच्या जातींचें तें कसबच आहे, त्यांनीं पोट कशा-

---

१ मुंबई पुणें येथें १८९३।४ सालीं हिंदुमुसलमानांचे दंगे झाल्यावर डोल्यांना भजावयाचें नाहीं असें कांहीं हिंदूंनीं ठरविलें. परंतु एक दोन वर्षांत प्रापंचिक संकटें आलीं, तेव्हां डोले क्षोभले व त्यांनीं आपणांला शासन केलें असें त्यांच्या मनानें घेऊन ते पूर्ववत् फकीर होऊं लागले, आणि डोल्यांना नवससायास करूं लागले.

वर भरावें, त्याबद्दल त्यांचें घर उन्हांत बांधून कसें चालेल ? ' इत्यादि. गोंडणीनें चोळी घातली तर तिची जात तिला वाळींत टाकील, व इतर लोकांची ती कटाक्षविषय होईल. व्यभिचारी व गुन्हेगार जमातींच्या लोकांच्या मनाची व शरीराची व्यक्तिशः स्थिति, आणि त्यांच्या कृत्यांच्या शुभाशुभपणाबद्दल त्यांची व एकंदर समाजाची भावना ह्या दोन्ही गोष्टी त्यांचे अनाचार व दुराचार निरंतर चालूं ठेवण्यास अनुकूल अशाच आहेत. व्यभिचारी व गुन्हेगार जातींचे लोक आपापल्यापरी लहानपणापासून आपल्या धंद्यासाठीं योग्य असें शरीर बनविण्याची तयारी करतात. पुढें हातावर मेखा सोसतां याव्या म्हणून उचले आपल्या पोरांना नित्यनियमानें बडवतात; हल्ला परतवतां यावा म्हणून अंगावर चालून येणारावर पळतां पळतां पायांच्या बोटांनीं धोंडे भिरकिवण्याची विद्या कैकाडी बाळपणींच शिकवितात; दरोडेखोरांच्या घोड्यांना-देखील चोरपाऊल असतें; आणि बाजारबसव्या जाती लहानपणापासून आपल्या मुलींना नखरे, व मुंढे हिजड्यांना चाळे शिकवितात. हे लोक ज्या समाजांत वाढतात, ते त्यांचें दुष्कृत्य कुलाचार व जातिधर्म आहे, अशी त्यांची बाळपणींच समजूत घालून देतात; आणि त्यांत त्यांचें जस-जसें पाऊल पुढें पडतें तसतसें त्यांचे जातभाई त्यांना जास्त मान देतात. इतर समाजांच्याही नाकाची घाण मरत जाते, आणि अखेर त्यांना आपल्यांतल्या ह्या धर्मबंधूंची व त्यांबरोबर आपली अधोगति होते, असें मुळींच वाटत नाहींसें झालें आहे. उलट त्यांतले लाखों भाबडे लोक ह्या अनीतिमान् जातकसबाबद्दलही सकौतुक आदर दाखवितात. एखाद्या घरचा किंवा गांवाचा किंवा जातीचा एखादा दुसरा मनुष्य दुर्वर्तनी निघणें व सबंध

१ करमाळ्याकडे मांगाचें वडगांव म्हणून एक गांव आहे अशी दंतकथा आहे कीं, पूर्वी तेथें एक मांग अवतारी पुरुष होऊन गेला. त्याला शेगुडचा ( शिव-गड ) खंडोबा इतका प्रसन्न होता कीं, त्यानें पैज मारून तुळजापूरची देवी लुटली आणि आगाऊ जागें करून चौकीपहाऱ्यांतून तिचा मुगुट चोरून आणला! तो लोकांच्या नवसाला पावतो ! ! !

घर, गांव किंवा जात एकदिलानें धर्म ह्मणून दुराचार करणारी निघणें ह्यांत महदंतर आहे. पहिली स्थिति वैयक्तिक असून ती सुधारण्याला राजशासन किंवा समाजशासन उपयोगीं पडतें. परंतु दुसरी समाजधर्म बनून बिनतोड होते, व ती सुधारण्यास कशाचाही उपयोग होत नाहीं. बहुजनसमाजाचे अवगुणांना अवगुण समजत नाहींत, ते गुणांच्या व्यासपीठावर जाऊन बसतात. जेथें दुराचरणाला समाजाची अनुकूलता आहे, तेथें राजशासन फिक्कें व लुलें पडतें. ही झाली ज्या त्या जातीची अवस्था. भामट्यांना चोरीच्या मालाची विल्हेवाट लावण्यास्तव सोनार सराफ पाहिजे, आणि कसबी जातींचा व्यभिचार सर्व जातींशीं चालतो. अशा प्रकारें ह्या जातींच्या अनीतींत इतर जाती सतत व उघड उघड पडतात आणि त्या निर्लेप सोंवळ्या न राहतां त्यांतल्या हजारों व्यक्ती धूमधडाका दुराचारी निघतात. शेजारच्या वाईट जागेंतली दूषित हवा जर आपल्या घरांत व पोटांत शिरते तर हरवक्त संबंध येणाऱ्या व्यभिचारी व गुन्हेगार जातींचे गुणावगुण इतर संबंधी समाजांना थोडें फार पछाडल्याशिवाय कसे राहतील ? जातिभेदाचा तट ओलांडून ते परजातींत घुसणार नाहींत, असें मानणें समाजशास्त्रज्ञांच्या अनुभवाविरुद्ध आहे. हिंदुस्थानांत गुन्हेगार जातींची लोकसंख्या अजमासें ५० लक्ष आणि भिकार जाती व पंथ ह्यांची लोकसंख्या ५२ लक्ष आहे. ह्या जमाती पराकाष्ठेच्या चलाख, कल्पक, धाडसी चिकाटीच्या व श्रमसहिष्णु आहेत. इतक्या लोकांच्या

---

१ 'कारकुनी' ह्या लांचेच्या समानार्थक शब्दावरून हा दुर्गुण कारकुनी पेशा बाहेर गेला नसावा असें वाटेल. पण भिक्षुकीप्रमाणें तोही सर्व जातींत कस पांगला तें पहा: दुष्काळी कामावरील फैलांवरचे मुकादम झाडून मागासलेल्या जातींतले असून त्यांत शेंकडा नव्याण्णवांना सहीसुद्धां करतां येत नव्हती. तरी सर्व जातींच्या मजूर बायका उभ्या रस्त्यानें दिमाखानें त्यांना मेळ्यानें गाणें गात कीं:

सांगून धाडतें चाट्याला । नखीचें धोतर माझ्या मुकादमाला ॥

सांगून धाडतें कलालाला । दारूची बाटली माझ्या मुकादमाला ॥ इत्यादि.

असल्या गुणांचा समाजाला उपयोग होऊं नये ह्यापरतें ह्या जातींवर, त्यांतील लोकांवर व आमच्या एकंदर समाजावर दुर्दैव तें कोणतें ओढवणार ! ! !

पूर्वींच्या राजवटींत जातिजातींचीं व गांवकीचीं बंधनें फार कडक असल्यामुळें आणि कायद्यांचा इतका कीस काढीत नसल्यामुळें जातिजातींच्या उपद्व्यापांवर एकंदर जनतेचा बराच सक्त दाब असे. व्यभिचारी जातींनीं घरंदाज कुटुंबांतली बाई काढून नेली तर वेळेला गांवकरी सबंध जातीला ठोकून काढावयाचे, त्यांचीं पालें जाळावयाचे, व पुनः त्यांना गांवांत पाऊल घालूं द्यावयाचे नाहींत. 'मारक्या म्हशीच्या माथां घाव', ह्या न्यायानें गांवमुकादमानींत वहिमी दरोडेखोरांना सुळावर चढविण्यांत पुराव्याची कमतरता आड येत नसे. म्हणून सर्व गुन्हेगारांना अलोट जरब असे. गुन्हेगार व व्यभिचारी जाती पुष्कळ ठिकाणीं वतनदार होत्या. दळणवळण जुजबी असल्यामुळें सर्वच समाजांत एकमेकांना एकमेकांची मुरवत असे, अपराध दडविण्यास सवड नसे, आणि गुन्ह्यांचा बोभाटा तेव्हांच होई. पूर्वीं खर्चाच्या व चैनीच्या बाबीही थोड्या असत, व मादक पदार्थांची आतांप्रमाणें बंदी नसे. त्यामुळें पेंढार, बंडखोर सोडले तर गुन्हेगार जातींची भूक खाण्यापिण्याच्या किंवा थोड्याफार कपड्यांच्या व पैशाच्या नडींपलीकडे नसे. त्यामुळें बहुतेक गुन्हे पोटासाठीं होत. आतां सर्वच बदललें, आणि गुन्ह्यांना व्यापारी स्वरूप आलें आहे. पूर्वीं महार फार झालें तर मांसासाठीं, जोड्यापुरत्या कातड्यासाठीं, किंवा किरकोळ अदावतीनें एकाददुसरें जनावर मारीत. व्यापारानिमित्त हिंदुस्थानांत दरवर्षीं सुमारें सवाकोट जनावरें मरतात, पैकीं अर्धलाख मुंबई इलाख्यांत मारलीं जातात, आणि त्यांची किंमत पंधरा वीस लाख रुपये येते. हल्लीं कातडीं व हाडकें मिळून दरसाल सवा दीड लाख मण माल परदेशीं जातो. बहुतेक कातडें अमेरिका व जर्मनींत जातें, आणि त्याला भावही चांगला येतो. त्यामुळें गुरें मारणें हा एक रोजगार झाला आहे, आणि हाडकाकातड्यांचे व्यापारी महारमांगांना पैसे चारून

गुरें मारवितात१. खानदेशांत भिल्ल पूर्वीं स्वतःपुरती दारू गाळीत, व खाण्यापिण्यापुरत्या लहानसान चोऱ्या करीत. वाणी लोक त्यांच्यामध्यें रहावयास आल्यानंतर ते मोठाले गुन्हे करूं लागले, आणि चोरीचा माल बहुतेक फुकटांत मिळून वाणी मात्र गबर झाले, व भिल्ल पूर्वींप्रमाणें च अन्नाला महाग दिसतात. हींच स्थिति सर्वत्र असणार. कांहीं व्यापाऱ्यांनीं गुन्हेगार चाकरीस ठेवल्याचा बोभाटा आहे. ते गुन्ह्यांत सांपडले तर खटला चालविण्यासाठीं सदर व्यापारी त्यांच्यातर्फे वकील देतात, आणि ते तुरुंगांत गेले तर त्यांच्यामागें त्यांचीं बायकापोरें पोसतात. आपलपोट्या, अक्कलवान् समाजाचा अक्कलमंद समाजाशीं संबंध जडला म्हणजे अक्कलमंदाची अधिक अवनति होते, हा समाजशास्त्राचा सिद्धांत आहे. हल्लींच्या मन्वंतरांत गुन्हे छपविण्याचीं साधनें वाढलीं आहेत. नानाप्रकारच्या विलासाच्या व चैनीच्या चिजांनीं बाजार फुलले आहेत, व त्या पैशानें प्राप्त होतात. दुसऱ्याचे हितानहिताचा विचार न करतां पैसा पैसा करणारांची संख्या उमाप वाढत आहे, व दुराचारी जातींचा संबंध अनेक तऱ्हांच्या सज्जनदुर्जन देशी परदेशी व्यापाऱ्यांशीं आला आहे. ह्या सर्व गोष्टींचा विचार केला असतां सबंध जातींच्या जाती दुराचरणी ठेवणें म्हणजे न विचारतां चोराला वाट सांगत सुटणें आहे कीं नाहीं हें ज्याचें त्यानें आपल्या अन्तर्यामीं शोधावें.

ज्या त्या वस्तूमध्यें व कृत्यामध्यें धर्म घुसडल्यामुळें हिंदु लोकांमध्यें धर्मभोळेपणा वाढत जाऊन हिंदु समाजाचा कोंडमारा झाला आहे, आणि धर्माच्या बाबींच्या अनेक प्रकारच्या भाराखालीं तो पार गुदमरून चेंगरून गेला

१ निजामशाहींतल्या एका वरिष्ठ गोऱ्या पोलीस अंमलदारानें असें सांगितलें कीं, एकदां त्यांच्या स्वारींतल्या गाडीची मोठी बैलजोडी महारांनीं मारली; आणि तपासाअंतीं जमाखर्चावरून असें कळलें कीं, त्यागांवचे महार ज्या खाटकाचीं कुळें होतीं त्यानें त्या सालांत हाडकाकातड्याची वीस हजार रुपयांची उलथापालथ केली. आपोआप मेलेलीं जनावरें ह्यांत कांहीं असतील, पण मुद्दाम मारलेलींही पुष्कळ असावींत असा अंदेशा घेण्यास चांगलीच जागा आहे.

आहे. तेव्हां पहिल्यानें त्याच्यावरील बोजे एकीकडे सारले पाहि-जेत. सारासारीला बाहेरून शेज लावावयाचें म्हटलें ह्मणजे ना हिंदू ना मुसलमान, ही जी वटवाघुळासारखी आमची अवस्था झाली, ती नाहींशी केली पाहिजे. तेहतीस कोटी देवांच्या भगतांनीं पिरापुढें ऊद जाळण्यांत किंवा पैसा, सुपारी, नारळ, खारीक, ठेवण्यांत, ताबुदांत हैदोस घालण्यांत, दहापांच फकीर जेऊं घालण्यांत, हिजड्यांना किंवा सवागी फकिरांना दक्षिणा देण्यांत, महमदी धर्म वाढतो, किंवा एकंदर मुसलमान समाजाला मोठेंसें द्रव्यसाह्य मिळतें असें नाहीं. होत असल्यास त्यांत महमदीयांची धर्महानिच होते, असें प्रांजलपणें कबूल करावें लागेल. पण असल्या ओढाळपणानें हिंदूंचें मात्र सर्व प्रकारें नुकसान होत आहे. धर्म एका विशिष्ट लोकसमुदायासाठीं केलेला नसून सबंध चराचर जगासाठीं आहे, व कोणत्याही धर्मांतील ग्राह्यांश कोणत्याही धर्मानुयायांनीं पत्करावा. त्याप्रमाणें आमच्या दावल मालिकी हिंदूनीं कांहीं पत्करला आहे काय ? त्यांनीं फक्त ‘ पिरगोबा ! सुनेनें माझ्या मुलाला मोहिनी घातली, तो जर माझ्याशीं धरलेला अबोला सोडील तर लोटांगणाचे पांच गुरुवार करीन; ’ असला भाग पत्करला आहे. तेवढ्यापुरते हे पिरा-फकिरांना नमणार. मद्यमांसाचा नैवेद्य लागणाऱ्या आदिशक्तीला सुद्धां बकरें शुद्ध करण्यासाठीं मुलाऱ्याचा फात्या लागतो, इतकी ती पराधीन कां व्हावी ? हिंदु खाटकांना बकरें मारण्याची कोणत्या हिंदु देवानें मनाई केली आहे ? हत्या करणें पाप असेल तर मुलाना अधिकारी करणें म्हणजे उपाध्याचे हातून साप मारविण्याइतकेंच भेकड स्वार्थाचें लक्षण नव्हे काय ? आपला देव आपले मनोरथ पूर्ण करील असा भरंवसा हिंदूंना नाहीं. त्यांमध्यें सत्यधर्माचें अज्ञान पसरलें आहे. त्याचेंच फळ ही अश्रद्धा होय. तेव्हां धर्माधिकाऱ्यांनीं व समाजसुधारकांनीं हिंदूंना ह्या बावळट अश्रद्धेंतून मुक्त करून त्यांचा स्वधर्मावर विश्वास दृढ केला पाहिजे. परधर्मावरील व्यभिचारी भक्ति गेली म्हणजे स्वधर्मावरील भक्ति अव्यभिचारी होते. असें झालें म्हणजे हिंदुधर्माचें स्वरूप तेजस्वी होऊन इस्लामीधर्माचाही डाख

निघेल आणि स्वधर्मी भिक्षुकांना दाक्षिणा देऊन हिंदूंना जी परधर्मीयांना खेरीज द्यावी लागते, ती वांचेल. ती वांचविण्यापेक्षां जास्त मोठा फायदा म्हटला म्हणजे रिकामटेकड्या भिक्षुकांची संख्या थोड्यानें कां होईना पण कमी होईल; आणि समाजहितवर्धनास आवश्यक गुण—आपलेपणा, आत्मश्रद्धा, आत्मप्रेम—हे जे हिंदूंतून समूळ नाहींसे झाले आहेत, ते दुसऱ्यांशीं विरोध न करतां परत येतील. सारांश, परधर्मी भिक्षुकांच्या साह्यावांचून प्रत्येक धर्मानुयायाला आपलीं धर्मकृत्यें निःशंकपणें करतां आल्याशिवाय कोणताही समाज स्वयंपूर्ण, स्वावलंबी, स्वाधीनोपाय, व कर्तबगार होत नाहीं ही गोष्ट जीवीं धरून वागलें पाहिजे.

हिंदूंमध्यें समाविष्ट असून ज्या हिंदु जातींना हिंदु समाज परधर्मीयांपेक्षांही दूर धरतो, त्यांची मुक्तता करणें अति महत्त्वाचें आहे. ज्यांच्या शास्त्रांनीं नरदेहाची एवढी थोरवी गायली आहे कीं, जीव शिव एक आहेत, ‘ नर करनी करे तो नरका नारायण होय, ’ त्याच लोकांमध्यें सुमारें अर्ध कोट लोकांनीं जातिधर्म म्हणून तस्करबाजी करावी; अर्धकोट लोकांनीं पंथ किंवा संप्रदाय म्हणून दारसुन्या कुत्र्याप्रमाणें गांवोगांव भीक मागत हिंडून आळसांत, व्यसनांत किंवा गुन्हे करण्यांत दिवस घालवावेत; सहा सात कोटी लोकांना अस्पृश्यतेचा डाग लागावा; आणि ह्या सर्व वर्गांच्या एकंदर सात आठ कोटी लोकांच्या जन्माचें मातेरें व्हावें, ह्यापेक्षां पढतमूर्खपणाचें दुसरें शोचनीय उदाहरण कोणतें असूं शकेल ? उपयुक्त धंदे करणारांत जर सुमारें एक कोटीवर राकट हिमती व हिकमती भिकार आणि गुन्हेगार व व्यभिचारी जमाती येऊन पडल्या, तर त्यांना पोसण्यासाठीं सर्व हिंदुस्तानाला सुमारें ४० कोटी रुपयांचा भूर्दंड द्यावा लागतो तो वांचेल, आणि कमींत कमी त्या पन्नास कोटी रुपये कमावतील. त्यांच्या उद्धारानें ह्याप्रमाणें देशाचें दरसाल अब्ज रुपयांचें हित होईल. हें मोठें देशकार्य होईल खरें; पण ह्या हितापेक्षां माणसांतून वाहवलेले एक कोट लोक पुनः माणसांत येऊन बसले तर त्यांचें व तदितरांचें केवढें कल्याण होईल, आणि तें सर्वांना किती श्रेयस्कर होईल !!

आजचे घटकेला धर्माचार्यांना व समाजनायकांना सर्वांत श्रेष्ठ असें पुण्यकार्य एकदिलानें करावयाचें असेल तर तें हें आहे. तें वाट पहात आहे कीं, **व्रात्य-स्तोमाला**(आर्य-बाह्यांना आर्य धर्माची दीक्षा देतांना शुद्धी-करणार्थ जो यज्ञ करीत तो.) आरंभ केव्हां होतो, आणि कोट्यवधि दिशा-भूल झालेले अंधपरंपरेचे गुलाम माणुसकींत केव्हां येऊन बसतात. तरी परमेश्वराला स्मरा, आपल्या जबाबदारीला जागा, आणि कोट्यवधि माणसांचा परमेश्वरानें दिलेला मनुष्यजन्म धर्माच्या नांवावर विफल व दुरुपयोगी होऊं देऊं नका. त्यांच्या घरकुल्यांनीं, झोपड्यांनीं व पाला-पालांनीं जाऊन त्यांना धर्मशास्त्रांतील बोधामृत पाजा, त्यांचा आचार निषिद्ध आहे अशी त्यांची समजूत घाला, आणि त्यांना हातीं धरून सन्मार्गावर आणा. महाराष्ट्रांत संतमंडळीनें (विष्णुदास उर्फ वारकरीपंथानें) निकृष्ट जाती सुधारण्याचें बरेंच काम केलें. **रोहिदास, चोखोबाराया** ह्यांनीं चांभार, महार, मांग ह्यांची दानत पुष्कळ सुधारली. स्वामी नारायण पंथ व नुकताच उदयास आलेला दादुराम धाराळा ह्यांनीं गुजरातेंतील कोळी वगैरे जातींतले पुष्कळ गुन्हेगार सुधारले. आर्य-ब्राह्म-प्रार्थनासमाज ह्यांनींही निकृष्ट जाती सुधारण्याचें काम हातीं धरलें आहे. पंथसंख्या न वाढवितां हें काम होईल तर तें जास्त उपकारक व टिकाऊ होईल. सुमारें सहासात कोटी लोक हिंदु आहेत, तोंपर्यंत अस्पृश्य असतात, आणि तेच मुसलमान अथवा ख्रिस्ती झाले म्हणजे स्पृश्य होतात ! ' पानी तेरा रंग कैसा तों जिसमे मिलाय वैसा. ' किंवा ' माथा समर्थाचा शिक्का । धाक पडे ब्रह्मादिका ॥ ' असल्या शास्त्राला म्हणावें तरी काय ? रानांत हिंडलें तर लांकूड मिळत नाहीं, आणि सोन्यासारखीं माणसें शेजारींपाजारीं रहात असून त्यांना असें डाव-लावावयाचें हें पुण्य आहे काय ? हा कलंक ह्या लोकांना आहे असें म्हणण्यापेक्षां सबंध हिंदु समाजाला आहे, असें म्हटलें तरी चालेल. तर तो धुवून टाका. म्हणजे दोन धंदे जास्त करण्याला त्यांनाही मोकळीक होईल; आणि इतरांनाही दोन माणसांचें काम एकावर भागवितां येईल.

प्रत्यवाय, देवतोत्सव, आणि जातिजातींचे वतनदार गुरु, मेहत्रे, व मागत्ये ह्यांनीं हिंदु समाजाला सतावून टाकलें आहे हें मागें सांगितलें आहे, व प्रत्यवायांचीं उदाहरणेंही दिलीं आहेत. वड्डर व गोंड ह्या जातींच्या बायकांनीं चोळी घालूं नये; मांग गारोडी, फांसपारधी वगैरे जातींनीं केंस मुळींच काढूं नयेत, असले अनेक प्रत्यवाय जातधर्म व कुलधर्म होऊन बसले आहेत. त्यांची धर्माचार्यांनीं व समाजसुधारकांनीं चौकशी करून, जे धर्माचें नांव बट्टु करतात, आणि ज्यांचा धर्माशीं अर्थाअर्थीं संबंध नाहीं असले प्रत्यवाय आचारकांडांतून हुसकून लावले पाहिजेत. तेवढ्यासाठीं जातिजातींची नीट समजूतही पण घातली पाहिजे. हिंदुसमाजाचें सूक्ष्म निरीक्षण केलें, तर त्याच्या मागें देवपितरांचे सणवार इतके लागले आहेत कीं, साधारण मध्यम स्थितींतील लोक सुद्धां बेजार झाले आहेत असें दिसेल. चैत्रांत वर्षप्रतिपदा, रामनवमी, हनुमानजयंती व पौर्णिमेचा कुलाचार; वैशाखांत अक्षयतृतीया, नृसिंहजयंती, भावुका ( पांडवांची अमावास्या ); ज्येष्ठांत दशहरा, वटसावित्री; आषाढांत दोन एकादशा, द्वादशा, व्यासपूजा, दिव्याची अमावास्या; श्रावणांत सोमवार महादेवाचा, मंगळ–शुक्रवार देवीचे, बुधवार–गुरुवार बुध–बृहस्पतीचे, शनिवार नागनरसोबाचा, आदितवार सूर्यनारायणाचा, इत्यादि वांटणी होऊन शिवाय नागपंचमी, सक्रोबा, नारळीपौर्णिमा, गोकुळअष्टमी, पिठोरी अमावास्या–पोळा; भाद्रपदांत हरतालिका, गौरी, गणपती, ऋषिपंचमी, वामनद्वादशी, अनंतव्रत, महालय; अश्विनांत नवरात्र, दसरा, कोजागिरी, दिवाळी; कार्तिकांत दिवाळी, दोन एकादशा, द्वादशा, तुळशीविवाह, वैकुंठचतुर्दशी, त्रिपुरी पौर्णिमा; मार्गशीर्षांत चंपाषष्ठीचें नवरात्र, नागादिवे, दत्तजयंती; पौषांत संक्रांति; माघांत वसंतपंचमी, रथसप्तमी, पौर्णिमेचा कुलाचार, महाशिवरात्र; फाल्गुनांत शिमगा, तखतराव, खेरीज मोहरम नाताळ असे सणच सण बोकाळले आहेत. ह्या सामान्य सणांखेरीज अनेक पंथांचे व गांवांचे अनेक विशेष सण, यात्रा, उरुस व उत्सव आहेत. सण कुलधर्म, व जातिजातींचे आणि गांवोगांवचे गुरु मागत्ये भिक्षुक ह्यांची संभावना,

यांचा इतका सुळसुळाट झाला आहे कीं, शेजाऱ्यापाजाऱ्यांत लघुत्व न येतां आला दिवस कसा साजरा करावा ह्याची घर चालविणाराला पंचाईत पडते, व घरच्यादारच्यांपैकीं कोणाला कांहीं कमी पडलें कीं टोले ठोसरे खावे लागतात. चारचौघांत वागावयाचें असतें, तेव्हां शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या घरीं सण झाला आणि आपण न केला तर आपल्या पोराबाळांना वाईट वाटतें. सबब सालांतून नित्त्यनैमित्तिक म्हणून शेंपाऊणशें सण छातीचा कोट करून करणें भाग पडतें. शिमग्या–दिवाळीसारखे सलग सण पुरवले; पण एकट दुकट सणाचा खर्च जास्त येतो, आणि दर सणाला महार मांग हक्कदार ह्यांचा सशेमिरा कांहीं केल्या चुकत नाहीं. तरी समाजाच्या सध्यांच्या निष्कांचन स्थितींत हे इतके सण, उत्सव त्याला झेंपण्यासारखे आहेत कीं नाहींत, हे धर्माचार्यांनीं ठरवून त्यांची संख्या हटवावी. जर सणांची व उत्सवांची संख्या हटविली तर पुष्कळांचा उपासमार व तानापाजणी वांचेल. तसेंच ‘ एकमेवाद्वितीयं ’ ची उच्चतम ध्वजा जगभर फडकविणाऱ्यांच्या शिष्यांनीं मरेआईच्या पूजेसाठीं पांच–पांचशें रुपयांना खोरीस यावें, ख्रिस्ती मांगांकडून तिला तुष्ट करण्याची मोघाशा धरावी, ग्रहण अमावास्येला महारांमांगांना दानें करावींत, वासुदेव, पांगूळ, तिरमल, वाघ्ये, मुरळ्या, पोतराज, हिजडे, गोंधळी, तेंलंगीकोळी, इत्यादिकांना देवदेवतांचे आडत्ये किंवा लाडके समजावें; हें शोभतें काय ह्याचाही विचार झाला पाहिजे. श्रेष्ठांच्याठायीं ईश्वरी अंश आहे असें भगवंतानें सांगितलें आहे. परंतु हिजडे, रक्तदोषाचे रोगी, देवीचे भक्त म्हणून, आणि असेच इतर विकल, कृपण, मैंद कोण्याना कोण्या देवाचे, पिराचे भक्त म्हणून, हक्कानें दक्षिणा मागतांना पाहिले म्हणजे असें मनांत येतें कीं, ज्याप्रमाणें बहुजनसमाजामध्यें देवपूजनाच्या पंक्तीला पिशाचपूजन येऊन बसलें, त्याप्रमाणें दात्यागृहीं त्याच्या अज्ञानानें विकलानुकंपेचें विकलाराधन होऊन तें श्रेष्ठाराधनाच्या पंक्तीला येऊन बसलें; आणि विद्वान् साधु, संत तसे विकल, मंद सुद्धां हक्कानें दान मागते झाले. असो. हिंदुधर्मांचीं तत्त्वें इतकीं उदात्त असतांना हजारों देव आणि

त्याचे उत्सव व योग्यायोग्य भगत ह्यांपायीं समाज किती दिवस बुडूं द्यावयाचा ? हें बंड मोडणें कालावधीचें काम आहे हें कबूल आहे. पण तें मोडण्याच्या उद्योगाला धर्माचार्य लागले आहेत असें दिसत नाहीं. आपापल्या कळपांच्या कमी-अधिक भाराबद्दल ख्रिस्ती मिशनरी जसे दक्ष असतात, त्याप्रमाणें आमचे धर्माचार्य चालत्याबोलत्या देवांचीं देवळें म्हणजे रंजल्या-गांजलेल्यांच्या झोंपड्या-पालें पाहतील, आणि त्यांच्या धार्मिक उन्नतीचा प्रयत्न करतील तर काय एक होणार नाहीं ? वृथा जात्यभिमानाला न पेटतां जर जातिजातींचे मेहत्रे, गुरु, मागत्ये, पाटील चौगुले ह्यांनीं 'असून अडथळा आणि नसून खोळंबा' व 'शेळीचें शेपूट अब्रूही झांकीना आणि माशाही वारीना' अशाप्रकारचे वतनी मान-पान आणि हक्क सोडले तर रूढीचें फाजील बंड मोडेल, किरकोळ कामांत वायफट वेळ जाणार नाहीं, त्यांचा सांपत्तिक फायदा होईल, आणि जातिजातींचा पुष्कळ कामांतला बेबनाव नाहींसा होईल.

कामाला बाट नाहीं, ह्या तत्त्वाचें साम्राज्य झालें पाहिजे. त्याशिवाय हा धंदा सोंवळा आणि तो धंदा ओंवळा, हें काम सिद्ध आणि तें निषिद्ध असले भेद नाहींसे होत नाहींत; आणि काम व कामकरी ह्यांची फुकटाफुकट अडवणूक व बुडवणूक होतां राहत नाहीं. ब्राह्मण डॉक्टर गुरामाणसांचें कातडें शिवतो, प्रेत फाडतो, पण तो बाटत नाहीं. मग मेलेलें जनावर महारांखेरीज इतरांनीं पुरणें धर्मबाह्य कां मानावें ? तबला मढविल्यानें जर कोणी बाटत नाहीं, तर कुणब्यानें मोटेला टांचा कां मारूं नये ? अघोर पातकें व गुन्हे करण्यानें जात बाटत नाहीं, आणि पोटासाठीं हलके किंवा गदळ काम इमानें इतबारें करण्यानें ती कां बाटावी? असली चमत्कारिक स्थिति बदलली पाहिजे. हें जर पटत असेल तर धंद्यांतील सोंवळ्याओंवळ्याचे हास्यास्पद प्रकार ताबडतोब बंद झाले पाहिजेत. त्याशिवाय कारखाने एकतंत्री चालणार नाहींत, आणि सर्वांना भरपूर काम लागून हुन्नर ऊर्जित दशेला येणार नाहींत. अमुक धंदा पत्करला तर अमुक आचरण करणें हा धर्म किंवा ईश्वरी

नियम असूं शकेल; जसें, क्षत्रियाचा धंदा पतकरला तर रणांत बापाची देखील भीड धरूं नये. परंतु वैयक्तिक गुणांचा उपयोग न करतां अमुक कुडींत जन्मास आला म्हणून अमुक धंदा केला पाहिजे, अशी ईश्वरी इच्छा नसावी. कारण कोणताही देव असें सांगणार नाहीं कीं, मांगाच्या पोरांनीं चोऱ्या कराव्यात, अगर कोल्हाटणीनें व्यभिचार करावा. आईबापांचा प्रामाणिक धंदा करण्यांत आईबापांचा व मुलांचा पुष्कळ फायदा असतो, म्हणून पिढीजाद धंदे व जातधंदे अस्तित्वांत आले; आणि त्यांवर मारुतीच्या शेंदराप्रमाणें धर्माचें कवच चढलें. परंतु पिढीजाद धंदा मुलाला साध्य होण्यासारखा किंवा किफायतशीर नसला तर त्याला दुसरा धंदा पाहतां येऊं नये हा शुद्ध जुलूम आहे. तसेंच, नैसर्गिक किंवा संपादित गुणांमुळें एखाद्यानें एखादा धंदा धरणें किंवा सोडणें निराळें, आणि अमुक आईबापांच्या पोटीं जन्मास आलों म्हणून त्यांचा धंदा देवानें आपल्याला लावला, दुसरा धंदा आपल्याच्यानें होणार नाहीं, अशा धर्मोपदेशावर वडिलोपार्जित धंद्याहून इतर धंद्यासबंधानें शारीरिक, मानसिक व नैतिक अपात्रता व्यर्थ कबूल करणें निराळें. तेव्हां व्यवसायाला जातधर्माचें बंधन नको. ज्या त्या व्यक्तीला आपापल्या शारीरिक, मानसिक, आणि सांपत्तिक अनुकूलतेप्रमाणें योग्य तो धंदा करण्याची पूर्ण मुभा पाहिजे. त्याशिवाय धंद्यांमध्यें हल्लीं जी कामकऱ्यांची विषम वांटणी दिसून येते ती नाहींशी होणार नाहीं. सुधारणेची सर्व मदार व्यक्तिस्वातंत्र्यावर असते. तें ज्या समाजांत नाहीं त्याच्या चलनवलनाचें क्षेत्र आंत आंत येत जाऊन अखेर तो नामशेष होतो हें प्रमाणासिद्ध आहे. व्यक्तिस्वातंत्र्य म्हणजे समाजहितवर्धनास जरूर तितकीं निर्बंधनें पाळून वागण्याची मोकळीक. असो. ह्याप्रमाणें जात आणि धंदा ह्यांची फारकत झाली म्हणजे जातिधर्माचें स्तोम पुष्कळ कमी होईल, बऱ्हाणी जातींना भरपूर उद्योग भेटेल आणि धर्माच्या नांवावर चालत असलेले अनेक अनाचार व दुराचार ह्यांनीं बंदींत टाकलेल्या अनेक अज्ञजनांची मुक्तता होईल.

सध्यां जातिपरिषदा व संमेलनें भरत आहेत. त्यांनीं मनावर घेतल्यास वर सुचविलेल्या सुधारणांपैकीं पुष्कळ त्यांना धर्माचार्यांच्या तोंडा-

कडे न पाहतां करतां येण्यासारख्या आहेत. आपापल्या जातीचे प्रत्यवाय, धर्मभोळेपणा व सांपत्तिक स्थिति त्यांना लवकर उमजेल, आणि त्यांत सारासार करण्याला कोठें जागा आहे हेंही त्यांना अल्पायासानें ठरवितां येईल. तेव्हां जातिसंस्थांचा असा उपयोग करून घेतला तर जातिधर्म व त्याचा परिवार वतन ह्यांना हटविण्याचा पुढील मार्ग पुष्कळ सोपा होईल. जात आणि गांव हे भूलोकचे तुटक भाग राहिले नसून त्यांचा सर्वांग संबंध सबंध दुनयेशीं आला आहे, आणि वैश्ययुगाला केव्हांच आरंभ झाला आहे. ह्या युगाची संक्रांत हरिणवेगानें मोघम व उधारी वतनाकडून 'रोख भाई ठोक' वेतनाकडे दौडत आहे. वतनांची व धंद्यांची गल्लत मुसलमानी अंमलांत थोडी झाली, पण ती तत्त्वतः न होतां घरांत वतन येतें किंवा घरांतून वतन जातें, ह्या स्वार्थी दृष्टीनें झाली. जातधंदे व वतनदारी ह्या दोन्ही संस्था समाजाला कूपमंडुक बनवितात आणि त्यांतील व्यक्तींचें पौरुष व दळणवळण कमी करून त्याची वाढ खुंटावितात, हें मुसलमान राज्यकर्त्यांनीं ओळखलेंसें दिसत नाहीं. सदर राज्यांत पूर्वींचीं वतनें राहिलीं इतकेंच नव्हे तर त्यांमध्यें महमदीयांच्या धार्मिक व सामाजिक समजुतींनीं मुलाना, हिजडे, मुंढे वगैरेसारख्या वतनांची आणखी भर घातली. सुधारणेचा ओघ मुग्ध जात–धंद्याकडून खडखडीत करारमदाराकडे धोधो वाहत आहे, हें महातत्त्व इंग्रजांच्या मनांत पूर्णपणें बिंबलें आहे, आणि त्यांच्या नेहमींच्या सावधपणानें त्यांनीं धंद्यांची गल्लत आरंभून धिम्मेपणानें चालविली आहे. समाजाची अनुकूलता असती तर हें काम बरेंच तडीस गेलें असतें. तेव्हां जातधंदे ऊर्फ जातिधर्म व वतन ह्यांचे दोष ज्यांना समजले असतील त्यांनीं आपल्या देशबांधवांची समजूत घालून सरकार करीत असलेल्या गल्लतीस विरोध करूं नये. ह्या सामाजिक संस्था जगाच्या आरंभापासून अखेरपर्यंत जशाच्या तशा कशा राहतील ? त्या कांहीं सनातन मोक्षधर्म नव्हत. देशकालानुरूप त्यांत बदल नको कां व्हावयाला ? पानें कां सडलीं, भाकरी कां करपली आणि घोडा कां आडला ह्या तिन्ही प्रश्नांचें उत्तर एक आहे. फिरविणें झालें नाहीं म्हणून. समाजालाही हाच नियम लागतो.

---

# वाट-चाल.

एकमेकां साह्य करूं । अवघे धरूं सुपंथ ॥ **तुकाराम.**

गांव-गाडा मूळ भरणारा कुणबी आणि वहाणाराही पण कुणबीच आहे. जसजशी राजकीय, सामाजिक, धार्मिक कामाकाजांत त्याला इतरांच्या साह्याची गरज पडली, किंवा त्याची व त्याच्या साथीदारांची लहर लागली; तसतशी भरितांची संख्या भडकतच चालली. जो आला तो कुणब्याच्या जागेंतून जागा काढून बसला. जोंपर्यंत कुणबी अकलेनें व मेहनतीनें सावध आणि तो व आंगतुक असे दोघेही सारखे गरजू होते, तोंपर्यंत ही भरती दोघांनाही उपकारक झाली, आणि कुणबी व कारूनारू ह्यांचें गोवत्साचें नातें चालूं राहिलें. कारूनारूंच्या संघांसारखे लहान लहान जनसमुदाय बहुधा अल्पप्रयत्नानें व अल्पकाळांत एकदिल होतात. परंतु कुणब्यासारखा विखरलेला जनसमाज आळेबंद राहत नाहीं, व त्याचा व्यवसाय लोकसंमर्दापासून फार तुटक असल्यामुळें तो चौकोनी न राहतां लोकव्यवहारांत अगदीं लुळा पडत जातो. इतरांची मिळकत जशी झांकून तशी कुणब्याची उघडी असते. त्याचें पिकलेलें शेत, सुडी व रास, सर्वांना पटकन् दिसतात. त्यामुळें ज्याची त्याची प्रवृत्ति त्यांतून आपणाला जितकें मिळेल तितकें काढण्याकडे झाली, आणि कोणीही त्याला पारठें पडूं देईना. जातिधर्म व जात-कसब ह्यांचें बंड माजत गेल्यामुळें कारूंच्या व्यवसायाला स्थिरता आली; इतकेंच नव्हे तर ज्या त्या जातीची आपापल्या कसबाच्या कामांत इतरांवर कुरघोडी सुरू झाली. एक जात दुसरीच्या कामांत हात घालीनाशी झाली. ह्याचा परिणाम असा झाला कीं, जातकसब सोडून दिलें तर प्रत्येक जात प्रपंचास जरूर अशा परजातीच्या कामांत गैरवाकबदार व परावलंबी झाली; आणि अमुक जात पोट जात किंवा पंथ नसला तर आपलें अमुक अमुक काम अडेल, तें कोणी करणार नाहीं, असा एकमेकांबद्दल भीतिभाव सर्वत्र

उत्पन्न झाला. राजानुशासनाचा संबंध नसतांनाही असल्या सामाजिक व धार्मिक स्थितीमुळें गांवगाड्यांत रेटारेटी सुरू झाली; आणि बहुतेक भार कुणब्यावर पडून कारूंची सोय होणार असल्यामुळें कुणबी नको म्हणत असला तरी इतरांनीं त्याचें म्हणणें मोडून काढून वतनदारांच्या भरतीला वरचेवर उत्तेजनच दिलें. तिला विरोध करण्याइतकें तेज त्यामध्यें न उरल्यामुळें म्हणा, किंवा आपण किती भार उचलतों ह्याचा उमज त्याला न पडल्यामुळें म्हणा, किंवा माझ्यांत सर्व दुनियेचा वांटा आहे ह्या धर्मसमजुतीनें म्हणा, कुणबी हटतच गेला. अशा रीतीनें गांव–गाड्यांत कारूंना नारू येऊन मिळाले आणि दोघांचेंही लटांबर उमाप फुगून तो कुणब्याच्या बाजूनें पार एकारला. ह्या सबंध खोगीरभरतीवरून नजर फिरविली तर काळीच्या उत्पन्नाच्या वांटणीसंबधानें कुणबी गाय आणि कारूनारू तिला झालेलीं खऱ्या कळकळीचीं वांसरें हें नातें नांवाला मात्र राहिलें, आणि सर्व अडाणी कुणब्याला तोडण्याच्या कामीं एक होऊन त्याला हात आंखडूं देईनातसे झाले. कुणब्याचा समाज अफाट आणि पांगलेला असल्यामुळें त्याला अडाण्यांना प्रतिरोध करितां येईना; इतकेंच नव्हे, तर त्यांजकडून जें आपलें काम करून घ्यावयाचें तें सुद्धां चोख व वक्तशीर करून घेण्याची ताकद व जूट त्यांत राहिली नाहीं, आणि तो एकसारखा चेंगरत गेला. 'तोबऱ्याला पुढें व लगामाला मागें' असें होऊन कुणब्याच्या कामाची अडाणी टंगळमंगळ करूं लागले, तरी त्याला त्यांचे हक्क पुरे–नव्हे वाढत्या प्रमाणांत–चुकते करावे लागतात. कुणबिकीवर ताव मारण्याला जरी सर्व अडाणी एक होत; तरी जातिभेदामुळें एका जातीचे वतनदार दुसऱ्या जातीच्या वतनदारांपासून अलग राहिले, व एकंदर गांवाच्या सामान्य हिताकडे न पाहतां आपापल्या विशिष्ट हितावर नजर देऊं लागले. जातकसबामुळें एका घरीं केणें येऊन एकमेकांना एकमेकांचीं मनें सदैव राखणें दुरापास्त झालें. तेव्हां जरी सर्वजण गांवगाड्यांत शिरले तरी त्यांचे हितसंबंध एक राहिले नाहींत, एवढेंच नव्हे तर अनेक बाबतींत हितविरोध व मत्सरही सुरू झाला. आणि त्याच्या सर्वांग डागडुजीकडे कोणाचेंच लक्ष नसल्यामुळें

तो खिळखिळा झाला. कोणत्याही कारणानें कोणाचें उत्पन्न वाढलें, म्हणजे दुसरा त्याच्याकडे पाहून हाय हाय करतो. महारांनीं गांवच्या ढोरांनाच कातडें विकलें तर समस्त गांवाला कातडी काम स्वस्तांत पडेल. स्वहितासाठीं महार तें व्यापाऱ्यांना विकतात, आणि रगड पैसे मिळवितात. तें महाग झाल्यामुळें चांभारांना कूस कमी राहते, आणि ते कुंथत बसतात कीं, महारांसारखे दैववान् कोण आहे, चांभाराचें जिणें फार वाईट. असो. सामान्य हिताविषयीं बेपरवाई आणि एकमेकांचा हितविरोध निर्माण झाल्यामुळें गांवगाड्यांत जरी पुष्कळ भरती झाली, तरी तो धडधाकट ठेवण्याची कळकळ, व त्याच्या उस्त्या काढण्याची खटपट व ताकद त्याच्या भरितांतून व्यक्तिशः व समुच्चयानें नाहींशी झाली. पाटलाच्या पोटांत शिरून शेटजी त्याच्या पडवींत दुकान लावून अखेर पाटील-गढीचा धनी कसा होतो, ह्याचें हृदयंगम वर्णन लोक गांवोगांव करतात. व्यापाऱ्यांना सवलतीनें व सच्चेपणानें व्यापार करण्याचें भाग पाडण्या-इतकी जूट, अक्कल, नेट व प्रामाणिकपणा, गांवकऱ्यांत नसल्यामुळें दक्षिणेंतलीं पुष्कळ गांवें सावकारांच्या घशांत उतरलीं, आणि त्यांचाही करडा अमल कुणबिकीवर गाजूं लागला. ' बळी तो कान पिळी, ' ह्या न्यायानें सर्व थोतांडी व गुन्हेगार लोक व जमाती ह्यांनाही मोकळें रान सांपडून त्यांनीं गांवगाड्याची विचकाविचक, व मोडतोड केली. आज जे दुराचारी व शिरजोर स्वधर्मी परधर्मी भिक्षुक हिंदु गांवकऱ्यांकडून हक्कानें उकाळा करतात, आणि ज्या अनेक आडदांड चोरट्या, स्थाईक अगर फिरत्या जमाती हक्कानें खळीं उकळतात, त्याचें कारण असें आहे कीं, त्यांच्या अपहारास बंदी करण्याचें सामर्थ्य समाजांत, धर्मा-धिकाऱ्यांत, व पूर्वीच्या राजेरजवाड्यांत नव्हतें. तेव्हां एकंदर हिंदु समाजाची गांवापुरती चिमणीशी पण सर्वांग प्रतिमा जो गांव-गाडा त्या-मध्यें पूर्वोक्त व्यक्ति व जमाती ह्यांना तोंड देण्याइतकी सत्ता कोठून येणार ? ह्याप्रमाणें घरचे, दारचे, पै, पाहुणे, कामकरी, आयतखाऊ, भले, बुरे, सर्वच गांव-वतनदार बनले; आणि अगोदरच खिळखिळा

झालेला, मोडकळीस आलेला, आणि ठालाठेल भरलेला गांवगाडा सफई फसला. तो आतां रिचवून उलगडून पुनः वेठल्याशिवाय चालणार नाहीं.

गांव–गाड्याच्या सांठीच्याही वर गेलेलें हें भरताड आपेआप ओसरेल किंवा हां हां म्हणतां आपलें ठाणें सोडील अशी आशा करण्यांत अर्थ नाहीं. नवें नवें करणाऱ्या सुशिक्षित पाश्चात्य समाजांत देखील खात्री पटवूनही लोक लवकर जागचे हालत नाहींत व नवीन सुधारणा पत्करीत नाहींत, तर आमच्या रूढिबद्ध अशिक्षित व एकलकोंड्या समाजास सर्व बाजूंनीं चलन मिळण्याला पुष्कळच काळ लोटला पाहिजे. तरी पण हें इष्ट स्थित्यंतर घडवून आणण्याला जितक्या तांतडीनें आपण लागूं तितकें बरें. गांव–गाड्यांत आतां अव्वलचा जोम राहिला नाहीं, तरी 'गांव करील तें रावाच्यानें होत नाहीं' असें कांहीं कांहीं गोष्टींत अजूनही दिसून येतें[1]. गांवकऱ्यांचा एक विचार झाला तर सध्यांच्या कायदेकानूंनीं जें कांहीं थोडें फार स्वातंत्र्य गांव–गाड्यांत ठेविलें आहे तें त्यानें कामीं आणण्याला बिलकुल कचरूं नये. गांवकऱ्यांना स्वतःच्या कर्तुकीवर करतां येण्यासारखें जें आहे त्यांत अग्रस्थान फिरस्त्यांच्या गमजा चालूं न देणें ह्या कृत्याला दिलें पाहिजे.

परमेश्वर कोणत्या रूपानें येऊन सत्त्व घेऊन जाईल ह्याचा नियम नाहीं; 'माय मरो पण आस न मरो'; बहुभाग्यानें मिळतें म्हणून

---

१ अहमदनगर जिल्ह्यांत आकोलें तालुक्यांत बेलापूर गांव आहे. तेथले शेतकरी इतके दक्ष आणि आळेबंद आढळले कीं, आजूबाजूच्या आलुत्याबलुत्याचा धारा कांहींही असेना, त्यांनीं आपला आदा व त्यांच्या कामांचें हल्लींचें मान पाहून त्यांत छाटाछाट केली, वाणी लोकांशीं उधारीचा व्यवहार बंद केला, आणि गुरवासारख्या पुजारी कारूच्या गळ्यांत चावडी झाडणें, सारवणें व आल्यागेल्या प्रतिष्ठित गांवपाहुण्याची खिजमत करणें इत्यादि कामें घातलीं. त्यांच्या दक्षतेमुळें गांव इतका सुधारला कीं, दुष्काळांत सुद्धां तो बेबाक राहिला, त्यानें १९०६ पर्यंत तगाईचा छदाम उचलला नाहीं, आणि तेथले कुणबी दोन पैसे बाळगून एकमेकांच्या गरजा वारणारे दिसले.

गाड्याचा माग फांसाट्यानें तरी काढला पाहिजे, आणि कोणी आला तर त्याला विन्मुख न परतवितां घांसांतून घांस काढून दिला पाहिजे; असल्या भोळ्याची तळी भरली पाहिजे. ज्यानें त्यानें आंग झिजवावें व खावें, हा ईश्वरी संकेत आहे. चोरट्या, भिकार व इराण्यांसारख्या दंडेल जाती ह्यांना गांवकऱ्यांनीं निर्भिडपणानें एक मुसंडीनें तोंड द्यावें, आणि ज्याचा माल त्याचे हाल होऊं देऊं नयेत. निश्चयाचें बळ असल्यावर चार पांच वर्षांत त्यांना फळ मिळेल, आणि त्यांचा हात थोडा फार तरी चालेल. गोसावी, बैरागी, फकीर, मानभाव, वारकरी, वासुदेव, पांगुळ, जोशी, तिरमल, देवीचे नाना पंथांचे भगत, खोटे-नाटे आंधळेपांगळे, विकल वगैरे जे बऱ्हाणी अशिक्षित भिक्षुक असतील, त्यांना मुळींच भिक्षा घालूं नये. कोणी उपाशींच मरूं लागला तर ज्याच्या त्याच्या माफक काम देऊन पराकाष्ठा तर सढळ रोजंदारी द्यावी. फिरस्त्यांपैकीं जे हुन्नरी असतील त्यांच्या कामाबद्दल किंवा मालाबद्दल रोकड मोबदला द्यावा, धान्य भाकरी वगैरे देऊं नये; कारण त्यांत श्रम व कसर फार जाते. त्यांचें सर्व काम गांवचे कारूनारू व दुकानें ह्यांजकडून भागण्यासारखें आहे, व त्यांच्या फेऱ्यांचें कांहीं प्रयोजन उरलें नाहीं. पण त्यांना येण्याजाण्याची मनाई करणार कोण ? ह्यासाठीं स्वस्त असेल तरच ह्या बिऱ्हाडित्यांशीं सौदा करावा, आणि कांहीं झालें तरी फिरस्त्यांनीं व त्यांच्या जनावरांनीं कोणालाही उपसर्ग लावतां कामा नये.

पांखरा-जनावरांसंबंधानेंही ज्या भोळवट धर्मसमजुती आहेत, त्यांना खो मिळाला पाहिजे. हौसेसाठीं, उपयुक्ततेसाठीं अगर भूतदयेसाठीं पांखरें जनावरें पोसणें वेगळें; आणि धर्मभयानें त्यांना पोसणें किंवा जीवदान देणें वेगळें. दुसऱ्या प्रकारांत शिरजोरपणा वाढून लफंगपणास उत्तेजन मिळतें. जान्या ( देवाच्या नांवानें सोडलेल्या ) गाई, पोळ, टोणगे, बोकड इतके उन्मत्त होतात कीं ते शेतांत घुसून पिकांची अतोनात नासाडी करतात; बाजारांत चारा, दाणा, फळें वाटेल तितकीं खातात, व माणसाजनावरांच्या अंगावर जाऊन त्यांना जायबंदी करतात, नव्हे वेळेवर ठार करतात. चांगलीं जोपें निपजण्याकरितां रगदार

जनावरें पाहिजेत हें खरें; पण खाल्लेलें जिरविण्यास प्रमाणशीर काम मुळींच नसल्यामुळें त्या कामालाही हीं मस्त जनावरें थोडक्या अवधींत निरुपयोगी होतात, आणि मरेपर्यंत त्यांचा धिंगाणा मात्र सोसावा लागतो; असा खडतर अनुभव येतो. दुभत्या गाईम्हशींना माफक काम दिलें तर त्या दुधाला चढतात, असा पाश्चात्यांचा अनुभव आहे. सरकार ज्याप्रमाणें वळू घोडे किंवा पोळ ठेवून कोणाला उपद्रव न होतां त्यांजकडून काम घेतें, त्याप्रमाणेंच आपण केलें पाहिजे. राखण-खावटीचा अंदाज करून एखाद्यानें पोळ ठेवावा, आणि माफक फळणावळ घेऊन तिच्यांतून त्याचा खर्च काढावा. तेव्हां 'धर्मावर सोमवार' म्हणून देवांच्या नांवानें जनावरें सोडण्याच्या विरुद्ध व अशा जनावरांकडून आवश्यक तितकें काम घेण्याला अनुकूल असें लोकमत जागृत झालें पाहिजे, म्हणजे तीं किफायतशीर रीतीनें बाळगण्यास लोक तयार होतील व त्यांची तोषीस सबंध गांवाला लागणार नाहीं. जणों काय गांवावर पोळ सुटला, हा भाषणसंप्रदाय आतां बंद झाला पाहिजे. जसा देवांला वाहिलेल्या माणसांचा अधर्म पाहून वीट येतो तसाच देवांच्या नांवानें सोडलेल्या जनावरांची स्थिति व उपद्रव पाहून येतो. गाईला लोक पूज्य मानतात आणि तिनें कशांतही तोंड घातलें तरी तिला कोणी मारीत नाहीं. ह्या धर्मसमजुतीचा फायदा घेऊन सर्व जातींचे लोक गाईना शेतांत व दाणा-चाऱ्याच्या बाजारांत मोकार सोडतात, आणि त्या तेथें जोगावतात. कसा-याच्या हातून गाई सोडविणें पुण्य आहे, ह्या धर्मसमजुतीचा फायदा घेऊन पुष्कळ ढोंगी लोक धर्मशील हिंदू-जैनांकडून पैसे उपटतात. त्यांना हा एक रोजगार झाला आहे. हें खरें गोरक्षण आहे काय, ह्याचा शांत मनानें विचार करावा. ज्याला ऐपत नाहीं त्यानें लोकांच्या जिवावर गाई कां बाळगाव्यात, आणि असले धंदेवाले आज पैसे घेऊन उद्यां पुन्हा कसाबाला जनावर विकणार नाहींत कशावरून ? त्यांना बाजारभावापेक्षां जास्त पैसे देऊन त्यांच्या लुच्चेगिरीस उत्तेजन देण्यांत काय पुण्य आहे ? जोंपर्यंत लोक गोमांस भाक्षितात तोंपर्यंत गोरक्षणाचे असले प्रयत्न करणें म्हणजे

आकाशाला गवसणी घालण्यासारखें आहे. गोरक्षण अत्यंत उपयोगी आहे आणि तें फलप्रद मार्गांनीं झालेंही पाहिजे. परंतु परस्पर गाईंचा खर्च काढणाऱ्यांना तो तसा काढूं देऊं नये, आणि परधर्मीयांशीं ह्या कामीं हिंदू–जैनांनीं वितंडवाद घालूं नये, व आपला पैसाही दवडूं नये. संघटित प्रयत्नांनीं हाच वायां जाणारा पैसा चांगलीं खिल्लारें तयार करवून जनावरांची पैदास व संख्या, आणि त्यांच्या द्वारें दुधातुपाचा पुरवठा सुधारण्यांत खर्च पडला तर खरें गोरक्षण होईल. जातां जातां भूतदयेचे एक दोन अपवादास्पद प्रकार सांगतों. गाईंना व कुत्र्यांना भाकरी चारण्याचा पुष्कळ लोकांचा परिपाठ आहे. मारवाडी गुजराती बहुधां रोज गाई-कुत्र्यांना भाकरीचा तुकडा टाकतात. त्यामुळें मालकांना आंच लागत नाहीं, रोडकीं जनावरें व मोकार मांजरें कुत्रीं गल्लोगल्लीं मैला खातांना दृष्टीस पडतात, आणि जनावरांची अवलाद दिवसेंदिवस हलकी होत चाललेली आहे. गाढवेंही मोकार सुटत असल्यानें हाच प्रकार दृष्टीस पडतो. अशा जनावरांचा व्हावा तितका उपयोग होत नाहीं, आणि 'एक धड ना भाराभर त्या चिंध्या' मात्र वाढतात. दारसुन्या कुत्र्यांमध्यें पिसाळलेल्यांची संख्या वाढून अतिच त्रास होतो, आणि असा काळ आला आहे कीं, त्यांना खच्ची करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. अर्ध्याकोर भाकरीनें अगर उकिरडा घोळण्यानें गाई, मांजरें, कुत्रीं किंवा गाढवें ह्यांचें पोषण होतें असें नाहीं; मात्र त्यांना वर्षानुवर्षें उपवासांत काढावीं लागतात. तरी वांई येथील गोशाळेच्या धर्तीवर ह्या दानधर्माला व्यवस्थित स्वरूप दिलें तर चांगलीं जनावरें पैदा होण्याला व पोसण्याला मदत पोंचेल, आणि हालांत राहणाऱ्या मरतुकड्या जनावरांची संख्या कमी होईल. गाढवांप्रमाणें डुकरेंही मोकार असल्यामुळें पिकांची खराबी करतात. फांस–पारधी, व क्वचित् मुसलमान पांखरें धरून अहिंसाधर्मीच्या अनुयायांकडून पैसे उकळतात. त्यांना हा रोजगार झाला आहे. प्रज्ञायुक्त धर्मकल्पनांचा प्रसार झाला तर असल्या अनाचारास खात्रीनें चांगलें वळण लागेल. मोकार पशुपक्ष्यांना अन्न

घालण्यापेक्षां ऐपतीप्रमाणें ते बाळगून हौस अगर धंदा करण्याची प्रवृत्ति बळावेल तर मोकार जनावरांकडून होत असलेली लोकपीडा दूर होऊन शेतीचा आनुषंगिक असा एक पशुपक्षीविक्रीचा धंदा कुणब्याला किफायतशीर रीतीनें करतां येईल.

अनुभवाअंतीं सरकारानें जे कारूनारू निरुपयोगी ठरवून सरकारच्या व गांवच्या नोकरींतून वजा केले, त्यांना काळी-पांढरींत कांहींएक हक्क देऊं नये. कालमानाप्रमाणें सर्व नारू व तिसऱ्या ओळींचे कारू-भट, गुरव, कोळी, सोनार, रामोशी, जंगम, मुलाना, ह्यांचें गांवकीचें काम बहुतेक नाहींसें झाल्यासारखें आहे. दुसऱ्या ओळींचे कारू-कुंभार, परीट, न्हावी, मांग ह्यांनाही म्हणण्यासारखें गांवकीचें काम पडत नाहीं. भराडी, गोंधळी, कार्यांच्या वेळीं गोंधळ व वाघ्ये, मुरळ्या, जागरण घालतात. सणाच्या दिवशीं तांबोळी दमडीटोलीचीं विड्याचीं पानें देतो आणि गुरव दोन चार पत्रावळी टाकतो, पण त्याच्या वीस पंचवीस पट किंमतीचें वाढणें त्याच दिवशीं दोघेही घेऊन जातात. अलीकडच्या फिरलेल्या काळांत भट, जंगम, सोनार वगैरेंचें कामही फार तुजबी पडतें. मडकीं, स्वस्त टिन व एनामेल वगैरेंचीं भांडीं, साबण, दोरखंडें रोखीनें मिळूं लागलीं तशी कुंभार, परीट, मांग ह्यांच्या कामाला आटण कळा आली आहे. कुणब्याची हजामत सरासरीनें पंधरा दिवस तें एक महिन्यानें होते, व मोठ्या माणसांच्या हजामतीस पाव अर्धा आणा पडतो. बरेच लोक डोकें ठेवूं लागल्यापासून, व कांहीं कांहींनीं स्वतः दाढी करण्याला सुरुवात केल्यापासून न्हाव्याचें काम पुष्कळ कमी होत चाललें आहे. तेव्हां सर्व नारू आणि दुसऱ्या व तिसऱ्या ओळींचे कारू ह्यांची जरूर पडेल तेव्हां त्यांना रोख मेहनताना द्यावा. त्यांनीं तो कितीही जास्त मागितला तरी वर्षानुवर्ष आलुतें बलुतें, वाणगी आणि सणावारांचीं वाढणीं व पोस्त ह्यांपेक्षां तो खात्रीनें कमी पडेल. पहिल्या ओळीपैकीं चांभाराची गरज बागाईत शेतकऱ्यांना जास्त लागते. बहुतेक चांभारकाम विकत पडतें. तेव्हां चांभारांचें सुद्धां बलुतें काढून त्याला रोख मेहनताना देण्याचा परिपाठ घात-

त्यास वावगें नाहीं. लांकूड दिवसेंदिवस महाग होत चाललें आहे. लोखंड लांकडापेक्षां काम चांगलें देतें. **टाटां**च्या कारखान्यांतून लोखंड मुबलक बाहेर पडूं लागलें तर शेतकामाकडे लांकडापेक्षां लोखंडाचा उपयोग अधिक होणार आहे, हें लक्षांत आणून सुताराची ओळ बदलणें व्यवहार्य दिसतें. महार जागले ह्यांच्या कामांत जी सरकारची व रयतेची सरकत आहे ती तुटली पाहिजे; आणि दुकानदारांनीं दुकानामागें दोन चार आणे व कुणब्यांनीं पट्टींत रुपयामागें पै दोन पै देऊन त्यांना रोख नेमणूक करून देण्याचें लोकलबोर्डमार्फत सरकाराकडे सोंपवावें. त्याशिवाय त्यांची पीडा दूर होणार नाहीं. बलुतेंआलुतें हें कारूनारूंचा मुशाहिरा होय. तो देशपरत्वें खाण्याच्या मुख्य धान्याच्या रूपानें द्यावयाचा असतो. दुसरें धान्य केल्यामुळें अगर इतर कारणामुळें जर मुख्य धान्य देणें शक्य नसेल, तर त्याचा मोबदला दुसऱ्या पिकानें किंवा रोकडीनें भरून काढावयाचा असतो. हा मूळ कयास आतां राहिला नाहीं. त्यामुळें कारूनारूंच्या मागणींत पहिल्यानें मोहबत व भीक आणि पुढें अडवणूक शिरून ती विनाकारण फाजील फुगली आहे. त्यांना जमिनी नसल्या तरी ते बीं–भरण घेतात, मुख्य आयाखेरीज शेतांत पिकेल त्याची वाणगी उपटतात व चोऱ्या करतात; आणि रयतवारी पद्धति, अधिकारविभागात्मक राज्यसुधारणा व व्यापारवृद्धि ह्यांमुळें त्यांचीं मामूल कामें सुटलीं किंवा हलकीं झालीं, तरी रयत–घेण्यांत ते यत्किंचित् मुजरा घालीत नाहींत. हा अन्याय–नव्हे–जुलूम आहे. आज कारूनारू कुणब्याजवळ शेतमाल मागतात, तेव्हां असें म्हणत नाहींत कीं ' इतकें काम केलें व त्याची मजुरी इतकी होते; ' तर ' माझा प्रपंच एवढा मोठा आहे आणि एवढ्यांत माझें कसें भागावें ?' जणों काय काम करो किंवा न करो व त्याची किंमत कांहीं असो, कुणब्यानें सर्वांचा प्रपंच चालविण्याचा वांटाच उचलला आहे ! ! क्वचित् ठिकाणीं मोठ्या जमीनदारांनीं आपल्या गड्यांना सुतारकाम, लोहारकाम शिकविलें आहे; व तें त्यांना बलुत्यापेक्षां फार स्वस्तांत पडतें.

सबब पहिल्या ओळीचे कारू आज निव्वळ कुणबिकीचें काम (ह्यांत इतर कारूनारूंच्या व गांवकीच्या कामांचा समावेश अगदीं करूं नये.) किती करतात, तें कोणत्या प्रतीचें करतात व ढळत्या अंदाजानें त्याची मजुरी काय होते, ह्याचा हिशेब करावा; आणि त्या निरखाबरहुकूम कुणब्यानें बलुतें द्यावें, अशी स्थिति निर्माण केली पाहिजे. गांवकऱ्यांना शेतकी सभांनीं ह्या कामांत समज व मदत दिल्यास त्यांचे डोळे उघडून ते आपला फायदा करून घेतील. ह्या ठरावाव्यतिरिक्त कुणब्यानें एक चुई कारूंना देतां उपयोगी नाहीं. ह्याप्रमाणें 'चाकरी आणि भाकरी' ह्यांची हिशेबी सांगड घालून दिली म्हणजे आज जें महार, मांग, भील, रामोशी ह्यांचें पेंढार आणि कामांपेक्षां सुतार, लोहार, चांभार ह्यांचें संख्याधिक्य गांवोगांव दृष्टीस पडतें तें ओसरेल, आणि कामाच्या मानानें कामकरी राहिले म्हणजे सर्वांना भरपूर काम व पोटभर दाम मिळून कुणब्याच्या मागचें जंजाल तुटल्यासारखें होईल.

रात्र फार झाली व कथळ्याचा निकाल लागला नाहीं, म्हणजे कांहीं कांहीं जंगली जाती तो पाटीखालीं झांकून ठेवतात; व दुसऱ्या दिवशीं फिरून पंचायत जमली म्हणजे पाटी उघडून तो अपुरा राहिलेला वाद पुनः सुरू करतात. तशी अवस्था वरील योजनेनें होणार आहे. कुणबी आणि कारूनारू ह्यांचा व्यवहार रोकडीचा झाल्याशिवाय तो चोख होणार नाहीं. जे कुणबी रोकड पैसा देऊन बलुत्यांकडून कामें करून घेतात, तीं त्यांना मनस्वीं स्वस्त पडतात. तेव्हां ज्यांना शक्य असेल त्या कुणब्यांनीं तावडतोब रोकडीनें बलुत्यांचीं कामें घेण्यास सुरुवात करावी. ऐनाजिनसी बलुत्यापेक्षां शेतमालाचे टक्के करून जर कुणबी कारूनारूंना देईल तर पैसा मोडण्याची पाळी आल्यानें तो जास्त चौकस होईल, खेड्यांत पैसा दृष्टीस पडल्यामुळें कारूनारू काम जास्त आस्थेनें करतील. 'कमी आलें जास्त गेलें' अशी दोघांचीही तक्रार उरणार नाहीं, आणि आलुत्याबलुत्यांना शेतमालाची किंमत नसल्यानें तो ते वाटेल तसा वाण्याला घालतात व त्यामुळें धान्याचे भाव उतरून कुणब्याचें जें नुक-

सान होतें तें होणार नाहीं. ह्याप्रमाणें रोकडीचा व्यवहार झाला तरी त्यांतली उधारी मोडल्याशिवाय खेडीं सांवरणें अशक्य आहे. रोकडीनें कुणबी व कारूनारू ह्यांची जखडबंदी सैलावेल इतकेंच. पण 'हा दाम व हें काम' अशी रोखी सुरू झाली तर मात्र कुणबी व कारूनारू हिशेबी बनतील, उभयपक्षीं खरी पोट-तिडक लागेल, आणि 'उधारीचें खातें सवा हात रितें' ही खेड्यांतली रड-कथा पुष्कळ कमी होईल. फिरस्त्यांच्या दाभाडांतून सुटून कुणबी कारूनारूंशीं 'रोख भाई ठोक' असा व्यवहार करूं लागला म्हणजे तो आपला बाजारही रोखीनें करण्यास शिकेल, आणि त्याचा खात्रीनें फायदा होईल. सध्यां यात्राच यात्रा बोकाळल्या आहेत. त्यांत गांवकरी फुकट खर्चाच्या भरीस सालोसाल पडतात, आणि लुच्चे, सोदे दुकानदार गिऱ्हाइकांना बुडवितात. ह्यासाठीं यात्रांची संख्या कमी झाली पाहिजे, म्हणजे त्याबरोबरच परधर्मांतले देव, उत्सव व त्यांचे भक्त हेही हटतील ख्यालीखुशाली, अन्नसंतर्पण ह्यांसाठीं पूर्वींचे राजे यात्रांना नेमणुका देत होते. आतांचें सरकार ज्ञानार्जनासाठीं काय ती मदत देतें. तिचा फायदा घेऊन कलोत्तेजन, ज्ञानसंपादन, व मनोरंजन ह्यांचीं पीठें यात्रा कशा करतां येतील यासंबंधानें **दुकानदारी** ह्या प्रकरणांमध्यें सूचना केल्या आहेत, त्यांचा जरूर तो विचार व्हावा.

हिंदुस्थानांत सध्यां अजमासानें शेंकडा ९४ लोक निरक्षर आहेत, आणि शाळेंत जाण्याजोग्या शंभर मुलांपैकीं सुमारें १७।१८ काय ते शाळेंत जातात. जोंपर्यंत कुणब्यांना व अडाण्यांना **तिसरा डोळा** नाहीं, तोंपर्यंत ग्राम-सुधारणा हा विषय निव्वळ मनोराज्यांत वावरणार. सरकारानें आजपर्यंत मिळविलेल्या व प्रत्यहीं मिळवीत असलेल्या नानाविध माहितीवरून आमचा समाज सुधारणेच्या कोणत्या पायरीवर आहे ही गोष्ट बहुजनापेक्षां सरकारला जास्त स्पष्ट झाली आहे. सरकारानें चलन दिल्याशिवाय लोक आपापली इष्ट सुधारणा करतील असें म्हटलें तर बहुतेक कपाळाला हात लावून कालक्रीडेकडे टकमक पहात बसण्याची पाळी येणार आहे. तेव्हां वरील योजना अमलांत येण्यासाठीं सरकारानें आमचा पांगुळ-

गाडा हांकला पाहिजे. सर्व धंदे जातिधर्म होऊन बसल्यामुळें एका जाती-च्या इसमाला दुसरीच्या धंद्यांत प्रवेश करण्यास पुष्कळ अडचणी येतात. सबंध इलाख्यांत कलाभुवनें हातानें मोजण्याइतकीं देखील नाहींत! आणि त्यांतही नियमित विद्यार्थ्यांना प्रवेश!! धंदा शिकण्याला सुतार, लोहार, चांभाराकडे तदितरानें जावें तर ते म्हणणार कीं 'तुम्ही आपला वडिलार्जित धंदा करा, आमचा धंदा हिरावून घेऊन आम्हांला भीक मागावयाला लावणार कीं काय'? ब्राह्मणाला सुतार–कारकुनाचें बरें वाटत नाहीं, कुणब्याला ब्राह्मण–नांगऱ्या खपत नाहीं, शिंप्याला सोनार–शिंपी पहावत नाहीं; फार काय ख्रिस्ती झालेले महारसुद्धां मांगांना गुरें ओढूं किंवा फाडूं देत नाहींत! ह्याप्रमाणें कोणीही आपलें कसब इतरांला दाखवीत नाहीं. जोंपर्यंत वाटेल त्याला वाटेल तो धंदा शिकण्याला साधनें मुबलक नाहींत, तोंपर्यंत लोक जातधंदा सोडीत नाहींत ह्याबद्दल त्यांना दोष देतां येणार नाहीं. सरकारानें शाळा काढून कारकुनी धंद्यांत ब्राह्मणेतर जातींचा शिरकाव होण्याची तरतूद केली आहे.परंतु तीही अद्यापि यशस्वी झाली नाहीं. शाळेंत मुलें घालणें हें आपल्या पिढीजाद धंद्यापेक्षां जास्त किफायतशीर असेल तरच ब्राह्मणेतर आपलीं मुलें शाळेंत घालतील. तशी किफायत होण्याला त्यांच्या डोळ्यांसमोर जें साधन दिसतें तें सरकारी नोकरी होय. ती मिळण्याइतकें शिक्षण देणाऱ्या शाळा सबंध तालुक्यांत फार तर दोन क्वचित् तीन असतात. तेव्हां पुरतें लिहिणें येणें आपल्या आटोक्याबाहेर आहे असें म्हणून निरक्षर जाती आपलीं मुलें शाळेंत घालण्याच्या भरीस पडत नाहींत. पुष्कळांचा असा अनुभव आहे कीं, दिवसांतून पांच सहा तास शाळेच्या सावलींत बसल्यामुळें रानांत हिंडणाऱ्या मुलांपेक्षां शाळेंत जाणारा नरम पडतो, त्याला ऊन्ह–वाऱ्यांत, थंडी–पावसांत काम करण्या-चा सराव लागत नाहीं, अंगमेहनत करण्याची लाज वाटते, व त्याची मिजास वाढते. इकडे लिहिणें पुरें झालें नाहीं म्हणून नोकरी मिळत नाहीं; तिकडे मळखाऊ शेतकाम, सुतारकी, मजुरी, पायपीट वगैरे होत नाहीं, व खर्च मात्र अधिक करावासा वाटतो, आणि त्याच्या निरक्षर बंधूंचा प्रपंच त्याच्यापेक्षां चांगला चालतो. सबब निराक्षरापेक्षां साक्षरांचा संसार जास्त

सुरेख चालतो, अशी खातरजमा झाल्याशिवाय शाळांत ब्राह्मणेतरांच्या मुलांची गर्दी होणें व प्राथमिकापेक्षां दुय्यम प्रतीचेंच शिक्षण जास्त फैलावतें ही तक्रार दूर होणें दुर्घट दिसतें. सन १८९१ तें १९११ पर्यंत दुय्यम शिक्षणाच्या शाळांतील विद्यार्थी दुपटीहून वाढले, पण प्राथमिक शाळांतील काय ते शेंकडा ६७ नींच वाढले. मिशनऱ्यांच्या गांवोगांव फुकट शाळा व त्यांमधील परोपरीचीं आकर्षकें असूनही त्यांनीं हातीं धरलेल्या निकृष्ट वर्गांत शिक्षणाचा प्रसार होत नाहीं ह्याचें वर्म तरी हेंच आहे. लिहिण्यावाचण्याला ' तिसरा डोळा ' म्हणतात. दोन जाऊन जर तिसरा येत असला तर तो हवा असें कोणीही म्हणणार नाहीं. पोटाचीं दोन कामें येऊन जर साक्षरतेचा लाभ झाला तर खरें कल्याण आहे. तेंव्हां प्राथमिक शाळेचा तरी अभ्यासक्रम व वेळ असा ठेविला पाहिजे कीं, विद्यार्थ्यांना लिहिणें शिकून आपला पिढीजाद किंवा दुसरा धंदा हस्तगत करण्याला सवड सांपडेल. ओबडधोबड आऊतकाठी तयार किंवा दुरुस्त करण्यासाठीं कुणब्याला आपल्या उत्पन्नाच्या चौथ्या वांट्यावर बलुतें द्यावें लागतें. ह्यास्तव प्राथमिक शाळांतून जर सुतारकी, लोहारकी, चांभारकी वगैरे विषयांचें शिक्षण देण्याची सोय झाली तर शाळेंत मुलें घातल्यापासून फायदा आहे असें लोकांच्या अनुभवाला फार थोड्या अवधींत येईल. शाळेंत धंदेशिक्षण घेऊन जे कुणबी बाहेर पडतील ते आपलीं बलुत-कामें घरच्या घरीं करतील. अशा रीतीनें त्यांचीं कामें वेळच्या वेळीं होऊन त्यांसाठीं खर्च होणारा पैसा व वेळ वांचला तर इतरांनाही आपलीं मुळें शाळेंत घालण्याची उमेद येईल. मि. कीटिंग साहेबांच्या अंदाजाप्रमाणें दाक्षिणेंतील शेतकऱ्यांना शेतकाम फार तर सहा महिने पुरतें. तर मग शेतकाम संभाळून त्यांना कारू-नारूंचें काम करण्याला पुष्कळ फुरसत आहे. तिच्यांत त्यांनीं कांहीं आऊतें केलीं तर तीं त्यांना विकतांही येतील, आणि आपल्या उत्पन्नांत भर टाकतां येईल. सध्यां जातिधर्माप्रमाणें कुणबिकीच्या आउतांपैकीं एक एक जातीचा कारू करतो, दुसरें दुसरीचा, एवढेंच नव्हे तर सनगाचे वेगवेगळाले भाग वेग-

वेगळाले कारू बनवितात. तेव्हां हत्यारें किंवा त्यांचे भाग बनविणारा एक, जोडणारा दुसरा, आणि वापरणारा कुणबी तिसरा असली तऱ्हा होते. त्यामुळें त्यांतलीं वर्में एकमेकांच्या ध्यानांत येत नाहींत व सर्वच आउतें अगदीं निकृष्ट अवस्थेप्रत पोंचलीं आहेत. परस्परावलंबी धंदे शाळेंत शिकविले तर हत्यारें एकाच्या देखरेखीखालीं तयार होऊन तीं सुधारतील, आणि सध्यां नजरेस पडणारे तुटपुंजे कारखाने बसून त्यांच्या जागीं मोठ्या प्रमाणावर धंदे काढण्याची व चालविण्याची अनुकूलता कारागिरांना येईल. जोडा कोठें लागतो हें वापरणाराला तेव्हांच कळतें. ह्या न्यायानें आउतें वापरणाऱ्या कुणब्याला जर त्यांतली नजर आली तर तो त्यांतले दोष काढून टाकण्यासाठीं शक्य तितके प्रयोग करून पाहील, आणि सुधारलेलीं हत्यारें तयार करील. जातिबाह्य धंद्यांचें शिक्षण सर्व जातींच्या मुलांना सर्रास प्राथमिक शाळांतून मिळूं लागलें तर जातिधर्माची अथवा जातधंद्याची कांटेरी कुपाटी नाहींशी होईल, हा सर्वांत मोठा फायदा आहे.

खेड्यांतला मुख्य धंदा शेतकी. तेव्हां कुणबी हा खेड्यांतला प्रधान घटक आणि कुणब्यासाठीं इतर हें नातें लक्षांत आणून खेड्याखेड्यांनीं शाळा काढल्या पाहिजेत. शेतकामाच्या हंगामास धरून शाळेचे तास व सुट्या असाव्यात. शेतकाम नसेल अशा दिवसांत शाळा दुवक्त असावी, तें बेताचें असेल त्या वेळीं एकवक्त, आणि त्याचा भर असेल त्या वेळीं विद्यार्थी शिकविलेलें न बोळवतील इतक्या बेतानें म्हणजे सुमारें एक दोन तास शाळा भरवावी. शाळेंत शारीरिक बलवृद्धीला महत्त्व दिलें पाहिजे; आणि अभ्यासक्रम इतकाच असावा कीं, शिकणाराला बाजारांत अडचण पडूं नये, सावकाराशीं तोंड देतां यावें आणि आपल्या धंद्याचें ज्ञान वाढवतां यावें; म्हणजे **व्यवहार्य** व **प्रोद्दीपक शिक्षणाची** तरतूद केली पाहिजे. लिहितां वाचतां येणें, पाहिलेली व ऐकलेली वस्तु व हकीगत मजकूर जुळवून सांगतां व लिहितां येणें, उजळणी, देशी चालीचीं कोष्टकें, ( ज्याला परदेशी कोष्टकांचें कारण पडेल तीं तो जरुरीप्रमाणें पुढें शिकेल. ) तोंडचे हिशेब, जमाखर्च, पंचराशिक,

सुरेख चालतो, अशी खातरजमा झाल्याशिवाय शाळांत ब्राह्मणेतरांच्या मुलांची गर्दी होणें व प्राथमिकापेक्षां दुय्यम प्रतीचेंच शिक्षण जास्त फैलावतें ही तक्रार दूर होणें दुर्घट दिसतें. सन १८९१ तें १९११ पर्यंत दुय्यम शिक्षणाच्या शाळांतील विद्यार्थी दुपटीहून वाढले, पण प्राथमिक शाळांतील काय ते शेंकडा ६७ नींच वाढले. मिशनऱ्यांच्या गांवोगांव फुकट शाळा व त्यांमधील परोपरीचीं आकर्षकें असूनही त्यांनीं हातीं धरलेल्या निकृष्ट वर्गांत शिक्षणाचा प्रसार होत नाहीं ह्याचें वर्म तरी हेंच आहे. लिहिण्यावाचण्याला ‘ तिसरा डोळा ’ म्हणतात. दोन जाऊन जर तिसरा येत असला तर तो हवा असें कोणीही म्हणणार नाहीं. पोटाचीं दोन कामें येऊन जर साक्षरतेचा लाभ झाला तर खरें कल्याण आहे. तेंव्हां प्राथमिक शाळेचा तरी अभ्यासक्रम व वेळ असा ठेविला पाहिजे कीं, विद्यार्थ्यांना लिहिणें शिकून आपला पिढीजाद किंवा दुसरा धंदा हस्तगत करण्याला सवड सांपडेल. ओबडधोबड आऊत-काठी तयार किंवा दुरुस्त करण्यासाठीं कुणब्याला आपल्या उत्पन्नाच्या चौथ्या वांट्यावर बलुतें द्यावें लागतें. ह्यास्तव प्राथमिक शाळांतून जर सुतारकी, लोहारकी, चांभारकी वगैरे विषयांचें शिक्षण देण्याची सोय झाली तर शाळेंत मुलें घातल्यापासून फायदा आहे असें लोकांच्या अनुभवाला फार थोड्या अवधींत येईल. शाळेंत धंदेशिक्षण घेऊन जे कुणबी बाहेर पडतील ते आपलीं बलुत-कामें घरच्या घरीं करतील. अशा रीतीनें त्यांचीं कामें वेळच्या वेळीं होऊन त्यांसाठीं खर्च होणारा पैसा व वेळ वांचला तर इतरांनाही आपलीं मुलें शाळेंत घालण्याची उमेद येईल. मि. कीटिंग साहेबांच्या अंदाजाप्रमाणें दक्षिणेंतील शेतकऱ्यांना शेतकाम फार तर सहा महिने पुरतें. तर मग शेतकाम संभाळून त्यांना कारू-नारूंचें काम करण्याला पुष्कळ फुरसत आहे. तिच्यांत त्यांनीं कांहीं आऊतें केलीं तर तीं त्यांना विकतांही येतील, आणि आपल्या उत्पन्नांत भर टाकतां येईल. सध्यां जातिधर्माप्रमाणें कुणबिकीच्या आउतांपैकीं एक एक जातीचा कारू करतो, दुसरें दुसरीचा, एवढेंच नव्हे तर सनगाचे वेगवेगळाले भाग वेग-

वेगळाले कारू बनवितात. तेव्हां हत्यारें किंवा त्यांचे भाग बनविणारा एक, जोडणारा दुसरा, आणि वापरणारा कुणबी तिसरा असली तऱ्हा होते. त्यामुळें त्यांतलीं वर्मे एकमेकांच्या ध्यानांत येत नाहींत व सर्वच आउतें अगदीं निकृष्ट अवस्थेप्रत पोंचलीं आहेत. परस्परावलंबी धंदे शाळेंत शिकविले तर हत्यारें एकाच्या देखरेखीखालीं तयार होऊन तीं सुधारतील, आणि सध्यां नजरेस पडणारे तुटपुंजे कारखाने बसून त्यांच्या जागीं मोठ्या प्रमाणावर धंदे काढण्याची व चालविण्याची अनुकूलता कारागिरांना येईल. जोडा कोठें लागतो हें वापरणाराला तेव्हांच कळतें. ह्या न्यायानें आउतें वापरणाऱ्या कुणब्याला जर त्यांतली नजर आली तर तो त्यांतले दोष काढून टाकण्यासाठीं शक्य तितके प्रयोग करून पाहील, आणि सुधारलेलीं हत्यारें तयार करील. जातिबाह्य धंद्यांचें शिक्षण सर्व जातींच्या मुलांना सरांस प्राथमिक शाळांतून मिळूं लागलें तर जातिधर्मांची अथवा जातधंद्याची कांटेरी कुपाटी नाहींशी होईल, हा सर्वांत मोठा फायदा आहे.

खेड्यांतला मुख्य धंदा शेतकी. तेव्हां कुणबी हा खेड्यांतला प्रधान घटक आणि कुणब्यासाठीं इतर हें नातें लक्षांत आणून खेड्याखेड्यांनीं शाळा काढल्या पाहिजेत. शेतकामाच्या हंगामास धरून शाळेचे तास व सुट्या असाव्यात. शेतकाम नसेल अशा दिवसांत शाळा दुवक्त असावी, तें बेताचें असेल त्या वेळीं एकवक्त, आणि त्याचा भर असेल त्या वेळीं विद्यार्थी शिकविलेलें न बोळवतील इतक्या बेतानें म्हणजे सुमारें एक दोन तास शाळा भरवावी. शाळेंत शारीरिक बलवृद्धीला महत्त्व दिलें पाहिजे; आणि अभ्यासक्रम इतकाच असावा कीं, शिकणाराला बाजारांत अडचण पडूं नये, सावकाराशीं तोंड देतां यावें आणि आपल्या धंद्याचें ज्ञान वाढवतां यावें; म्हणजे **व्यवहार्य** व **प्रोद्दीपक शिक्षणाची** तरतूद केली पाहिजे. लिहितां वाचतां येणें, पाहिलेली व ऐकलेली वस्तु व हकीगत मजकूर जुळवून सांगतां व लिहितां येणें, उजळणी, देशी चालीचीं कोष्टकें, ( ज्याला परदेशी कोष्टकांचें कारण पडेल तीं तो जरुरीप्रमाणें पुढें शिकेल. ) तोंडचे हिशेब, जमाखर्च, पंचराशिक,

व्यवहारी अपूर्णांक, क्षेत्रमापन, व्याज, काळ-काम-वेग वगैरेंचीं साधीं उदाहरणें, आणि बेताची चित्रकला हे विषय मेहनतीनें शिकविले पाहिजेत; म्हणजे आज बहुतेक तात्यापंतोजीच्या शिक्षणक्रमावर भागेल. ह्याशिवाय व्यापार, प्रांतापुरती राज्यव्यवस्था, इतिहास, सृष्टिसौंदर्य ह्यांच्या अनुरोधानें इलाख्याचा भूगोल विद्यार्थ्यांचे हातांत पुस्तक न देतां नकाशावरून शिकवावा; आणि हिंदुस्थानचा भूगोलही व्यापारी बातम्या व वर्तमानपत्रें समजण्याइतका नकाशावरून शिकवावा. इतिहास शिक्षकानें वाचून अगर व्याख्यान-रूपानें शिकवावा. चित्रें व नकाशे काढण्याचें तांत्रिक ज्ञानही मुलांना मिळालें पाहिजे. ह्यांखेरीज सर्व-सामान्य ज्ञानावरील पाठ शिक्षकांनीं मुलांना वाचून दाखवावेत, आणि दर्शनी ज्ञानानें म्हणजे शक्य तितक्या वस्तु व प्रयोग दाखवून प्रत्यक्ष ज्ञान देण्याची खबरदारी बाळगली पाहिजे. सामान्य ज्ञानाचें शिक्षण जितकें जास्त मिळेल तितका आमचा हास्यास्पद देवभोळेपणा नाहींसा होईल. दुष्काळ, प्लेग, पटकी वगैरेंचें सुद्धां आदिकारण देवापेक्षां नैसर्गिक नियमांकडे जास्त येतें, ह्या व असल्या गोष्टी लोकांना कळूं लागल्या तर भोंदूंचें बंड कमी होऊन जनता योग्य मार्गानें जाईल. सर्वसामान्य ज्ञान ह्या विषयामध्यें माणसा-जनावरांचें आरोग्यशास्त्र, शारीरशास्त्र, हवा, पाणी, स्वच्छता, वनस्पतिशास्त्र, भूगर्भशास्त्र, रसायनशास्त्र, खगोल, पदार्थविज्ञानशास्त्र, यंत्रशास्त्र, वगैरेंच्या रोजच्या व्यवहारांत लागणाऱ्या शास्त्रीय माहितीचे सोपे पाठ असावेत. तसेंच शेतकी व तिला जरूर अशी दुसरी माहिती ह्यांचाही त्यांत अंतर्भाव व्हावा. या ज्ञानाचा मुख्य हेतु हा कीं, पदार्थ अगर वस्तुस्थिति पाहून तिच्यामध्यें सुधारणा कर-ण्याचें सामर्थ्य विद्यार्थ्यांच्या आंगीं यावें. उदाहरणार्थ, बीं गोमूत्रांत कां भिजवितात, कोयत्याचें पातें अगर कुऱ्हाडीचा दांडा लांब किंवा आंखूड कां असावा, मोटेला कणा कशाला पाहिजे, गाड्यांचीं चाकें उंच किंवा ठेंगणीं असावींत कीं काय, इत्यादि ज्या गोष्टी लोक पाहतात व करतात, त्या सुधारण्याबद्दलचे विचार व प्रयोग करण्याची पात्रता

विद्यार्थ्यांच्या आंगीं आणिली पाहिजे, म्हणजे शाळेंतील अभ्यासाच्या साह्यानें ते आपलें ज्ञान पुढील आयुष्यक्रमांत वाढवूं शकतील, आणि आपली कल्पना चालवून नवीन सुधारणा अगर शोध करूं शकतील. शाळेमध्यें हात, पाय, डोळे, बुद्धि हीं सर्व उपयोगांत आणण्यास शिकविलें पाहिजे; म्हणून सामान्य ज्ञानाचे प्रयोग विद्यार्थ्यांच्या हातून करून घ्यावेत, आणि त्यांना सुतारकी वगैरेंचीं हत्यारें फुकट व मनमुराद वापरण्यास मिळावींत. हा इतका शिक्षणक्रम फार तर तीन चार वर्षांत वांटून द्यावा; आणि त्याचें वाङ्मयात्मक शिक्षण ( ह्यांत सामान्य ज्ञानाच्या सप्रयोग शिक्षणाचा अंतर्भाव होत नाहीं. ) शाळेंत सुमारें रोज तीन तास एकसांज द्यावें, म्हणजे मुलांना एकसांज आपल्या आईबापांना शेतांत किंवा दुसरीकडे मदत करण्यास व आपला पिढीजाद धंदा प्रत्यक्ष काम करून शिकण्यास वेळ सांपडेल. असलें शिक्षण समजण्याला विद्यार्थ्यांचें वय अगदींच लहान असतां उपयोगीं नाहीं. तें निदान गुराखी पोराइतकें म्हणजे ८ तें १२ वर्षांचें असावें. रोथामस्टेड पद्धतीनें शेती शिकविली तर फार थोड्या जमिनीवर काम भागतें. पूर्व प्रशियामधील मारग्राबोवा येथील शाळेंत १५९ विद्यार्थ्यांना शेतीचें शिक्षण देण्यास सुमारें एक एकर जमीन बस्स होते. प्रत्येक शाळेला एक शेत द्यावें, आणि त्याची सर्व कुणबीक मुलांकडून करवून घ्यावी, इतकेंच नव्हे तर त्यांतील माल विकण्याला देखील मुलांना बाजाराला पाठवावें. त्याचप्रमाणें डागडुजीपुरती सुतारकी, लोहारकी, चांभारकी, मुलांना शिकविण्याची तजवीज व्हावी. हें शिक्षण देणारे शिक्षक तयार होईपर्यंत निरक्षर पण वाकबगार शेतकरी, सुतार, लोहार वगैरे गांवचे जातकसबी इत्यादिकांकडून तें देण्याची सोय झाली तरी देखील आडला गाडा पुढें ढकलल्यासारखें होईल. ह्या कारूंना व्याख्या वगैरे न आल्या म्हणजे पुस्तकी ज्ञान नसलें तरी ते आपलें कसब **काम कामाचा गुरु** ह्या प्राच्य शिक्षण-पद्धतीनें नामी शिकवितील. लिहिणें वगैरे एकसांज आणि कुणबीक व तिच्या अंगभूत धंदे ह्यांचें शिक्षण दुसरी सांज ह्याप्रमाणें अभ्यासाची वांटणी करावी. शेतकीसुधा-

रणेसंबंधानें सरकारी व खाजगी रीतीनें प्रसिद्ध होणारी माहिती वगैरेंची ओळख विद्यार्थ्यांस तसेंच गांवकऱ्यांस शिक्षकानें करून द्यावी, आणि शेतकी खात्याची त्यावर देखरेख असावी. शेती सुधारण्यासाठीं **सर सासून डेव्हिड** ह्यांनीं सरकारापाशीं टोलेजंग देणगी दिली आहे. वर दर्शित केलेल्या नमुन्यावर शाळा काढण्याकडे जर तिचा उपयोग केला तर किती तरी बहार होईल !

गुन्हेगार जातींचीं मुलें व भल्या जातींतील अल्पवयी गुन्हेगार ह्यांचा प्रश्न फार बिकट आहे. 'बीज तसा अंकुर' आणि 'बाळा तें जन्म काळा' हे सिद्धांत पाश्चात्य तत्त्ववेत्त्यांच्याही अनुभवास उतरले आहेत. पूर्वजांचे गुणदोष मुलांत वंशपरंपरेनें उतरतात; आणि लहानपणीं ज्या खोडी लागतात, त्या मरेपर्यंत सुटत नाहींत. तेव्हां निर्ढावलेल्या गुन्हेगारांपासून अल्पवयी गुन्हेगार दूर ठेवणें जितकें जरूर आहे तितकीच गुन्हेगार जातींच्या मुलांची व त्यांच्या आईबापांची थान–तोडही जरूर आहे. व्हिक्टर ह्यूगोनें असें गणित बसविलें आहे कीं, एखाद्याला सुधारणें झाल्यास त्याच्या आजापासून सुरुवात केली पाहिजे; म्हणजे आनुवंशिक गुणदोष निदान तीन पिढ्या तरी राहतात. गुन्हेगार संतान निपजूं नये म्हणून निसवलेल्या गुन्हेगारांना खच्ची करण्याचा प्रयोग अमेरिकेंत चालू आहे. ह्या विषयाचें महत्त्व ओळखून सरकार गुन्हेगार जातींच्या मुलांच्या स्वतंत्र शाळा काढीत आहे. भल्या जातींतल्या ज्या अल्पवयी तरुणांच्या हातून संगतिदोषानें किंवा अप्रबुद्धपणानें गुन्हा घडला असेल त्यांना निर्ढावलेल्या गुन्हेगारांचा संपर्क लागू देतां कामा नाहीं. अशा अल्पवयी गुन्हेगारांसाठीं सरकारनें थोड्या फार शाळा घातल्या आहेत, आणि त्याबद्दल तें **धारवाड** येथें **बोर्स्टल** पद्धतीनें मोठ्या प्रमाणावर प्रयोग करून पाहात आहे. गुन्हेगार जातींच्या मुलांच्या व अल्पवयी गुन्हेगारांच्या शाळांचा एक मोठा उपयोग करून घेतां येईल. येवलें, भिंगार, पाथर्डी, संगमनेर, पैठण अशा ठिकाणीं विणकामाचा धंदा जोरांत आहे; तेव्हां तेथल्या प्राथमिक शाळांत ह्या धंद्यांचें ज्ञान दिलें तर चांगलें. शेतीव्यतिरिक्त दुसरा

धंदा भरभराटींत असलेलीं गांवें फार थोडीं आहेत. म्हणून कुणबीक हा प्रधान धंदा धरून खेड्यांतल्या शाळांचा शिक्षणक्रम मुक्रर केला पाहिजे. असली अटक गुन्हेगारांच्या शाळांना नाहीं. गुन्हेगार जातींना प्रतिष्ठित जातकसब मुळींच नाहीं. नवट जमिनीमध्यें वाटेल ती सोय व उदीमें काढतां येतात. सुधारलेल्या आउतांचा कुणब्यांमध्यें प्रसार होण्याला मुख्य अडचण ही आहे कीं, त्यांचा एक खिळा निघाला किंवा टांचा उसवला तर गांवच्या सुतार–लोहार–चांभारांना तें काम नीट करतां येत नाहीं. सुधारलेलीं हत्यारें नवीन व दुरुस्त करणाऱ्या कसब्यांचा गांवोगांव भरपूर पुरवठा करण्याची सोय झाल्यावांचून आमची शेती व दुसरे धंदे ह्यांची उन्नति होणार नाहीं. ह्या शिक्षणाची सोय गांवगन्नाच्या शाळेंत होणें आज तरी अशक्य दिसतें. निदान तें अशक्य नसलें तरी मनस्वी खर्चाचें आहे, आणि इतका खर्च करण्याला लोकलबोर्ड–म्युनिसिपालिट्यांसारख्या संस्थांना आज सवड आहे असें दिसत नाहीं. गुन्हेगारांच्या शाळांत जर हें शिक्षण मुख्यत्वें दिलें तर अशा शिक्षितांना पटापट काम मिळून चांगली पैदास होईल, व गुन्हा करण्याची हुक्की फारशी येणार नाहीं; आणि कुणब्यांचीही अडचण व गैरसोय दूर होईल. कामकुचरपणा, उद्यांची पर्वा न करणें, दुसऱ्यावर विसंबणें, कामाचा बाट धरणें, उत्कृष्ट कामकरी बनण्याच्या महत्वाकांक्षेचा अभाव वगैरे जे दोष आमच्या मजुरांत दिसतात, ते घालविण्याचा प्रयत्नही ह्या शाळांत नेटानें झाला पाहिजे. दिलेल्या चित्रांत दुरस्ती करणें आणि कोऱ्या कागदावर नवीन चित्र काढणें ह्यांत जें अंतर आहे, तेंच विवाक्षित परिस्थितींत वाढणाऱ्या मुलांचें शिक्षण आणि मनांत आणूं ती परिस्थिति निर्माण करूं अशा स्थितींत वाढणाऱ्या मुलांचें शिक्षण ह्यांत आहे. तेव्हां ह्या वहिमी मुलांच्या शाळा देशाला जितक्या प्रकारें उपकारक होतील तितक्या कराव्या अशी सरकारास नम्र विनंति आहे.

क्वचित् असें घडतें कीं, गुन्हेगार जातींच्या लोकांनीं प्रामाणिकपणानें उद्योग करण्याचें मनांत आणिलें तरी त्यांना कोणी जवळ करीत नाहीं.

ते गुन्हा करतील आणि आपल्याला प्रायश्चित्त द्यावें लागेल, अशी लोकांना भीति वाटते. कानफाट्या नांव पडल्यामुळें कोठें कांहीं गुन्हा झाला कीं ह्यांना पोलीसचें बोलावणें यावयाचें. ते गेले म्हणजे कामाची खोटी होते, ही त्यांना कामावर ठेवण्यांत दुसरी अडचण होय. पूर्वी गुन्हेगार जातींच्या मागें हजरी असे, व तिजमुळें त्यांना उद्योग पत्करणें कठीण जाई. मुसलमानांच्या मागें हजरी नाहीं म्हणून ती चुकविण्यासाठीं हजेरीं-तला एक भील मुसलमान झाला व त्यानें नांव बदललें असें एका गावीं आढ-ळलें. गुन्हेगार जातींच्या लोकांप्रमाणें शिक्षा भोगलेल्या भल्या जातींच्या लोकांनाही कोणी कामावर ठेवीत नाहींत. असले इसम बेकार होऊन उपाशीं मरण्यापेक्षां तुरुंगांत जाऊन पोट भरण्याचा हेतु धरून मुद्दाम गुन्हे कर-तात. कामधंदे मिळवून देऊन गुन्हेगारांना समाजाचे उपयुक्त घटक बनवावें, व पुन्हा गुन्हा करण्याकडे त्यांची प्रवृत्ति होऊं नये म्हणून त्यांना मदत करण्यासाठीं सरकारच्या आश्रयानें एक संस्था मुंबईस निघाली आहे. भरपूर लोकाश्रय मिळून तिची फत्ते होवो! ह्या कामीं आज गांठचा पैसा जातो असें जरी कोणाला वाटलें तरी दूरदृष्टीनें पहातां हें कोणालाही अंदा-जतां येईल कीं, गुन्हेगारांना प्रामाणिक कामगार बनविण्यांत खर्च होणारा पैसा त्यांच्या चोऱ्यादरोड्यांच्या ऐवजाच्या मानानें कांहींच नाहीं, व त्यांचे पिढीजाद गुन्हे बंद होण्यांतच सर्वांचें शाश्वत हित आहे. पार्शी कर्ण **टाटाशेट** ह्यांनीं लक्षावधि रुपये देऊन मुक्तिफौजेमार्फत गुन्हेगार जातींच्या वसाहती करण्यास सुरुवात केली आहे, व सरकारही प्रांतोप्रांतीं सदर संस्थेला ढळत्या हातानें पैसे पुरवीत आहे. हिंदू, मुसलमान, आर्य, ब्राह्मो वगैरे धर्मांनीं पुढें सरसावून ह्या पुण्य कृत्याला कंबर बांधली तर त्यांना ह्या कामीं मुक्तिफौजेपेक्षांही सत्वर व परिणामकारक यश येईल. सरकारनें कैकाडी लोकांना सोलापूर जिल्ह्यांत निरनिराळया गांवीं जमिनी देऊन बैलांसाठीं तगाईही दिली. तथापि एकमेकांना भेटण्याच्या बहाण्यानें ते गांवोगांव चोऱ्या माऱ्या करीत, अशी शेतकऱ्यांची तक्रार होती. विजापूर जिल्ह्यांत गुन्हेगारांची एक नवीन वसाहत सरकारानें काढली आहे, आणि

ती यशस्वी होण्याचा संभव आहे. अशा रीतीनें वसाहतींत किंवा शाळांत अगर अन्य तऱ्हेनें जे गुन्हेगार किंवा गुन्हेगारजातींचे लोक भरंवशालायक कामकरी ठरतील, त्यांना पहिल्यानें स्वतंत्र पण योग्य बंदोबस्तांत काम मिळालें आणि तेथें त्यांच्या चालचलणुकीचा बोभाटा झाला नाहीं, म्हणजे इतर लोकांप्रमाणें त्यांनाही हलकें हलकें खाजगी काम मिळून इमानें इतबारें पोट भरतां येईल. अशा प्रकारें काम मिळूं लागेपर्यंत केवळ पोटासाठीं अथवा अल्पस्वल्प दिखाऊ फायद्यासाठीं लांडीलबाडी करण्याचा मोह त्यांना पडणार नाहीं ह्याबद्दल सरकार व सार्वजनिक संस्था ह्यांनीं खबरदारी ठेविली पाहिजे. ‘ गप्प बसण्याचें काय घेशील ’ या तत्त्वाप्रमाणें त्यांना सार्वजनिक पैशानें पोसलेलें पत्करलें, पण त्यांचे गुन्हे नकोत. कारण गुन्हेगारांना शिक्षा देण्यापेक्षां गुन्हा होऊं न देण्याचे शिक्षणप्रसारासारख्या योजनेला खर्च व खटपट कमी पडते, असें लॉर्ड मेकॉले ह्यांनीं आपल्या शिक्षणावरील भाषणांत सिद्ध करून दाखविलें. मुदतबंदीच्या करानें जे मजूर नेण्यांत येतात त्यांमध्यें जर गुन्हेगारजातींच्या लोकांची भरती केली तर स्वार्थ व परार्थ दोन्ही साधतील. अशा मजुरांच्या धन्यांना कायद्यानें ज्या विशेष सवलती दिल्या आहेत, त्यांचा मोबदला म्हणून वहिमी मजूर पत्करणें हें ‘ देवाण घेवाण ’ अशांतलें होईल. हे लोक शरीरानें सुदृढ व अक्कलेनें चलाख असतात, आणि थोड्या बंदोबस्तानें ते आपल्या धन्याचें कोट कल्याण करून देतील ह्यांत शंका नाहीं. कोणाचा आधार नसल्यामुळें पर ठिकाणीं त्यांना चांगलें वर्तन ठेवावें लागेल आणि कामही भरपूर करावें लागेल. अशा रीतीनें वठणीस येऊन व लायक कामकरी बनून जर ते आपापल्या मुलखांत परतले, तर मजुरांच्या तुटवड्याचा प्रश्न सोडविण्यास बरीच मदत होईल.

चालत्या गांवगाड्यांतलें पुष्कळ भरित ह्या बोलत्या **गांव-गाड्या**बाहेर उरलें आहे; आणि तें कोठें गांवांत तर कोठें वनपर्वतांत पांगलें आहे. आपल्या ह्या बंधूंना निरक्षर म्हणून मागासलेले गणण्याची चाल पडली आहे. पण गंजाखालीं पाणीदार पोलादही निमूटपणें दिवस कंठतें,

हें विसरतां कामा नये. हे लोक अनादि कालापासून बिकट परिस्थितीशों झगडून संसारयात्रा करीत असल्यामुळें नानातऱ्हेचें–विशेषतः शेती, वनस्पति, मनुष्य–पशु–पक्षी–वैद्यक इत्यादींचें–ज्ञानभांडार त्यांच्या तोंडांत व दिल–दप्तरांत नुसतें खेळत आहे. जर साक्षर मंडळी नमतें घेऊन त्यांच्याच सुतासुतानें घेतील तर ह्या वस्तुस्थितीविषयीं त्यांची बालंबाल खात्री झाल्यावांचून राहणार नाहीं. तसेंच मानापमान गुंडाळून ठेवून जर संशोधक व सुधारक रानोमाळ हिंडून त्यांच्यामध्यें मिसळतील तर नानाविध सामाजिक, धार्मिक व ऐतिहासिक माहितीचीं किती तरी मनोरम व बिनमोल लेणीं ह्या नैरक्षर्य–पर्वताच्या उदरांत दडून राहिलीं आहेत, हें त्यांना कळून येऊन विलक्षण ज्ञानानंदाचा अपूर्व आस्वाद लाभेल ह्यांत संशय नाहीं. तेव्हां ह्या बाहेर राहिलेल्या भरिताचाही थांग व व्यवस्था लावणें त्वरित व देशहितास्तवच नव्हे तर मानवधर्मपालनास्तवही अत्यंत इष्ट आणि अवश्य आहे. ठिकठिकाणच्या लोकाग्रणींनीं मनावर घेतलें तर एक दोन तपांत बाताबेताच्या खर्चानें हें कांम बरेंच उठेल; आणि ते त्याला हातभार लावतील अशी उमेद बाळगण्यापुरतीं सुचिन्हें क्षितिजावर स्पष्ट दिसत आहेत. कारण आपल्या समाजांतले अनेक भाग चहूंकडून खडबडून जागे झाले आहेत, आणि कित्येक तर फुंकून रस्ताही चालूं लागले आहेत. तरी **गांव–गाड्यानें** धरलेली वाट बरोबर आहे किंवा नाहीं? नसल्यास कोठें व कशी दिशाभूल झाली, ह्याचा निर्णय देण्यासाठीं अधिकारी मार्गोपदेशकांना नम्रतेनें फूल लावून त्यांचा शकुन मिळेपर्यंत तूर्त येथेंच तो सोडूं या.

## पुरवणी.

# महायात्रा.

आडक्या हत्ती झाला म्हणून का भलत्यानें घ्यावा? । **अनंत फंदी.**

काश्याम्मरणान्मुक्तिः । 'मरावें काशी का मरावें मिराशी' 'न लागो पुत्राचा हात पण लागो डोमाची लाथ.' असें लोक म्हणत आले आहेत. 'काशीयात्रा घडो' हा आशीर्वाद बहुधा विधवा स्त्रियांना देण्याचा प्रचार आहे. 'माझ्या नशिबांत महायात्रा आहे काय?' असें आपला हात किंवा पत्रिका सामुद्रिक–ज्योतिष्याला दाखवून विचारणारे जुन्या समजुतींचे पुष्कळ गृहस्थ निघतील. **प्रयाग, काशी,** आणि **गया,** ह्या त्रिस्थली यात्रेला **महायात्रा** म्हणतात. प्रयागास त्रिवेणीचे वृत्तिवान् उपाध्ये प्रयागवाळ, काशीस मणिकर्णिकेचे गंगापुत्र व गयेस गयावाळ असे तद्देशीय तीर्थोपाध्याय आहेत. उत्तर हिंदीस्तानांत उपाध्यायाला सामान्यत्वें पंड्या म्हणतात. ह्या तिन्ही क्षेत्रांचें महात्म्य वर्णन केलें आहे असे अनेक कथाभाग संस्कृत–प्राकृत ग्रंथांमध्यें जागोजाग आढळतील. तरी ह्या कर्मभूमींत जन्म घेऊन महायात्रा घडावी; आणि प्रयागामध्यें त्रिवेणीस्नान व सौभाग्यवतीचें वेणीदान करावें, काशीमध्यें मणिकर्णिकास्नान व पिशाचमोचन करावें, तसेंच कालभैरवाचे देवळांतील गंडे–विक्याकडून त्याचा हलका सोटा खाऊन यमराजाचा मोठा सोटा चुकवावा, गयेमध्यें विष्णुपदावर पिंडदान आणि अक्षय वटाखालीं गयावळाकडून आत्मसहित सर्व कुलाची जन्ममरणापासून मुक्ति करून घ्यावी, असें प्रत्येक हिंदूच्या मनांत येणें साहजिक आहे.

---

१ काशीवासाविषयीं भर्तृहरीची आतुरता इतकी होती—

कदा वाराणस्याममरतटिनीरोधसि वसन् ।
वसानः कौपीनं शिरसि निदधानोऽञ्जलिपुटम् ॥
अये गौरीनाथ त्रिपुरहर शम्भो त्रिनयन ।
प्रसीदेत्याक्रोशन्निमिषमिव नेष्यामि दिवसान् ॥ वैराग्यशतक

पूर्वी वाटेच्या अडचणीमुळें काशीयात्रा करणें मोठें जिवावरचें होतें. यात्री परत येईलच असा भरंसा नसल्यानें, यात्रेला निघण्यापूर्वीं आप्तेष्टांनीं त्याला जेवावयास बोलविण्याचा आणि परत आल्यावर त्यानेंही कालाष्टक व गंगापूजन करून मोठें जेवण (मावंदें) घालण्याचा प्रघात पडला. तेव्हां अति निवडक लोक काय ते महायात्रेच्या भानगडींत पडत, आणि यात्राही पण फार तर वर्षांतून एकदां म्हणजे वसंताचे सुमारास जात असे, असें तिन्ही क्षेत्रांचे उपाध्याय व गांवोगांवचे लोक सांगतात. आतां आगगाडी झाली, दक्षिण-उत्तरेचें परूस-आंगण झालें, व रेलवे-भाडें कमी दिसूं लागलें. चिकित्सा न करितां ब्राह्मण करतात एवढ्या हवाल्यावर ते करतात तितकीं कर्में व विधि करण्याची लालसा कारकुनी शिक्षणप्रसाराबरोबर जसजशी फैलावत चालली, तसतशी महायात्रेला यच्चयावत् जनता लोटूं लागली; आणि केव्हांही पहा त्रिस्थळींत यात्रेकरू नाहींत असा एकही दिवस उगवेनासा झाला आहे. वर वर्णन केलेली अनुकूल संधि प्राप्त होतांच तीर्थोपाध्यांनीं चपळाई केली, आणि आपली अमदानी म्हणजे यात्रेकरूंची संख्या वाढविण्याच्या उद्देशानें प्रयागवाळ-गंगापुत्र-गयावाळ-परस्पर-साह्य-कारक मंडळ्या अस्तित्वांत आल्या. मजुरांच्या भरतीसाठीं ज्याप्रमाणें चहाचे मळेवाले आपले एजंट देशोदेशीं पाठवितात, त्याप्रमाणें ह्या मंडळींनेंही आपले दलाल व नोकर प्रांतोप्रांतीं फेंकिले आहेत; इतकेंच नव्हे तर त्यांपैकीं कांहीं जणांनीं पुणतांबें, नाशिक, सारखीं क्षेत्रें शहरें व मनमाड, भुसावळ, खांडवा, इटारसी, जबलपूर, सारखीं स्टेशनें वगैरे ठिकाणीं कायमचे डेरे दिले आहेत. असें सांगतात कीं, ... नांवाच्या गयावळाचे १६०० गुमास्ते देशावरावर घुमतात. ही संख्या अतिशयोक्तीची मानली तरी एवढें मात्र खास कीं, यात्रेकरू जमविण्याच्या व्यापारांत हजारो हिंदुस्थानी गुंतले आहेत. ते हरप्रयत्नानें यात्रेकरू येण्याची व त्यांच्या द्रव्यबलाची बातमी मिळवितात,

१ अहमदनगर जिल्ह्यांतल्या एका वकिलांनीं कोर्टांत काम करतों असा मोघम धंदा पंड्याला सांगितला. त्यानें तार करून ते ऐपतदार असल्याबद्दल माहिती आणविली. वकील झाडोझाड हिंडले असले तर पंड्ये पानोपान हिंडलेले असतात !

त्याला कोणत्याही गांवीं किंवा स्टेशनावर गांठलें की पुसूं पुसूं बिलबिला करतात, आणि एवढ्यावर तो हातीं चढला नाहीं तर आपले मालकास अगर पुढील उतार स्टेशनच्या इसमास तार देऊन तो हस्तगत करण्याची कसोशी करतात. आम्ही प्रयागवाळाचे नोकर तुम्हांपासून खाण्यापुरते मूठभर तांदूळ घेऊन मालकाचे खर्चानें बद्रिनारायणापर्यंत तुमच्या बरोबर येऊं व खडी तैनात पहारा करूं, तुम्हीं तुळशीपत्र दिलें तरी आमचा मालक त्यांत संतोष मानील व तुमची यात्रा सुफळ करून देईल, इत्यादि प्रमाणें हे लोक साखर पसरतात. प्रयागवाळही आमचा माणूस म्हणून सदर इसमांना यात्रेकऱ्यांबरोबर पुढें पाठवितात, व गंगापुत्र आणि गयावळ हेही झांकली मूठ सहसा उघडी करून दाखवीत नाहींत. वास्तविकपणें हे लोक नुसते प्रयागवाळांचेच दलाल नोकर नसून गंगापुत्र व गयावळ ह्यांचेही असतात, आणि कदाचित् पुढील क्षेत्रांच्या पंड्यांचेही असतील. बारीक तपास करतां असें निश्चयात्मक समजलें आहे कीं, ह्या भरती करणाऱ्यांपैकीं बहुतेक जण पंड्यांचे नोकर नसून पातीदार आहेत; आणि सामान्यतः जरी त्यांची पाती आठ आण्याची असते, तरी कांहीं भिकार तीर्थभट केवळ भोजन व भोजनदक्षिणा ह्यांवर तृप्त होतात, आणि यात्रेकऱ्यांची सर्व किफायत ह्या आडत्यांना देतात. असेंही ऐकण्यांत आलें कीं, साधल्यास हे तैनाती यात्रेकरूंची चोरी करतात, किंवा आपल्या सामलतींतल्या चोरट्यांना सधन यात्रेकरूंची खबर देतात. अर्थात् यात्रेकरूला मोहिनी घालण्याच्या नानाप्रकारच्या भिक्षुकी व्यापारी युक्त्या हे कां योजितात, ह्याचा ह्यापेक्षां अधिक उलगडा करण्याचें प्रयोजन नाहीं. ह्यांखेरीज यात्रांचे स्थानिक भरेकरी आहेतच. यात्रेकरू काबीज करण्याचें मुख्य ठिकाण प्रयाग होय. तेथें त्याला एकदां रोखला म्हणजे गंगापुत्र व गयावळ ह्यांचीदेखील निचिंती होते. कांहीं प्रयागवळांनीं स्टेशनच्या खेपा करणाऱ्या हिंदू मुसलमान गाडीवानांशीं सरकत केल्याचें ऐकिलें आहे. यात्रेकरूंनीं उपाध्यायाचें नांव सांगितलें तरी हे गाडीवान त्याला आपल्या सरकतदाराच्या घरीं आणून सोडतात, आणि तोच तो इसम आहे असें

भासवितात. अगोदरच फुगलेल्या आमच्या भिक्षुकांच्या संख्यत ह्याप्रमाणें सहस्रावधि भर पडली, व तिच्यायोगानें यात्राभरतीचें काम झपाट्यानें व मोठ्या प्रमाणावर चालू आहे. ज्याप्रमाणें पलटणीच्या तुकड्या अंमलदाराच्या मागें चालतात त्याप्रमाणें दक्षिण प्रांताचे हजारों शेतकरी, सोनार, कासार, सुतार, लोहार, साळी, माळी, धनगर, वगैरे गांवढेकऱ्यांच्या झुंडीच्या-झुंडी लाठीवाल्या भरेकऱ्याच्या मागें चालतात. तो त्यांना आपल्या मालकाच्या अथवा भागीदाराच्या घरीं नेऊन गुदरतो, त्यांच्या जवळपास आपला चौका देतो, आणि आपल्या कळपांतले लोक कोठेंही बाहेर जावयाला निघाले तर त्यांचेपुढें पहारेकऱ्याप्रमाणें चालतो. त्याचें ऐटदार पाऊल आणि त्याचे मागें आमचे लोकांची मेंढ-माळ पाहिली म्हणजे आम्ही किती व कसे परवश होतों ह्याची तीक्ष्ण प्रतीति येऊं लागते.

यात्रेकरूला वाटतें कीं परमुलखांत अल्पसंतुष्ट व माहीतगार वाटाड्या मिळाला, सबबआतां ठिक ठिकाणचा निरख माहीत नसल्यामुळें जी फसवाफसवी व्हावयाची ती होणार नाहीं. आपण आडत्ये आहोंत हें भांडें फुटलें नाहीं तोंवर गिऱ्हाईक बिचकणार नाहीं आणि आपला व्यापार अप्रातिहत चालेल हें भरेकरी जाणून असतो. त्यामुळें स्टेशन, धर्मशाळा वगैरे ठिकाणचे नोकर, दुकानदार, गाडीवान, हमाल इत्यादि सर्वांची तोंडदाबी केल्याखेरीज त्याला गत्यंतर नसतें; आणि त्याच्या सल्ल्यानें यात्रेकरूचे एका पैशाचे ठिकाणीं दोन तीन देखील जातात. ते, उपाध्ये व त्यांचे इतर नोकर यात्रेकरूंशीं 'अन्नदाता, धर्मावतार' इत्यादि मिष्ट भाषण करतील, ह्या मुलखाचे सर्वच लोक बदमाष म्हणून त्यांबद्दलचा ओठापासून तिट्कारा दाखवतील, परंतु त्यांनीं तोंडावाटें काढलेले दाम वाजवी अंकावर उतरविणार नाहींत; उलट तितकेचे तितके देण्याची शिफारस करतील, आणि त्यांतून आपली चोरटी हिस्सेरशी घेतील. आडत्यांनीं जरी सांगितलें कीं आमचा मालक अल्पसंतोषी आहे, तरी त्याला नोकर, यात्रा-दलाल ह्या सर्वांचा खर्च काढावयाचा असतो. म्हणून जेथें ज्यापासून जितकें

निघेल, तेथें तितकें त्यापासून काढण्याला कोणीही कमी करीत नाहीं. प्रयागवाळ, गंगापुत्र व गयावळ हे एकाचे एक असल्यामुळें प्रयागास कमी पडलें तर त्याची कसर काशीस निघते, आणि तेथेंही कमी पडलें तर त्याच्या दिढीदुपटीचा वचपा गयावळ यात्रेकरूंकडून पिळन काढतात.

हिंदुस्थानीपेक्षां दाक्षिणात्य ब्राह्मण आचार—कांडांत तरबेज आचार-संपन्न व वैदिक याज्ञिक विद्येंत चांगले निष्णात असतात, ही गोष्ट सर्व-संमत आहे; आणि त्यामुळें महाराष्ट्रीच काय पण दक्षिणेमध्यें वापरलेले मारवाडी, गुजराती यात्रेकरू देखील महाराष्ट्री सांगता उपाध्याय मिळविण्यास उत्सुक असतात. प्रयागवाळ व गयावळ ह्यांच्याकडे त्यांच्या पुढ्यांतले महाराष्ट्रीय उपाध्याय कसेबसे अजून मिळतात. परंतु काशींत दाक्षि-णात्य ब्राह्मण व गंगापुत्र ह्यांच्यामध्यें वाद चालू आहे. दाक्षिणात्यांचें म्हणणें असें आहे कीं, काशींत मणिकर्णिकेशिवाय गंगापुत्रांना पौरो-हित्य नाहीं असें सरकारदरबारीं निवाडे झाले आहेत. सबब गंगापुत्रां-कडे यात्रेकरू उतरला असतां महाराष्ट्रीय ब्राह्मण कर्म चालविण्याला येत नाहीं, आणि तें यथासांग करण्याची अडचण पडते. अशी स्थिति आहे तरी गंगापुत्राकडे महाराष्ट्रीय ब्राह्मण मिळतील, अशी थाप सरकतीचा स्वार्थ साधण्यासाठीं भरेकरी व प्रयागवाळ यात्रेकरूला बेलाशक मारतात; आणि ते त्याला सरकतदार गंगापुत्राकडे नेऊन गुदरतात. सकृद्दर्शनीं गंगा-पुत्रही छातीला हात लावून सांगतो कीं, मी दक्षिणी ब्राह्मण आणून देतों; आणि तो आयत्या वेळेला तोंडघशीं पाडतो, तेव्हां यात्रेकरूला ह्या परस्पर-साह्यकारी टोळीच्या लबाडीची पहिली ठोकर लागल्यासारखी होते. ' आली सिंहस्थ पर्वणी । न्हाव्या भटा झाली धनी ' ॥ ' कथड्याशीं कैंचा

१ मुंबईकडील एका ज्ञातान्या कोळणीनें सांगितलें कीं, 'मी गंगेवर येतें न येतें, तोंच उपाध्यायानें माझा हात धरला. मला वाटलें तो मला हात देतो. पण पहातें तों त्यानें तो एका कालवडीच्या शेपटीला लावला व म्हणाला कीं तूं गोप्रदान केलें, आठ रुपये टाक; गाईला हात लावल्यावर नाहीं कसें म्हणावें असें माझे मनांत येऊन मीं चुंबीत आठ रुपये काढून दिले.

भाव । पुजाऱ्याशीं कैचा देव '॥ ह्या साधुश्रेष्ठाच्या उक्तींला हरताळ कोण लावील ? यात्रेकरूचें कर्म यथासांग होतें कीं नाहीं, व तें तसें न झालें तर त्यांत कांहीं दोष आहे कीं काय ? ह्याशीं ह्या दोन पैसे कमविण्यासाठीं निर्माण झालेल्या भिक्षुकी टोळ्यांना काय करावयाचें आहे ? कोणीकडून तरी शिकार साधली म्हणजे त्यांचें काम झालें. तरी दक्षिणी ब्राह्मणांकरवीं तीर्थविधि व्हावा अशी ज्यांची इच्छा असेल त्यांनीं खबरदारी घेऊन प्रयागासच दक्षिणी ब्राह्मणाच्या मार्फत बिऱ्हाड घ्यावें, म्हणजे पुढचे गोते टळतील. पैशासाठीं उत्तर हिंदुस्थानी पंड्ये नाहीं नाहीं ते आचार फैलावीत आहेत, आणि अज्ञजनाची वंचना करीत आहेत. असें सांगतात कीं मारवाडी गुजराती लोक वेणीदान करीत नाहींत. परंतु दाक्षिणात्यांत पहावें तों त्याचा भयंकर प्रसार झाला आहे. विधवा-केशवपनासंबंधानें खुद्द ब्राह्मणांत रण माजून राहिलें आहे. परंतु तुमच्यांकडून ब्राह्मणाचे आचार करवून तुमचा धार्मिक दर्जा वाढवितों, आणि ब्राह्मणी पुण्य मिळवून देतों; असें कुणब्याधुणब्यांना मधाचें बोट दाखवून हे वृकोदर त्यांच्यामध्यें विधवा-केशवपन भराभर पसरीत आहेत. ही एकच गोष्ट त्यांच्या भिक्षुकीचें व्यापारी स्वरूप दाखविण्यास पुरी आहे.

तीर्थोपाध्याय हें वतनवृत्तीचें अति नासकें फळ होय. त्यांच्या सामान्य नीतिमत्तेचा विचार बाजूला ठेवला तरी त्यांच्या यात्रेकरूसंबंधाच्या व्यवहाराकडे कानाडोळा करतां येत नाहीं. विमलाचरण आणि अगाध विद्वत्ता ह्यांना पावन क्षेत्रें आणि मनसोक्त प्राप्ति ह्यांपेक्षा अधिक काय पाहिजे ? प्रयागवाळ, गंगापुत्र व गयावळ ह्यांकडे डोळे उघडून पहा म्हणजे वतनदारी आणि सद्गुण ह्यांमध्यें छत्तिसाचा आंकडा आहे अशाविषयीं देहांत उजेड पडल्यावांचून राहणार नाहीं. त्यांना पंड्या(पंडित),व महाराज म्हणतात; परंतु बहुतेक वेदशास्त्रशून्य असतात, तें इतकें कीं त्यांना स्नानसंकल्प देखील शुद्ध सांगतां येत नाहीं. इकडे विद्येच्या नांवानें असली रड; तथापि हत्ती, घोडे, गाड्या, मोटार, चाकर, आडत्ये, वगैरेंच्या खर्चासाठीं

दक्षिणा फुगतच चालली आहे!! घोड्याची शेप देखील ज्यांमध्यें दृष्टीस पडत नसे असे सत्स्फूर्तिदायक व मनःकमलोन्मीलन करणारे साधे प्रेमळ ऋषींचे आश्रम कोणीकडे आणि ज्यांमध्यें विलासी लवाजमा व ऐषआरामाचा दर्प कोंबला आहे अशा गयावळांच्या हवेल्या कोणीकडे ? शास्त्र ह्यांना दक्षिणा देण्याला सांगतें ती ह्यांनीं शाश्वत वेदविद्या पाळावी ह्मणून, का ओकारी येईपर्यंत नश्वर ऐश्वर्य उपभोगावें म्हणन ? ' घोडा आपल्या गुणावर दाणा वाढवून खातो ' ही म्हण वतनदार उपाध्यांनीं पार खोटी करून दाखविली आहे. निमी दक्षिणा निरक्षर शूद्रवृत्तीच्या दलालांनीं घ्यावी हाच का आमचा उत्तमोत्तम आर्यधर्म ? क्षेत्रांच्या ठिकाणीं क्षौर करा, श्राद्ध करा, वेणीदान द्या, वगैरे कर्में करण्यास आमच्या आचार्यांनीं आज्ञा केली. परंतु तीं ज्यांकडून करवावयाचीं त्यांनीं किती विद्या संपादन करावी व विधिपूर्वक कर्म करण्यासाठीं त्यांनीं किती मोबदला घ्यावा ह्याला धरबंद घातला नाहीं. त्यामुळें हे वृत्तिवंत अनक्षर तोंड वाशीतच आहेत आणि लोक बडतच आहेत. **ठाकरां**सारख्या पहाडांत राहणाऱ्या अक्षरशून्य ज्ञातींत इतका विचार असावा कीं नवरीच्या बापानें दहा कीं बारा रुपायांपेक्षां जास्त पैसे घेतले तर त्याला जात शासन करते; आणि अठरा वर्णांचे साक्षर गुरु जे ब्राह्मण त्यांच्या जातींतल्या प्रयागवळांनीं वेणीदानाच्या वेळीं, गयावळांनीं पिंडदानाच्या वेळीं, किंवा मथुरेस चोब्यांनीं, दाक्षिणेसाठीं यात्रेकरूंना त्राहि भगवान् करून सोडावें व धर्मनियंत्रणासाठीं प्रांतोप्रांतीं वर्षानुवर्ष संचार करणाऱ्या **श्रीशंकराचार्यांनीं** हा बाजार बेलाशक उघडया डोळ्यांनीं चालूं द्यावा, ह्यापेक्षां आमच्या धर्मविडंबनेची व आंधळेपणाची निरुत्तर साक्ष दुसरी कोणती असूं शकेल ? एकतर आचारकांडांतून हीं कर्में काढा, आणि ठेवणें असेल तर ह्या

---

१ **श्री रामचंद्रा**च्या अश्वमेधांतील घोडा पाहून भगवान् **वाल्मिकी**च्या आश्रमांतले विद्यार्थी गोंधळून जाऊन **लवाला** सांगतात—चटवः। कुमार अश्वोऽश्व इति पशुसमाम्नाये कोऽपि भूतविशेषो जनपदेषु श्रूयते। सोऽयमस्माभिरधुना स्वयं प्रत्यक्षीकृतः। **उत्तररामचरितम्** ।

सट्टेबाज उपाध्यायांना वेदमुख करा व त्यांच्या दक्षिणेची किमान अल्प इयत्ता ठरवा. धर्माध्यक्षांची हुकमत ह्या गोमुखव्याघ्रांवर चालत नसेल तर शास्त्रांनीं धर्माचे नांवावर लोकांची अशी नागवणूक करणें म्हणजे खाटिकवाड्यांत शेळ्या हांकून लावण्यासारखें आहे.

जातां जातां दुसऱ्या एका गोष्टीचा उल्लेख केला पाहिजे. पूर्वी थोडेसे कर्मठ लोक पायदळ किंवा बैलगाडीनें प्रवास करून अन्यक्षेत्रस्थ देवांवर गंगाजल आणून घालीत, आणि त्यांच्या सोईसाठीं अशी सवलत निघाली असावी कीं पारोशाचा किंवा हिंदु गाडीवान वगैरेंचा स्पर्श झाला तरी गंगाजलाला बाट नाहीं. परंतु त्याचा अर्थ असा नसावा कीं, त्याला अति शूद्र, म्लेंच्छ, ऋतुमती स्त्रिया किंवा सुतकी जन ह्यांचा स्पर्श झाला तरी तें देवाच्या अभिषेकाला चालतें. असें असेल तर सध्यां जे हजारों लोक--विशेषतः उत्तर हिंदुस्तानांतले गांवढेकरी व चोहोंकडचे साधू-गंगाजलाच्या कावडी किंवा भांडीं आगगाडीनें नेऊन गयागदाधर, वैजनाथ, रामेश्वर, त्र्यंबकेश्वर वगैरे अनेक क्षेत्रस्थ देवांवर अथवा इतर घरच्या दारच्या उपास्यदेवदेवतांवर रिचवितात, हें विधिवत् कीं अन्यथा आहे ह्याचा कोणी आचार्यांनीं विचार केला आहे काय ? नसल्यास जरूर करावा आणि आगगाडीनें गंगोदक नेण्यामध्यें अज्ञ लोकांच्या कालाचा, पैशाचा व मेहनतीचा जो दुरुपयोग होत आहे तो होऊं देऊं नये.

तीर्थें, क्षेत्रें करून मानसिक अगर आध्यात्मिक उन्नति पदरांत पाडून घ्यावी तर तिला उपरिनिर्दिष्ट परिस्थिति किती योग्य व उपकारक आहे, ह्याचा निर्णय ज्याचा त्यानेंच करावा. त्यांकडून शारीरिक उन्नतीला मदत होईल असें म्हणावें तर तसें घडणें सर्वथैव अशक्य आहे. सरसकट रोगी-निरोगी यात्रेकरूंच्या डोक्यावर चालविलेले वस्तारे, तीर्थांचे आसपास पडलेले केंसाचे ढीग व मलमूत्रविसर्जनाची दुर्गंधि, सर्व प्रकारच्या लाखों यात्रेकरूंनीं स्नानें करून व पिंड सोडून खराब झालेले बहुतेक कुंडांचे व फल्गूसारख्या नद्यांचे पाण्यांत स्नान, हजारों रुपये मिळत असतांही पंड्यांनीं प्रयागचें सरस्वतीकुंड, काशीची ज्ञानवापी, मणिकर्णिका इत्यादि व फल्गुचे झिरे वगैरे

मुळींच साफ न ठेविल्यामुळें त्यांतल्या अति घाणेरड्या पाण्याचें तीर्थप्राशन, देवळाच्या भोंवतालीं गराडा घातलेल्या भिकाऱ्यांचा अमंगळपणा, देवळांतील गर्दी व रोगी—महारोगी ह्यांनीं तेथें तुडविलेल्या पाण्यांतून व चिखलांतून जाणें येणें, पंचामृताच्या अतिरेकाचा न्हाणीमधून सुटणारा वास, पैसा मागण्यासाठीं अंगस्पर्शापर्यंत महारोगी देखील करीत असलेली लगट, गलिच्छ दाट वस्ती व आसमंतात् पसरलेली घाण, श्राद्धें व दर्शनें ह्यांमुळें जेवणास होणारा नित्य अवेळ, वाटेवरचे व क्षेत्रींचे दुकानदार विकीत असलेला भेसळीचा, निकस आणि कुपथ्यकर शिधा, हीं सर्व एकवटलीं म्हणजे आरोग्य कसें रहावें व वाढावें? यात्रा करून धडधाकट परत येणें मुष्किलीचें समजतात तें यथार्थ आहे! हिंदूंचें जें प्रधान पवित्रस्थान काशी तीं बेसुमार कोंदट व घाण असावी, ही हिंदू म्हणविणाऱ्या प्रत्येक इसमास मोठ्या शरमेची गोष्ट आहे. निदान ती तरी नमुनेदार, खुलावट, स्वच्छ आणि सर्वतोपरी आरोग्यदायक व दर्शनीय करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. आपलीं देवालयें, तीर्थें व क्षेत्रें निरोगी करण्यासाठीं ज्या त्या समाजानें झीज सोसणें व जरूर ती वर्गणी उभारणें अवश्य आहे. आणि शेंकडों मंदिरें बांधण्यांत, सांड ( देवाचे नांवानें सोडलेलीं जनावरें ) वाढविण्यांत, व कुपात्रीं दानांत जो पैसा जातो तो अशा उपयुक्त कामांत खर्च करण्याची सुबुद्धि आमचे लोकांना होईल तो सुदिन म्हणावयाचा !!

विद्वान्, साधु इत्यादींना भोजन व दक्षिणा देऊन त्यांचा सत्कार करण्याचा प्रशस्त प्रघात आमच्यांमध्यें अनादि आहे असें म्हटलें तरी चालेल. पुढें पुढें मागेल त्याला—मग तो विद्वान् असो किंवा टोणपा असो, निरीह संत असो किंवा ‘ लोक म्हणती बुवाबुवा ! न कळे गुलामाचा कांवा॥ ’ अशा कोटींतला असो—द्रव्य देणें ह्यांतच पुण्य आहे अशी लौकिक समजूत होत गेली; आणि तिनें भिक्षुकवृत्तीचा मूळ बांध फोडून वतनदार तीर्थोपाध्यांखेरीज सर्व जातींच्या आळशी, लतकोडगा, आयतखाऊ लोकांना ह्या फुकटच्या धंद्यांत लोटलें. श्रीविश्वनाथाच्या मंदिराचें उदाहरण घ्या. त्याच्या आंत बाहेर नाना प्रकारच्या देवदेतांनीं असा वेढा देऊन नाके-

बंदी केली आहे कीं, त्यांचें दर्शन घेतां घेतां आणि त्यांपुढें पैसा अधेला ठेवतां ठेवतां पुरे वाट होते ! ह्या चक्रव्यूहांतून बाहेर पडावें तेव्हां कोठें मुख्य देवाचें दर्शन होतें. तपासाअंतीं असें समजलें कीं, अनेक स्वार्थी पुजाऱ्यांनीं मोठमोठ्या देवळांमध्यें जागा विकत घेतली व तेथें देवदेवतांची स्थापना करून आपल्या पोटपाण्याची निचिंती केली. ह्याप्रमाणें मुख्य देवांच्या वतनदार पुजाऱ्यांना हे पुजारी जडले व त्यांमध्येंही पुष्कळ पेंढार भिक्षुकांची भर पडली, आणि सर्व ठिकाणच्या क्षेत्राक्षेत्रांनीं जिकडे तिकडे देवळेंच देवळें, मूर्तीच मूर्ती, आणि याचकच याचक झाले आहेत. याचक वृत्तीनें एकटा ब्राह्मण वर्णच डागला आहे असें नाहीं, तर ती हिंदु समाजाच्या अगदीं शेवटच्या थरापर्यंत जाऊन खेंटली आहे हें मागें सांगितलेंच आहे. अनेक जातींचे हजारों लोक तीर्थांवर, देवळांत आणि दोहोंच्याही वाटांनीं असलेल्या स्टेशनांवर व धर्मशाळांत दान मागतात. त्यांमध्यें जे कोणी देवाच्या मूर्ती व व चित्रें दाखवून पैसे मागतात, त्यांना अट्टल म्हटलें पाहिजे. त्रिवेणीच्या खेपा करणाऱ्या नावाड्यांना सरसकट कमींत कमी दोन रुपये प्राप्ति होते. एका कोळयानें ह्याच्यापेक्षां ज्यास्त किफायत मिळविण्याची युक्ति काढली, ती अशीः त्यानें आपले नावेमध्यें गंगायमुनेच्या मूर्ति बसविल्या आहेत, व त्यांच्या पुढें तो कोणा तरी राख फांसलेल्या साधूला रोजंदारीनें घंटा वाजविण्याला व आशीर्वाद देण्याला बसवितो. यात्रेकरूंची नाव दिसली कीं तिचे पुढें तो आपली नाव आणितो व पैसे उकळतो. क्षेत्रांच्या न्हाव्यांचा अनुभव घेतला म्हणजे जातधंद्याच्या पद्धतींतले दोष चांगले दिसून येतील. त्रिस्थळीच्या न्हाव्यांना इन्कम्‌टॅक्स आहे असें सांगतात. परंतु बहुतेकांचा हात व हत्यार वाईट असतें. ते क्षौराचे पैसे शहरच्या चांगल्या न्हाव्यापेक्षांही ज्यास्त घेतात आणि तेही हक्कानें रुसून व भांडून. ह्याखेरीज धर्म म्हणून आणखी पैसे मागत सुटतात.

१ अलीकडे **पंढरपूरच्या** आगगाडीमध्यें कांहीं आंधळे अभंग गाऊन थाटानें पैसे मिळवितात.

कित्येक तर ह्या विधीचें गंभीर स्वरूप न जुमानतां क्षौराचे पाठोपाठ सधन यात्रेकरूंचे पाय रगडतात आणि बक्षीस मागतात !! गाडीवानाचा व हमालाचा धंदा बडा छाकटा असतो. रस्त्यावरील स्टेशनें व त्रिस्थळी येथें त्यांचा रोजगार असा चालला आहे कीं पुसूं नका. त्यांच्या माग-णीला आगा–पिछा मुळींच नसतो. कड लावण्यापर्यंत ज्ञान व फुरसत असलेला यात्रेकरू लाखांत एखादा. त्यामुळें त्यांच्या तोंडाला रक्त लागून त्यांचा जबडा दिवसेंदिवस फुगतच आहे. बिऱ्हाडाचें ठिकाण तसेंच तेथून देऊळ, स्नानाचा घाट वगैरे किती दूर आहे हें माहीत नसल्यामुळें आणि उपाध्यायांच्या मिंधेपणामुळें गाडीवान चांगलेच चरतात, आणि दुप्पट भाड्याचा ठराव झाला असला तरी शेवटीं ‘ बाक्षिस ’ ‘ धर्म ’ किंवा ‘ पोलीसची ’ दस्तुरी म्हणून दोन चार आणे तरी कटकट घालून ज्यास्त काढतात. शहरांतल्या हमालांचाही तोच नमुना. रेल्वे हमाल पाहतां मनमाड कांहींसें बरें. परंतु भुसावळपासून पुढें त्यांच्या थापाथापीस व आडवणुकींस सीमा नाहीं. महारजागल्यांचें पोट ज्याप्रमाणें रयतेकडून होणाऱ्या प्राप्तीवर चालतें त्याप्रमाणें ह्या हमालांचें पोट परभारें उतारूंवर चालतें, एवढेंच नव्हे तर त्यांना परवाना काढण्यासाठीं रेलवे कंपनीला दरसाल तीस चाळीस रुपये फी भरावी लागते असें सांगतात. असें ऐकण्यांत येतें कीं, रेलवेच्या नोकरींतल्या हमालाला बारा रुपये दरमहा आहे. तथापि त्यांच्या जागांपेक्षां लायसेन्स्ड कुलीच्या ( बिन पगारी हमाल ) जागांवर शेकडों उड्या पडतात आणि त्या मिळविण्याला पुष्कळ शिफारस भिड-वावी लागते. रेलवे हमालांचें म्हणणें असें आहे कीं, ‘ आम्हांला रेलवे कामगारांच्या मकानांत व कचेऱ्यांत पाळीपाळीनें बिगार करावी लागते, आणि जी मिळकत होते तिच्यांत ‘ प्राप्तीचा अर्धा वांटा ’ किंवा अधिक पडद्याआड घेणारे पुष्कळ आहेत. त्यामुळें जरी दीड दोन रुपये रोज आमच्या हातांत येतो तरी पदरांत कांहीं पडत नाहीं ’ वगैरे, वगैरे. स्टेशनपासून धर्म-शाळा किती दूर आहे हें पुष्कळ उतारूंना माहीत नसल्यानें रेल्वे हमाल पहिल्यानें हक्कानें मिळणाऱ्या मजुरीपेक्षां दसपट अधिक सांगतात, आणि

मोठ्या मिनतवारीनें चौपट पांचपट मजुरीवर बोजे नेण्याला कबूल होतात. उतारू म्हणतील कीं आम्हांपैकीं एक जण धर्मशाळा पाहून येतो, तर रेलवे पोलीस कान्स्टेबल तिकीट मास्तर वगैरेंचा तगादा लागतो कीं आधीं स्टेशनाबाहेर पडा. कमजास्त करून स्टेशन हमालाकडून टेशनाबाहेर बोजे न्यावे आणि ते तेथून बिऱ्हाडापर्यंत नेण्यासाठीं दुसरा हमाल पहावा ह्या उद्देशानें येण्याजाण्याची वाट सोडून रस्त्याच्या कडेला गांठोडीं लावून इकडे तिकडे पहावें, तों स्टेशन हमालाचे सांगीवरून स्टेशनाबाहेरचे पोलीस मागें लागलेच समजा कीं चाल बोजा उठाव. अशा कोंडमाऱ्यांत स्टेशन हमाल मागेल तें कबूल करावें लागतें. रेलवेचे पोलीस व हलके नोकर ही खळखळ पाहातात, पण उतारूला त्यांची मदत क्वचित् पोंहोंचते. हमाल, गाडीवान, दुकानदार, नावाडी, वगैरे सर्वांचा एकच भिक्षुकी मंत्र, मोठे यात्रा करण्याला निघालां! कांहीं धर्म करा, पुण्य करा, कोणाला दुःख देऊं नका. स्टेशनांतून बाहेर पडलें ह्मणजे हे हमाल असेल तेथील म्युनिसिपालिटीच्या जकातीच्या नाकेदाराला खुणावितात, आणि तोही चिरीमिरी मागतो. तसेंच गाडी येण्याच्या अगोदर तिकीट काढण्याचें आमिष दाखवून ते कोचिंग क्लार्कच्या नांवावर तिकिटामागें आणा दोन आण्याचा चट्टा देऊन तिकिटें काढून देववितात, आणि चांगली जागा धरून बसण्यासाठीं अगाऊ गेलें पाहिजे असें सांगून रेलवे पोलीस व तिकीट कलेक्टर ह्यांच्या नांवानें आठचार आणे पानसुपारी घेऊन गाडींत बसवितात. थोड्या वेळानें पहावें तर प्रवाशांची एकच गर्दी गाडींत घुसते, आणि सर्व पैसे फुकट गेले असें आशाळू प्रवाशाला कळून येतें. फक्त गाडींत जागा देतो एवढ्या मेहरबानीखातर कित्येक हमाल काडीचें ओझें न उचलतां उतारूंना गच्च भरलेल्या डब्यांत आणून गुदरतात आणि त्यांकडून दोन चार आणे उपटतात.

[१] जबलपूर स्टेशनवर सर्व अधिकारी लोकांचें यात्रेकरी लोकांकडे फार दुर्लक्ष आहे. याकरितां सदरचें स्टेशन चुकवून दुसरे स्टेशनचें तिकिट घ्यावें. **साळूजीजी-कृत काशीयात्रा** पृष्ठ ९.

अशा प्रकारें फुकटफाकट सावलींत फारसें अंग न झिजवितां अवाचे सवा पैसे मिळूं लागल्यामुळें शेतीसारख्या उत्पादक व प्रामाणिक धंद्यांतून गांवढेकरी बाहेर पडत आहेत, आणि क्षेत्र व स्टेशन हमालीच्या उडाणटप्पू धंद्यांत गर्दी करीत आहेत. डब्यांत किती उतारू बसवावयाचे हें त्यांतल्या पाटीवर लिहिलें असतें. तितके उतारू बसल्यावर जो कोणी रेलवे नोकर त्यांत अधिक उतारू बसवील त्याला रेलवे आक्टचें (सन १८९० चा अंक९) कलम १०२ प्रमाणें वीस रुपयेपर्यंत दंड होतो. ह्या कलमाची अमलबजावणी होत नसावी. ती होती तर रेलवेचें बहुतेक उत्पन्न सरकारला दंडापायींच अर्पण करावें लागतें! खरें पाहूं गेलें तर ह्या कामीं रेलवेकडेही फारसा दोष नाहीं. त्यांच्या तरतुदीपेक्षां जर जास्त यात्रा लोटूं लागली तर त्यांनीं तरी आयत्या वेळेला डबे कोठून आणावेत ? सबब त्यांना संकटांत न घालण्याचा उपाय म्हटला म्हणजे यात्रेकरूंची संख्या ओसरली पाहिजे. स्टेशनावरच्या काय आणि यात्रांच्या वाटांवरच्या गांवांतल्या किंवा क्षेत्रांतल्या दुकानदारांत काय, लोभ आणि लबाडी नखशिखांत भरली आहे. परवाना–फी द्यावी लागते, एवढ्या सबबीवर स्टेशनदुकानदार डावा माल ठेऊन तो कमींतकमी सवाईनें महाग विकतात. तीर्थविधीचें सामान चौपट महाग मिळतें. कारण विचारतां इनकमटॅक्स द्यावा लागतो असें सांगतात. निकस घाणेरडा शिधा दुकानदार दिढीदुपटीनें महाग देतात. पैसाबट्ट्याशिवाय प्रयागसारख्या इलाखाच्या ठिकाणीं देखील खुर्दा किंवा मोड मिळत नाहीं. कलाकुसरीच्या जिनसा क्षेत्रांत पुष्कळ मिळतात, परंतु ठकबाजी व दलाली ह्यांचा तडाखा जबर बसतो. काशीस कोणताही माल घेण्याला गेलें कीं रिकामटेकडे दलाल न बोलावतां मागोमाग येतात, आणि गिऱ्हाइकाला नाहक्क बुडवितात. सारांश उपाध्ये, भिक्षुक व यच्चयावत् धंदेवाले हे सर्व भीकमाग्यांच्या ढंगांनीं पूर्ण ग्रासिले आहेत; आणि सर्व जण तोंड वेंगाडून, शिव्याशाप व धमकी देऊन, भांडून तंडून अगर हातचलाखीनें मेहनतीपेक्षां, मोलापेक्षां किंवा ठरावापेक्षां ज्यास्त पैसे उगवतात. ह्या येथून तेथवर पसर-

लेल्या लुच्चा-लफंग्यांना गैरवाजवी अगर अन्यायाचा पैसा ओतण्यांत धार्मिक-कारण नैतिक खात्रीनें नव्हे-पुण्य असेल तर महायात्रा सुफल होते असें म्हणावें ! ! !

व्यावहारिक दृष्ट्या महायात्रेचा विशेष उपयोग आहे असें झणवत नाहीं. अन्नसत्रें व सदावर्तें झोडीत जे साधू भिक्षेच्या पैशावर यात्रा करितात, त्यांना यथेच्छ सवड असली तरी ते उद्योग हुन्नरांत मन घालून ह्या प्रांताचें ज्ञान त्या प्रांतांत नेऊन लोकांची संसारयात्रा सुखकर करण्याच्या नादांत पडतील ही गोष्ट कालत्रयीं होणार नाहीं. जे शेतकरी व हुन्नरी लोक यात्रांला जातात त्यांना तिर्थविधि, क्षेत्रविधि व देवदर्शन ह्यांपेक्षां कांहीं अधिक करण्याला वेळ, पैसा व साधनें आहेत कोठें ? गंगाजल, गंडे, प्रसाद, कांहीं खाण्याचे व हौसेचे जिन्नस एवढें घेऊन ते परततात, व फार तर ठिकाठिकाणीं झालेल्या तंगीचीं व त्रासाचीं वर्णनें कशींबशीं देतात. देशाटनानें प्राप्त होणाऱ्या चातुर्यानें आपलें कसब सुधारावें असा यात्रेचा हेतु नसतो, आणि तसा परिणाम झाल्याचें ऐकिवांतही पण नाहीं. रेलवेचें हांशिल व भरेकऱ्यांच्या थापा ह्यांवर भिस्त देऊन थोडक्यांत यात्रा करूं असें गोर-गरीब लोक म्हणतील तर ‘ अवघड ठिकाणीं दुखणें आणि जांवई वैद्य ’ या म्हणीचा खडतर अनुभव त्यांना आल्यावांचून राहणार नाहीं. ते ज्या वर्गांतले असतात त्या वर्गांच्या लोकांची त्यांच्या ओळख-देखीच्या चावडी-कचेरींतली तारंबळ व बुडवणूक, महार जागले शिपाई प्यादे व हलके कामगार ह्यांचें त्यांशीं वर्तन, भटकणाऱ्या जातींकडून होणारी गांव-ल्या म्हणजे, परमुलखांत गाडीच्या गर्दींत व धांदलींत खेडवळ व फिरस्ते साधू ह्यांशीं आगगाडीच्या व पोलीसच्या हलक्या नोकरांचा कसा काय संबंध घडत असेल ह्याची कल्पना सहज करितां येईल. वास्तविकपणें हा संबंध नियमित स्थलीं व नियमित कालीं पडत असतो. सबब आडव-ळणी खेड्यापाड्यांनीं अगर डोंगराजंगलांनीं रयतेशीं पडत असलेल्या कनिष्ठ सरकारी नोकरांच्या संबंधापेक्षां त्यावर सक्त नजर ठेऊन तो

मुक्याआंधळ्या व जाण्या–येण्याला घाबरे पडलेल्या यात्रेकरूंना सुखकर करणें किती तरी सुसाध्य आहे! परंतु तसें झाल्याची बोलवा नाहीं व अनुभवही नाहीं. उलट 'जळत्या घराचा पळता वासा' ह्या म्हणीचा जारी अमल दिसून येतो. असो. प्रस्तुत स्थितींत लोकांनीं तिकिटाच्या हांशिलाची सवाई दिढी व हमालीची आठ दहा पट रक्कम तरी घेऊन निघावें हें बरें. दान–दक्षिणेसंबंधी व शिधापाण्याच्या खर्चाचीही हीच अवस्था. अंदाजापेक्षां जास्त खर्च होऊन निपूर आलेले सर्व तीर्थक्षेत्रांचे यात्रेकरू निमानीम तरी असतात. परंतु आपल्या फसगतीचें यथार्थ वर्णन दिलें तर क्षेत्रांची निंदा होऊन लोक तेथें जाण्याला निरुत्साह होतील, व आपणांला पाप लागेल ह्या भोळवट समजुतीनें पुष्कळ लोक तसें करीत नाहींत. तरी अज्ञात पुण्याची आशा वगळली आणि कोणत्याही बाजूनें महायात्रेच्या प्रस्तुत व वास्तविक स्थितीचा विचार केला तर गोरगरिबांनीं ह्या फंदांत पडूं नये असा न विचारतां स्पष्ट अभिप्राय देणें भाग आहे.

आपण होऊन ह्मणा, किंवा दुसऱ्याच्या प्रोत्साहनानें ह्मणा यात्रा जात राहाणारच. तेव्हां तिला शक्य तितकी सुखकर वाट शोधिली पाहिजे. पहिली मुख्य गोष्ट अशी कीं, यात्रेकरूंचा रेलवेवरचा व क्षेत्रांमधील त्रास व तोटा चुकविला पाहिजे. विलायतेस ज्याप्रमाणें गुडफ्रेंड्स सोसायटी वगैरे संस्था आहेत, त्यांच्या धर्तीवर जनतासेवेची आवड असणाऱ्या लोकांनीं एखादी संस्था काढावी, आणि आपले सदस्य मोठमोठ्या स्टेशनांवर व क्षेत्रांत पाठवावेत. सरकारच्या व रेलवेच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांची सहानुभूति त्यांना खात्रीनें मिळेल, आणि त्यांनीं यात्रेकरूंची वंचना कोठें व कशी होते हें अमलदारांचे नजरेस आणावें. त्याच ठिकाणीं त्यांना यात्रा भरती करणारांचे डावपेंचही यात्रेकरूंचे नजरेस आणतां येतील, व जेणेंकरून ते त्यांच्या तावडींत न जातील अशी त्यांची समजूत घालतां येईल. दुसरी गोष्ट ही आहे कीं, कांहीं दक्ष तरुणांनीं मनांत आणल्यास त्यांना ह्या बाबतींत स्वार्थ व परार्थ उत्तम तऱ्हेनें साधतां येईल. त्यांनीं जरूर तें भांडवल जमवावें आणि उतार स्टेशनांनजीक धर्मशाळांत व

क्षेत्रांत वाजवी नफ्यानें चोख माल विकण्याचीं दुकानें घालवींत. मालाच्या जबरदस्त उठावामुळें त्यांना अतिशय नफा होऊन यात्रेकरूंशीं खरा व्यापार केल्याचें पुण्य लाभेल, आणि लोभी व कपटी व्यापाऱ्यांवर चांगला दाब राहून पेठांचें गढूळ वळण निवळेल. जेथें जें कलाकुसरीचें सामान होतें तें सचोटीनें व रास्त नफ्यानें मिळण्याचीं दुकानें क्षेत्रांनिहाय मोठ्या प्रमाणावर निघालीं पाहिजेत, व त्यांची माहिती यात्रेकरूंना स्टेशनांवर, धर्मशाळांत मिळेल अशी तजवीज झाली पाहिजे. तिसरी गोष्ट अशी आहे कीं, अज्ञेय पुण्यापलीकडे यात्रांपासून कोणताही तादृश व्यावहारिक फायदा नसल्यामुळें त्या जितके थोडे व निवडक लोक करतील तितकें बरें, असा लौकिक समजुतींत पालट झाला पाहिजे. पुराणांतल्या फलश्रुतीला किंवा हरदासी–भिक्षुकी अतिशयोक्तीला अक्षरशः खरें मानून साधारण स्थितींतल्या माणसांनीं तीन तीनदां महायात्रा किंवा उठल्या बसल्या आळंदी–पंढरी इत्यादींच्या वाऱ्या करकरून काळाचा व पैशाचा अपव्यय आणि आयतखाऊंची चंगळ करणें आपल्या देशाच्या सध्यांच्या सांपत्तिक हलाकींत अत्यंत उधळेपणाचें आहे. भिक्षुकी व उडाणटप्पू धंद्यांतले लोक जितके कमी होऊन धनोत्पादक धंद्यांत जातील तितकें देशाला हितकर आहे. लोकांत ज्ञानप्रसार झाल्यावांचून ही बाब त्यांच्या खात्रीस येणार नाहीं. परंतु ती जितकी आणतां येईल तितकी आणण्याची खटपट अवश्य झटून व तांतडीनें झाली पाहिजे. हिला उपक्रम सदावर्तें व अन्नसत्रें ह्यांतून त्वरित करतां येईल. अन्नसत्रांत जेवणाराला काशीस 'छत्रपति' म्हणतात. छत्रपति साधू याप्रमाणें जेवण बाहेर काढतात आणि रेलवेभाड्यासाठीं भीक मागतात. त्यांनीं निढळच्या घामानें पैसे मिळविले नसल्यामुळें लांचलुचपत देण्याला त्यांना खंती वाटत नाहीं, आणि जो धारा ते पाडतात तो इतरांनाही भोंवतो. म्हणून पहिल्यानें याचक यात्रेकरूंच्या व साधूंच्या वर्गांत मोडणाऱ्यांना सदावर्तें व अन्नसत्रें ह्यांमध्यें जी खुराकी मिळते ती बंद झाली पाहिजे, म्हणजे कसाला टिकणारे असेच यात्रेकरू निघतील; आणि सध्यां थापाथुपीच्या जोरावर जें

यात्रांचें बंड वाढत आहे तें कमी होईल. उत्तेजन नाहीं म्हणून आपल्या प्राचीन विद्येचा लोप होत चालला आहे अशी हळहळ ऐकूं येते. सदावर्तें व अन्नसत्रें ह्यांत खर्चीं पडणाऱ्या पैशाचा ओघ जर विद्यार्जनाकडे व विद्वानांच्या संभावनेकडे वळेल तर किती तरी बहार होईल! तरी दानशूरांनीं ह्या गोष्टीचा सहृदयतेनें विचार करावा.

देशामध्यें व्यापारवृद्धि किती झाली आहे हें ठरविण्याच्या साधनांपैकीं प्राप्तीवरील कर व रेल्वेच्या उतारूंची संख्या हीं प्रमुख होत. यात्रेकरूंच्या उपयोगाकरितां गुंतलेलें सर्व भांडवल व लोक देशांतला व्यापार व संपत्ति वाढी लावतात असें ह्मणतां येणार नाहीं. ह्मणून तीर्थविधि व क्षेत्रविधींकडे गुंतलेल्या लोकांचे प्राप्तीवरील कर व्यापारवृद्धीचें निदर्शन ह्मणून स्वीकारतां येणार नाहीं. तरी असला आंकडा स्वतंत्र रीतीनें कळणें इष्ट आहे. उतारूंच्या संख्येबरोबरच त्यांच्या प्रवासाच्या हेतूंची वर्गवारी कळेल तर किती जणांचा प्रवास व्यापारी पेशानें झाला हें समजेल, आणि त्यावरून उतारूंच्या अवाढव्य संख्येपैकीं कितीजणांच्या हालचालीची मदत खऱ्याखुऱ्या व्यापारवृद्धीला झाली ह्याचा ठाव घेतां येईल. परंतु प्रत्येक उतारू कशासाठीं गाडींत बसला ही चौकशी जितकी अफाट तितकीच कंटाळवाणी होईल. सबब तूर्त रेलवेनें प्रवास करणाऱ्यांचे 'यात्रेकरी' 'व इतर' असे दोन आंकडे जरी वेगळाले मिळाले तरी कितींचा प्रवास धनोत्पादक होत नाहीं हें कळून येईल.

सध्यां धार्मिक विधींना वाणसौद्याचें, तीर्थोपाध्यायांना वाण्याचें आणि यात्रांना व्यापारी सट्ट्याचें स्वरूप आलें आहे. भरती करणाऱ्यांच्या युक्त्यांमुळें महायात्रेला जाणाऱ्या गांवढेकऱ्यांच्या संख्येचें एकसारखें वाढणारें प्रमाण लक्षांत आणलें म्हणजे, हा भाग **गांव–गाड्यांत** घालण्यामध्यें विषयान्तर केलें असें मत होणार नाहीं. खेड्यांच्या यात्रांच्या मानानें महायात्रेचा संबंध **गांव–गाड्याशीं** फार कमी येतो म्हणून हा विषय **दुकानदारी** ह्या प्रकरणांमध्यें न घालतां पुरवणीरूपानें घेतला आहे.

—:समाप्त:—

क्षेत्रांत वाजवी नफ्यानें चोख माल विकण्याचीं दुकानें घालवींत. मालाच्या जबरदस्त उठावामुळें त्यांना अतिशय नफा होऊन यात्रेकरूंशीं खरा व्यापार केल्याचें पुण्य लाभेल, आणि लोभी व कपटी व्यापाऱ्यांवर चांगला दाब राहून पेठांचें गढूळ वळण निवळेल. जेथें जें कलाकुसरीचें सामान होतें तें सचोटीनें व रास्त नफ्यानें मिळण्याचीं दुकानें क्षेत्रांनिहाय मोठ्या प्रमाणावर निघालीं पाहिजेत, व त्यांची माहिती यात्रेकरूंना स्टेशनांवर, धर्मशाळांत मिळेल अशी तजवीज झाली पाहिजे. तिसरी गोष्ट अशी आहे कीं, अज्ञेय पुण्यापलीकडे यात्रांपासून कोणताही तादृश व्यावहारिक फायदा नसल्यामुळें त्या जितके थोडे व निवडक लोक करतील तितकें बरें, असा लौकिक समजुतींत पालट झाला पाहिजे. पुराणांतल्या फलश्रुतीला किंवा हरदासी-भिक्षुकी आतिशयोक्तीला अक्षरशः खरें मानून साधारण स्थितींतल्या माणसांनीं तीन तीनदां महायात्रा किंवा उठल्या बसल्या आळंदी-पंढरी इत्यादींच्या वाऱ्या करकरून काळाचा व पैशाचा अपव्यय आणि आयतखाऊंची चंगळ करणें आपल्या देशाच्या सध्यांच्या सांपत्तिक हलाकींत अत्यंत उधळेपणाचें आहे. भिक्षुकी व उडाणटप्पू धंद्यांतले लोक जितके कमी होऊन धनोत्पादक धंद्यांत जातील तितकें देशाला हितकर आहे. लोकांत ज्ञानप्रसार झाल्यावांचून ही बाब त्यांच्या खात्रीस येणार नाहीं. परंतु ती जितकी आणतां येईल तितकी आणण्याची खटपट अवश्य झटून व तांतडीनें झाली पाहिजे. हिला उपक्रम सदावर्तें व अन्नसत्रें ह्यांतून त्वरित करतां येईल. अन्नसत्रांत जेवणाराला काशीस 'छत्रपति' म्हणतात. छत्रपति साधू याप्रमाणें जेवण बाहेर काढतात आणि रेलवेभाड्यासाठीं भीक मागतात. त्यांनीं निढळच्या घामानें पैसे मिळविले नसल्यामुळें लांचलुचपत देण्याला त्यांना खंती वाटत नाहीं, आणि जो धारा ते पाडतात तो इतरांनाही भोंवतो. म्हणून पहिल्यानें याचक यात्रेकरूंच्या व साधूंच्या वर्गांत मोडणाऱ्यांना सदावर्तें व अन्नसत्रें ह्यांमध्यें जी खुराकी मिळते ती बंद झाली पाहिजे, म्हणजे कसाला टिकणारे असेच यात्रेकरू निघतील; आणि सध्यां थापाथुपीच्या जोरावर जें

यात्रांचें बंड वाढत आहे तें कमी होईल. उत्तेजन नाहीं म्हणून आपल्या प्राचीन विद्येचा लोप होत चालला आहे अशी हळहळ ऐकूं येते. सदावर्तें व अन्नसत्रें ह्यांत खर्चीं पडणाऱ्या पैशाचा ओघ जर विद्यार्जनाकडे व विद्वानांच्या संभावनेकडे वळेल तर किती तरी बहार होईल ! तरी दानशूरांनीं ह्या गोष्टीचा सहृदयतेनें विचार करावा.

देशामध्यें व्यापारवृद्धि किती झाली आहे हें ठरविण्याच्या साधनांपैकीं प्राप्तीवरील कर व रेल्वेच्या उतारूंची संख्या हीं प्रमुख होत. यात्रेकरूंच्या उपयोगाकरितां गुंतलेलें सर्व भांडवल व लोक देशांतला व्यापार व संपत्ति वाढी लावतात असें ह्मणतां येणार नाहीं. ह्मणून तीर्थविधि व क्षेत्रविधींकडे गुंतलेल्या लोकांचे प्राप्तीवरील कर व्यापारवृद्धीचें निदर्शन ह्मणून स्वीकारतां येणार नाहीं. तरी असला आंकडा स्वतंत्र रीतीनें कळणें इष्ट आहे. उतारूंच्या संख्येबरोबरच त्यांच्या प्रवासाच्या हेतूंची वर्गवारी कळेल तर किती जणांचा प्रवास व्यापारी पेशानें झाला हें समजेल, आणि त्यावरून उतारूंच्या अवाढव्य संख्येपैकीं कितीजणांच्या हालचालीची मदत खऱ्याखुऱ्या व्यापारवृद्धीला झाली ह्याचा ठाव घेतां येईल. परंतु प्रत्येक उतारू कशासाठीं गाडींत बसला ही चौकशी जितकी अफाट तितकीच कंटाळवाणी होईल. सबब तूर्त रेलवेनें प्रवास करणाऱ्यांचे 'यात्रेकरी' 'व इतर' असे दोन आंकडे जरी वेगळाले मिळाले तरी कितींचा प्रवास धनोत्पादक होत नाहीं हें कळून येईल.

सध्यां धार्मिक विधींना वाणसौद्याचें, तीर्थोपाध्यायांना वाण्याचें आणि यात्रांना व्यापारी सट्टयाचें स्वरूप आलें आहे. भरती करणाऱ्यांच्या युक्त्यांमुळें महायात्रेला जाणाऱ्या गांवढेकऱ्यांच्या संख्येचें एकसारखें वाढणारें प्रमाण लक्षांत आणलें म्हणजे, हा भाग **गांव–गाड्यांत** घालण्यामध्यें विषयान्तर केलें असें मत होणार नाहीं. खेड्यांच्या यात्रांच्या मानानें महायात्रेचा संबंध **गांव–गाड्याशीं** फार कमी येतो म्हणून हा विषय **दुकानदारी** ह्या प्रकरणांमध्यें न घालतां पुरवणीरूपानें घेतला आहे.

:समाप्त: